# MR. Q.S. KHAN IS ALSO AUTHOR OF FOLLOWING BOOKS.

Some of his book are:

**Management Topics:-**

- Law of success for both the Worlds.
- How to prosper the Islamic way?
- Yashachi Gurukilli (Marathi Translation of Law of success for both the Worlds.)

**Religious Topics:-**

- Teachings of Vedas and Quran (Also translated in Hindi & Marathi)
- Daulat Mand kaise banen? (Urdu)
- Hajj Journey Problems and their easy Solutions.
- Safar-e-Hajj (Urdu, Hindi, Bengali & Gujarati)
- Kya har mah Chand dekhna Zaroori hai? (Urdu)

**Engineering Topics:-**

1. Introduction to Hydraulic Presses and Design of Press Body.
2. Design and Manufacturing of Hydraulic cylinders.
3. Study of Hydraulic Valves, Pumps and Accumulators.
4. Study of Hydraulic Accessories
5. Study of Hydraulic Circuits
6. Study of Hydraulic Seals, Fluid Conductors, and Hydraulic Oil.
7. Design and Manufacturing of Hydraulic Presses.

ALL ABOVE MENTIONED BOOKS AND MANY BOOKS COULD BE STUDIED AND FREELY DOWNLOADED FROM:
www.freeeducation.co.in / www.tanveerpublication.com
(Detail of link to free download are given on last page of this book)

***"Law of Success for both the Worlds"***

ह्या पुस्तकाच्या इंग्रजी अनुवादाची मान्यवरांनी केलेली प्रशंसा

Kindly accept my congratulation for writing and publishing such a good book 'Law of Success'. Thank you for sending a copy of the same.

The book is really good and I have gone through it. Both the contents and purpose is laudable. I am sure this book will do ample good to most of its readers. On my part, I have marked and forwarded the copy to the Library.

P.P. RADHAKRISANAN.
MA, PGDBM, LLB.(Gen.),MIM, FIIEIM
PRESIDENT: INDIAN INSTITUTE OF
EXPORTAND IMPORT MANAGEMENT

With season's greetings, I convey my sincere thanks for presenting your treatise on 'Law of Success.'

The book I felt will be of immense use for our senior students particularly with reference to our BMS students. I shall ensure that your thought and ideas, as brought out in this publication are given the best of attention by our students.

DR. A. VARADARAJAN
PRESIDENT AND FOUNDER OF NATIONAL
EDUCATION SOCIETY AND MORE THAN
FORTY EDUCATIONAL INSTITUTES

"I have read your book 'Law of Success for both the worlds'. This book is very informative, easy to read, and it teaches business ethics spiritually. I have recommended it to my lot of friend who got great amount of benefit to this book.

I have distributed copies of this book to staff and students and kept in libraries. My personal suggestion is that teaching of this book will greatly help student and kept in libraries. My personal suggestion is that teaching of this book will greatly help students in succeeding in their career."

DR. MUSHTAQUE MUKADAM
MEDICALDIRECTOR: Z.V.M GENERAL
HOSPITAL, AZAM CAMPUS, PUNE.

I found the book extremely interesting and informative. The book takes the reader to, as yet, un-explored areas of wisdom. We are yet to come across such a book with varied dimensions and range of invaluable thoughts. To tell you frankly, the book has put me on a pondering mode right from the start. I take this opportunity to heartily congratulate you for your farsightedness, vision and endeavor. May God bestow you with health & happiness to enable you to bring such publications which is the need of the hour.

M. A. H. SHEIKH
DIRECTOR, SHANZE
POWER TECH PVT. LTD.

# यशाची गुरुकिल्ली

लेखक

**क्यु.एस.खान**

अनुवाद

**सुशील लिमये**

**★विनंती★**

ह्या पुस्तकामध्ये पवित्र वेद, पवित्र बायबल आणि पवित्र कुराण यातील श्लोक आहेत, म्हणुन या पुस्तकाचा आदर करा, तसेच फिल्मी मासिके व अश्लील साहित्यापासुन वेगळे ठेवा.

**★यशाची गुरूकिल्ली★**



**★प्रकाशक★**
**तन्वीर पब्लिकेशन्स**
हायड्रो इलेक्ट्रिक मशीनरी प्रेमाईस,
ए/12, राम रहीम उद्योग नगर,
बस स्टॉप लेन. एल.बी.एस. मार्ग, सोनापुर,
भांडुप (पश्चिम), मुंबई-400 078
फॅक्स:-+91-2225961682
वेबसाईट:- www.Tanveerpublication.com

International Standerd Book Number.
(For Marathi Translated Book)
ISBN-No. 978-81-904591-3-6

Detail of original English book
Copyright © 2007,Q.S.Khan

Published by Wheatmark
610 East Delano Street,Suite 104
Tucson, Arizona 85705 U.S.A.
www.wheatmark.com

International Standerd Book Number:
978-1-60494-019-0

Library of Congress Control Number:
2007943653



# प्रस्तावना

या विश्वाचा अधिपती ईश्वर असे सांगतो,

*"तुम्हा लोकांना अधिकात अधिक आणि एकदुसऱ्यापेक्षा जास्त धन प्राप्त करण्याच्या मोहाने बेसावध करून टाकले आहे. इथपावेतो की (याच चिंतेत) तुम्ही थडग्यापर्यंत पोहचता."* (पवित्र कुराण : १०२)

हे सत्य आहे की, जेव्हा आपणास आध्यात्मिक किंवा आर्थिक बाबींबद्दल खऱ्या गोष्टी समजतात, पण त्यावेळी खूप उशीर झालेला असतो.

ह्या जगातील प्रत्येक व्यक्ति ही वयाच्या ५ व्या वर्षापासून ते ६५ वर्षे वयापर्यंतही उज्वल भविष्यासाठी सतत झटत असते ही एक दुःखांतिका आहे. तथापि हे जग सोडून जाताना त्यांपैकी बहुतेकजण हे असमाधानी व अयशस्वी राहातात. बहुतांशी मानवप्राणी हे लक्ष्य गाठण्यास अयशस्वी ठरतात व फक्त थोडेच जण ते गाठण्यास यशस्वी होतात. पण दुसरी शोकांतिका अशी आहे की, जे थोडेफार यश मिळवितात ते त्यांच्या यशाचे रहस्य कधीही उघड करीत नाहीत.

थोड्याच लोकांना माणसांच्या व्यथांची जाणीव झाली आणि त्यांनी फार चांगली पुस्तके लिहिली. त्यामुळे लाखो लोकांना जीवनात त्यांचे ध्येय शोधण्यास व शेवटी गाठण्यास मदत झाली. माझाही त्यामुळे फायदा झालेला आहे.

मी या विषयावरील काही तज्ञ व्यक्ति नाही. तथापि यशाच्या मार्गावरून जाताना मला काही रहस्यांचा शोध लागला व ती मला तुमच्यासाठी खुली करावी असे वाटले

हे पुस्तक म्हणजे ह्या विषयावरील सहमति दर्शविणारा एक छोटासा प्रयत्न आहे.

जर तुम्हाला ह्या पुस्तकापासून काही फायदा झाला तर जेव्हा तुम्ही परमेश्वराकडे कृपाप्रसादासाठी साहाय्य मागाल त्यावेळी माझी सुद्धा आठवण ठेवा.

ह्या पुस्तकांतील विषय व ज्या मुद्यांचे मला महत्त्व सांगावयाचे आहे त्यावर तुमचे ध्यान केंद्रित करण्याचा प्रयत्न करा. जर तुम्ही असे केलेत तर ह्या पुस्तकापासून तुम्हाला भरपूर लाभ होईल ह्याची मला पूर्णपणे खात्री वाटते.

मी माझी पत्नी सौ. अकीला खान आणि माझे मित्र श्री. अकबर मलिक व श्री. सुशील लिमये, श्री. विठ्ठल आचरेकर ह्यांनी हे पुस्तक पूर्ण करण्यासाठी केलेल्या बहुमोल सूचना व मदत ह्याबद्दल त्या सर्वांचे मनःपूर्वक आभार मानतो.

क्यु.एस.खान
लेखक

# अनुक्रमाणिका

प्रस्तावना ........................................................................ ५

प्रकरण १ नशीबातून भरभराट ........................................................ ११

प्रकरण २ यशानंतर दुःखी शेवट ..................................................... १४

प्रकरण ३ यशाचे नियम ................................................................ १६

**भाग १ सकारात्मक मनाशी संबंधित नियम**

प्रकरण ४ शरीरावर मनाचे श्रेष्ठत्व .................................................. १८

प्रकरण ५ उत्कर्षावर परिणाम करणारे बुद्धिचे घटक ................................ २०

प्रकरण ६ मनाचे शारीरिक आरोग्य ................................................... २१

प्रकरण ७ अर्धजागृत मन .............................................................. २२

प्रकरण ८ मनाचे स्वीकार करण्याचे स्थान ........................................... २४

प्रकरण ९ अर्धजागृत मनाची सूचना देणारी आज्ञावलि (सॉफ्टवेअर) .................. २६

प्रकरण १० मनोविकारांचे (भावना) प्रकार ............................................. २८

प्रकरण ११ अत्यंत महत्त्वाची सकारात्मक भावना - श्रद्धा : ............................. ३१

प्रकरण १२ निसर्गमाता ................................................................. ३६

प्रकरण १३ ईश्वराची ओळख ........ ४४

प्रकरण १४ कल्पना आणि विचार ........ ४९

प्रकरण १५ स्वयंसूचना ........ ५७

प्रकरण १६ नकारात्मक विचार कसे टाळावेत ? ........ ७७

प्रकरण १७ प्राचीन तत्त्वज्ञान ........ १००

**भाग २ रा प्रशासकीय आणि व्यवसाय कौशल्य यांच्यासंबंधीचे नियम**

प्रकरण १८ चिकाटी ........ १०६

प्रकरण १९ व्यवसायाचे व्यवस्थापन ........ १२६

प्रकरण २० संघटनेची तत्वे ........ १२९

प्रकरण २१ नेतृत्वाची पद्धत आणि प्रशासनाची तंत्रे ........ १३३

प्रकरण २२ यशस्वी नेता कसा असावा? ........ १४५

प्रकरण क्र. २३ निर्णय घेण्याची प्रक्रिया ........ १६२

प्रकरण क्र. २४ वाटाघाटींची कला ........ १७८

प्रकरण क्र. २५ सोप्या विक्रीची रहस्ये ........ १८६

प्रकरण क्र. २६ जास्त निष्कपटी राहू नका ........ १९१

**भाग क्र. ३ चांगल्या कामासंबधीचे नियम**

प्रकरण क्र. २७ चांगल्या (किंवा उदात्त) कामांचे महत्त्व ........ २००

प्रकरण क्र. २८ देणगी ........ २३२

प्रकरण क्र. २९ तत्फिफ ........ २४४

प्रकरण क्र. ३० शापित पैसा ........ २५०

प्रकरण क्र. ३१ भरभराटीचा विमा ........ २६०

प्रकरण क्र. ३२ स्वच्छता ........ २६३

**भाग क्र.४ अपयशाची सर्वसामान्य कारणे**

प्रकरण क्र. ३३ तीन भयंकर गुन्हे. ........ २७५

प्रकरण क्र. ३४ आईवडिलांचे शाप ........ २७९

प्रकरण क्र. ३५ पाण्याचे थेंब ........ २८२

**भाग क्र. ५ अंतिम उपाय**

प्रकरण क्र. ३६ परीक्षेचा काळ ........ २८७

प्रकरण क्र. ३७ नावामध्ये काय आहे? ........ २९१

प्रकरण क्र. ३८ वैश्विक शक्तिचा परिणाम ........ २९४

प्रकरण क्र. ३९ स्थलांतर (देशांतर) ........ २९८

प्रकरण क्र. ४० आध्यात्मिक अडथळ्यांवर कशी मात करावी? ........ ३०३

**भाग क्र. ६ ईश्वर हा कोण आहे?**

प्रकरण क्र. ४१ ईश्वर हा कोण आहे? ........ ३१९

**भाग क्र. ७ अखिल विश्वाची भरभराट**

प्रकरण क्र. ४२ निरनिराळ्या धर्माचे आकलन ........ ३५९

प्रकरण क्र. ४३ अध्यापनाची अखंड प्रक्रिया ........ ३८३

प्रकरण क्र. ४४ अंतिम संदेशवाहक ........ ३८८

**अंतिम वाक्य ........ ४०१**

प्रकरण क्र. ४५ बुद्धिमान व्यक्तिंकडून काहीतरी शिका ........ ४०२

Learn from the Learned ones ........ ४०३

सदाचरणी व प्रामाणिक माणसाची भरभराट,
नेहमी ताडाच्या झाडाप्रमाणे वाढत राहील.



(Holly Bible PS 92.12)

*प्रकरण क्र. १*

# नशीबातून भरभराट

(Prosperity through Luck)

## (चुकीच्या मार्गाची उदाहरणे)

**उदाहरण एक :**

श्री सुनील यादव हा वयाच्या विसाव्या वर्षी उत्तरप्रदेशातून मुंबईला १२ वी इयत्ता शिक्षण पूर्ण करून आला. तो त्याच्या सासऱ्याबरोबर तांबे, पितळ, शिसे या भंगार मालाचा धंदा करू लागला. त्याने शुद्ध शिसे वितळण्याची कला शिकून घेऊन, त्यापासून वीटा बनविल्या व त्याची इंजिनियरींग उद्योगधंद्याला नवीन माल म्हणून विक्री केली. त्याने स्वतःचा ओतीव कामाचा कारखाना सुरू केला व दहा वर्षांच्या काळात २० कोटी रुपयाहून जास्त पैसे मिळविले.

**उदाहरण दोन :**

श्री. आर.डी. सिंग ह्या हुषार आणि तरतरीत माणसाने पुष्कळ परीक्षा, मुलाखती देऊन, तसेच राजकारणी लोकांचा वशिला लावून आणि लाच देऊन, जकात अधिकाऱ्याची (कस्टम ऑफिसरची) नोकरी मिळविली. विमानतळावर काम करताना लोकांची तपासणी

आणि सुटका करून त्याने पुष्कळ संपत्ति व वस्तू कमावल्या. थोड्या काळातच त्याने स्वतःचा बंगला, गाडी, बँकेत प्रचंड बँक बॅलंन्स व सुखसोयीच्या सर्व गोष्टी प्राप्त केल्या.

**उदाहरण तीन :**

श्री. फर्नांडिस ह्यांनी मुंबईजवळील एका शहरात एक नवीन दुकान विकत घेतले. तो फक्त प्रसिद्ध कंपन्यांच्या सायकलीचा डीलर नव्हता, तर त्याच्या स्वतःच्या मालकीच्या कारखानाही होता. तिथे तो नवीन सायकलीप्रमाणे बनावट सायकली तयार करीत असे. तो त्याच्या कारखान्यात काही मूळचे भाग असलेल्या व कंपनीचा शिक्का असलेल्या दर्शनी भागांची जुळणी करून सायकली तयार करीत असे व या बनावट सायकली तो अत्यंत कमी किंमतीत विकत असे, व असा आव आणत असे की, त्याला या व्यवहारात काहीच नफा मिळत नाही. लोक किंमतीची यादी, सायकलचे दर्जेदार नाव पहात, व श्री. फर्नांडिस ह्यांच्या शब्दावर विश्वास ठेवून, कोणतीही काचकूच न करता सायकली खरेदी करीत असत.

दहा वर्षाच्या कालावधित फर्नांडिसने ७० कोटी रुपयांची मालमत्ता जमविली.

**उदाहरण चार :**

श्री. खन्ना ह्यांचा कारखाना होता. तो स्वतः अत्यंत प्रामाणिक व इतर व्यावसायिकांमध्ये प्रसिद्ध होता. दलाल त्याच्याकडे येत होते व त्याला त्यांच्याकडून चोरट्या आयात केलेल्या यंत्रांची अगदी कमी किंमतीत खरेदी करण्यास भाग पाडत होते. (ही गोष्ट १९७०-८० च्या काळातील आहे.) श्री. खन्ना ती यंत्रे काही ठराविक उद्योगधंद्यांना भरमसाठ नफा घेऊन विकत होते. श्री. खन्ना स्वतः खास यंत्राचे उत्पादन करून ती प्रचंड किंमतीना विकत होते. अत्यंत कमी श्रम आणि सोपी जीवनपद्धति जगत असूनही खन्नाकडे खूप संपत्ति जमा झाली.

**उदाहरण पाच :**

श्री. किरीट शहा हा मुंबईला वयाच्या १९ व्या वर्षी, आपले कॉलेजचे शिक्षण अर्धवट सोडून आला. त्याने स्टेनलेस स्टील भंगार विकत घेण्यास सुरुवात केली. त्याला गिऱ्हाईकांच्या गरजेप्रमाणे बरोबर आकाराचे लहान स्टेनलेस स्टीलचे पत्रे पुरविण्याची युक्ति सुचली व त्यानुसार तो स्टेनलेस स्टीलच्या भंगारामधून पत्रे बाजूला वेगळे करीत होता व गिऱ्हाईकांच्या जरुरीप्रमाणे त्याचे पत्रे कापीत होता. या व्यवसायात त्याला स्टेनलेस स्टीलच्या मोठ्या आकाराच्या पत्र्यांच्या किंमतीपेक्षा पण जास्त किंमत मिळत होती. तसेच त्याने चामड्याच्या वस्तूंची आयात करावयाला सुरुवात केली व तशाच तऱ्हेच्या वस्तू बनवून त्यांचा धंदा करण्यास सुरुवात केली. वयाच्या ६५ व्या वर्षी त्याच्याकडे २० कोटी रुपयांहून जास्त मालमत्ता होती. आपल्या पुर्ण आयुष्यात तो एक प्रामाणिक व सभ्य माणुस होता. तो सुखी होता व त्याने आयुष्य सुख विलासात घालविले.

- अशा तऱ्हेच्या झटपट यशाच्या उदाहरणांमुळे हजारो लोकांची दिशाभूल झाली आहे.अशी उदाहरणे त्यांना परिश्रम करण्यापासून नाउमेद करतात व फसवणूक, लबाडी आणि बेकायदेशीर कृत्ये करून झटकन श्रीमंत बनण्याचा मार्ग दाखवितात.

अशा तऱ्हेच्या यशाच्या गोष्टी ह्या सर्वसामान्य नाहीत त्या असामान्य व अपवादात्मक आहेत. आपण अशा काही घटनांचा दुःखी शेवट पुढील प्रकरणांत तसेच 'चांगल्या कामाचे महत्त्व' ह्या प्रकरणात अभ्यास करूया.

## *प्रकरण २*

# यशानंतर दुःखी शेवट

## (After the Success The Sorrowful Ending)

**उदाहरण १**

जकात अधिकारी श्री. आर.डी. सिंग (प्रकरण क्र. १ मधील उदा. नं. २) ह्याला ह्दयाचा आजार निर्माण झाला. पहिल्याच सौम्य झटक्याला त्याला रुग्णालयात दाखल करावे लागले. त्याच्यावर बायपास शस्त्रक्रिया करून डॉक्टरांनी त्याला लुबाडले आणि फसविले. त्यांनी पंचतारांकित हॉस्पिटलमध्ये निवास, औषधे आणि शस्त्रक्रिया ह्यांचे ५ लाख रुपये बिल केले. बायपास शस्त्रक्रिया करतांना डॉक्टरांच्या निष्काळजीपणामुळे श्री. सिंगच्या मूत्रपिंडांना (kidney) बराच काळ रक्तपुरवठा झाला नाही व त्यामुळे मूत्रपिंड (kidney) संसर्गाने दूषित झाली आणि काम करेनाशी झाली.

नियमित डायलिसिस उपचार करतांना श्री. सिंग यांना खूप त्रास भोगावा लागला. शेवटी तो उपचारासाठी परदेशी गेला. तेथे दोन महिने रुग्णालयात राहिला. तेथे २० लाख रुपयाहून जास्त खर्च केला पण शेवटी त्यांत तो मरण पावला. आपल्यामागे त्याने कुटुंबियांना उच्च दर्जाचे जीवन जगण्याची सवय, पदवीधर न झालेली मुले व उत्पन्नाचे काही साधन नाही अशी अवस्था करून ठेवली. लाचलुचपतीतून मिळालेल्या वैभवाचा असा दुःखी शेवट झाला.

**उदाहरण २**

श्री. किरीट शहा (प्रकरण एक मधील उदा. क्र. ५), ह्या वैभवशाली प्रामाणिक सभ्य गृहस्थाने वयाच्या ६५ व्या वर्षी प्रत्यक्ष व्यवसायातून निवृत्ती स्वीकारली. त्याचा मुलगा चिराग ह्याने वडिलांच्या व्यवसायाचा ताबा घेतला. तो अत्यंत चाणाक्ष धंदेवाईक होता व चांगला उद्योगधंदा करीत होता. त्यांचाच नातेवाईक श्री हिरेन हा चिरागकडून रोख रक्कम देऊन चामडे खरेदी करीत असे. त्याने चिरागशी खूप दोस्ती केली व त्याला काही आठवड्यासाठी उधारीची पत (क्रेडिट) देण्यास तयार केले. हिरेन चिरागकडून पुष्कळ माल खरेदी करीत असे, व त्याची किंमत वेळच्या वेळी चुकती करीत असे.

एकदा हिरेनला चामड्याच्या जॅकेट्सची मोठी निर्यातीची ऑर्डर मिळाली. त्याने २ कोटी रूपये किंमतीचा माल चिरागकडून खरेदी केला. त्यापासून जॅकेट बनवून त्याची निर्यात केली. परंतु काही तांत्रिक समस्येमुळे परदेशी त्याचा पाठविलेला माल नाकारला गेला.

युरोपियन देशांनी चामडे रंगविण्याच्या पुष्कळ तऱ्हेच्या रंगणाऱ्या केमिकलवर बंदी घातली आहे. कस्टम अधिकाऱ्याच्या असे लक्षात आले की, हिरेनने त्या बंदी घातलेल्या रंगापैकी चामड्याची जॅकेट्स रंगविण्यासाठी वापर केला होता. त्यामुळे संपूर्ण माल नाकारला. ह्या नाकारलेल्या ऑर्डरमुळे हिरेनला नुसते नुकसानच झाले नाही, तर आणखी तीन कंटेनर भरलेला नाकारलेला चामड्याच्या जॅकेट्सचा माल  नष्ट करण्यासाठी आणखी पैसे खर्च करावे लागले.

श्री. हिरेनने दिवाळे वाजल्याचे जाहिर केले, व त्याच्या पुरवठादारांना त्यांचे पैसे तो देऊ शकला नाही. यामुळे शेवटी चिरागचे पण दिवाळे निघाले. श्री. चिरागला त्याच्या माल पुरवठादारांना पैसे देण्यासाठी त्याचे कार्यालय विकावे लागले. त्याची प्रसिद्धिपण संपुष्टात आली व त्याचा धंदाही बंद झाला.

वरील दोन्ही उदाहरणांत एक लाचखोर व एक सभ्य गृहस्थ ह्या दोघांचे नशीब फुटके निघाले. योग्य ती काळजी घेऊन व प्रयत्न करून सुद्धा ते अनर्थ टाळू शकले नाहीत. एखादा कठीण परिश्रम करून सुख मिळवू शकतो पण ते राखणे हे फार कठिण असते.

ह्या पुस्तकांत यश व वैभव हे कसे मिळवावे, व पुष्कळ काळापर्यंत कसे राखावे ह्याची काही गुपिते तुम्हाला आढळतील.

### *प्रकरण क्र. ३*

# यशाचे नियम

## (Law of Success)

यशाचे नियम हे मुख्यतः ३ प्रकारात विभागले जातात.

१) सकारात्मक मनाशी संबंधित नियम
(Laws related to positive state of mind.)

२) प्रशासन आणि व्यावसायिक कुशलता ह्यांच्याशी संबंधित नियम
(Laws ralated to administration and business skills)

३) पुण्याच्या (उदात्त) कामासंबधीचे नियम.
(Laws related to noble deeds)

## *प्रकरण क्र.४*

# शरीरावर मनाचे श्रेष्ठत्व

## (Importance of mind over body)

• पॅलेस्टाईन नेता श्री. यासीन हे लहानपणी एका डोंगरावरून पडले होते. त्यांच्या डोक्याच्या मागील भागावरील दुखापतीमुळे त्यांचे सर्व शरीर विकलांग झाले होते. आयुष्यभर त्यांना चाकाच्या खुर्चीवरच अवलंबून राहावे लागले. तथापि त्या व्हील चेअरमधून विकलांग अवस्थेतही त्यांनी बलवान इस्त्रायल सरकारशी पन्नासपेक्षा जास्त वर्षे लढा दिला. त्यांनी धाडसी अशी 'हमास' नावाची स्वातंत्र्य-लढाऊ संस्था स्थापन केली.

इस्त्रायल सरकारने यासीनला बऱ्याचवेळा तुरुंगात डांबले. पण ते यासिनचे मन व इच्छाशक्तिशी ना लढु शकले ना त्यांच्यावर नियंत्रण करू शकले. जेव्हा त्यांना वस्तूस्थिती कळली की आपण यासीन ह्यांच्याशी लढण्यात असमर्थ आहोत. तेव्हा अशा विकलांग व्यक्तिच्या गाडीवर त्यांनी हॅलिकॉप्टरचा वापर केला व क्षेपणास्त्रे डागली. अशाप्रकारे इस्त्रायल सरकारने यासीन ह्यांचा खून केला.

• श्री. स्टिफन हॉकिन्स, इंग्लंडचा खगोल आणि पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ हा पण व्हील चेअरवर जखडलेला आहे. त्याची अवस्था अशी आहे की, तो त्याचे स्वतःचे डोके खांद्यावर सरळ ठेवू

शकत नाही. परंतु अशी बरीच बंधने असतांना सुद्धा त्याने त्याचे नाव जगाच्या श्रीमंत व प्रसिद्ध व्यक्तिंच्या नामांकन यादीत अजरामर केले. तो अत्यंत यशस्वी व श्रीमंत शास्त्रज्ञ असून सध्याच्या जगांतील प्रमुख लेखक आहे.

- १९४७ पूर्वी ब्रिटिश सरकारचे भारताच्या लष्कर आणि शासकीय यंत्रणेवर संपूर्ण नियंत्रण होते. तथापि महात्मा गांधी ह्यांनी कोट्यावधि लोकांचे मन व आत्मा यावर नियंत्रण केले.

ब्रिटिश सरकारचे साम्राज्य अशा अहिंसक महात्म्याच्या निश्चय व इच्छाशक्तिविरुद्ध लढू शकले नाही. व शेवटी त्यांनी भारतातून माघार घेतली.

- वर दिलेली उदाहरणे ही विशिष्ट शारीरिकरीत्या कमकुवत असलेल्या व्यक्तिची असून तुमची अशी खात्री पटवून द्यावयाची आहे की, मन आणि विचार हेच शरीरापेक्षा यश मिळविण्यासाठी अगदी महत्त्वाचे आहेत.

पुढील येणाऱ्या प्रकरणात यश आणि भरभराट ह्यांच्यावर मन आणि विचारांचा कशाप्रकारे नियंत्रण आणि प्रभाव असतो, हे आम्ही स्पष्ट करणार आहोत.

***प्रकरण क्र. ५***

# उत्कर्षावर परिणाम करणारे बुद्धिचे घटक

## (Intellectual Factors Affecting Prosperity)

खालील तीन घटक मुख्यतः बुद्धिच्या पातळीवर व्यक्तीच्या यश आणि उत्कर्ष ह्यांवर परिणाम करतात.

१) मनाचे शारीरिक आरोग्य
(Physical health of the mind)

२) अर्धजागृतमनाची अनुकुल स्थिती
(Favourable state of the subconscious mind)

३) सृष्टीमाता आणि ईश्वर ह्यांच्याकडून कृपा.
(Favours from Mother Nature and God)

### *प्रकरण क्र. ६*

# मनाचे आरोग्य

## (Physical Health of Mind)

आपण मनाचा अभ्यास वैद्यकीयदृष्ट्या न करता तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने करुया !

**जागृत मन - (Conscious mind)**

- पांच स्पर्शेंद्रिये उदा. नाक (वास), डोळे (दृष्टी) कान (आवाज), जीभ (चव), त्वचा (संवेदना) ही सभोवतालच्या वातावरणातून माहिती गोळा करून ती जागृत मनाकडे पाठवितात.

- जागृत मन त्या माहितीचा स्वीकार करते, साठवून ठेवते, पृथ्थकरण करते व त्यावर तर्कशुद्ध निर्णय घेते. आपण आपले रोजचे दैनंदिन व्यवहार ह्या जागृत मनाच्या मदतीने करीत असतो.

- फक्त सशक्त व मजबूत खांदाच स्वस्थ मनाचे ओझे घेऊ शकतो. आणि फक्त सशक्त व स्वस्थ मनामध्येच सकारात्मक विचार व भावना असतात. ज्या यश मिळविण्यासाठी जरूरी असतात. त्यामुळे आरोग्याने परिपूर्ण शरीर, सकारात्मक भावना असलेले स्वस्थ मन आणि विचार हेच सुयशासाठी सर्वप्रथम जरुरी आहेत.

## *प्रकरण क्र. ७*

# अर्धजागृत मन

## (Subconcious Mind)

• तुमच्याकडे स्वतःचा ई-मेल आणि वेबसाईटने परीपुर्ण असा कॉम्प्युटरे असणारच. तुम्ही तुमच्या कॉम्प्युटरवर संदेश टाईप करता आणि तुमच्या मित्रमंडळींना पाठवता, किंवा आधुनिक जगाची माहिती असलेल्या इंटरनेटवर शोध करून त्याद्वारे दुसऱ्याच्या वेबसाईटवरून मिळणारी माहिती आपल्याकडे साठवून ठेवता. परंतु तुम्हाला माहिती आहे का की तुमच्या वेबसाईटची नक्की जागा कुठे आहे व तुमचे ई-मेल पत्ते हे तुमच्या पर्सनल कॉम्प्युटरवर डाउनलोड करण्यापूर्वी नक्की कुठे साठविले जातात? तुम्ही उत्तर द्याल, सर्व्हरमध्ये ! परंतु तुमच्या सर्व्हरचा नक्की ठिकाणा कुठे असतो? तुमच्या शहरात? तुमच्या देशाच्या राजधानीत की अमेरिकेमध्ये? का उपग्रहावर? ९९ टक्के लोकांना या प्रश्नाचे उत्तर देता येत नाही. त्यांना सर्व्हर हा कुठेतरी आहे, हे माहित असते पण त्याच्या अचूक ठिकाणाच्या बाबतीत काहीही ज्ञान नसते.

• एखाद्यावेळी भरपेट मेजवानीनंतर तुमचे पोट फुगते. परंतु हजारो पाने स्मरणशक्तित साठवून सुद्धा धर्मगुरूचे डोके काही फुगून गेले नाही. ह्या पुस्तकातील मजकूर हा स्मरणशक्ति रुपाने त्यांच्या मेंदूमध्ये कुठे साठवला गेला? व कुठल्या स्वरुपात? कोणालाही

ह्या प्रश्नाचे उत्तर देता येत नाही. परंतु कुठेतरी व कोणत्यातरी स्वरुपात मेंदूमध्ये त्याचा साठा झालेला आहे हे प्रत्येकाला ठाऊक असते.

- अर्धजागृत मन हे माणसाच्या स्मरणशक्तिसारखेच असुन एखादया सुपर कॉम्प्युटरसारखेच काम करते. ज्याला इंटरनेट कनेक्शन जोडलेले आहे.

- अर्धजागृत मनात एक जागृति असणारे क्षेत्र असते ज्यामध्ये प्रत्येक विचारशक्ति, अनुभव व माहिती जी आपण पाच स्पर्शेंद्रियावाटे सभोवतालच्या वातावरणातून गोळा करतो, त्यांचे वर्गीकरण आणि नोंदणी होते. ह्यामधून जसे फायलिंग कॅबिनेटमधून आपण एखादे पत्र काढून घेतो त्याप्रमाणे ह्या अर्धजागृत मनातून आपण पुन्हा आठवून एखादी माहिती काढून घेऊ शकतो.

- जेव्हा अर्धजागृत मनावर एखादे काम सोपवले जाते, तेव्हा ते मन कॉम्प्युटरप्रमाणे त्या माणसाच्या स्मृतिमध्ये उपलब्ध असलेल्या माहितीवर प्रक्रिया करते आणि अर्धजागृत मन इंटरनेट कनेक्शन व सर्चइंजीनप्रमाणे निसर्गमातेशी संपर्क करते (जी ईश्वराची एक आपोआप नियंत्रण करणारी यंत्रणा आहे.) व स्वतःवर सोपवलेले काम पूर्ण करण्यासाठी निसर्गमातेकडून माहिती, योजना, कल्पना ह्यांची मदत घेते.

- अर्धजागृत मनाला जी भाषा समजते व तिचा निसर्गमातेशी संपर्कासाठी उपयोग करते ती म्हणजे भावना (Emotion)

- अर्धजागृत मन हे निर्विकार कारणमीमांसा (cold-reasoning), तत्त्वे (logics) आणि इच्छा (wishes) इत्यादिंना प्रतिसाद देत नाही.

- अर्धजागृत मनाची प्रक्रिया आणि साठवण क्षमता जागृत मनापेक्षा नऊ पटीने जास्त आहे.

## *प्रकरण क्र. ८*

# मनाचे स्वीकार करण्याचे स्थान

## (Receiving Station of Mind)

- माणसाचे मन हे रेडिओ स्टेशनप्रमाणे आहे. ते आपल्या नकळतच ईश्वर, निसर्गमाता व अन्य लोकांच्या मनांशी संपर्क करीत असते.

- अर्धजागृत मन (Sub-Conscious mind) हे ज्ञानाचा साठा व प्रसारण करण्याचे एक साधन आहे.

- मनाच्या स्वीकार करणाऱ्या स्टेशनला सर्जनशील प्रतिभा (Creative imagination) वा कल्पनाशक्ति या नावाने ओळखले जाते.

- मनाचे हे स्वीकृती स्थान (Receiving station) हे एक विचारांच्या लहरींचे जाणीव करून देणारे जागृत क्षेत्र आहे. निसर्गमातेने प्रसारित केलेले संदेश हे स्थानक स्वीकारते. तसेच इतर लोकांच्या मनातून आलेल्या प्रमुख विचार स्पंदन लहरींचा पण स्वीकार करते.

- जेव्हा विचाराने सकारात्मक, उत्साही, संपत्तिची जाण असणारा व चांगले काम करणाऱ्या व्यक्तिला आपण भेटतो, तेव्हा आपले मन त्याच्याकडून वा तिच्याकडून वरील विचारांच्या स्पंदन लहरी स्वीकारते, व त्यामुळे आपणालाही सकारात्मक,उत्साही, पैशाची

जाणीव व पवित्र झाल्यासारखे वाटते. त्याचप्रमाणे जेव्हा आपण एखाद्या नकारात्मक वृत्ति वा गुन्हेगारी स्वभाव असलेल्या माणसाला भेटतो, त्यावेळी आपल्या शरीरात त्याचप्रकारच्या भावनांच्या लाटा शोषल्या जाऊन आपल्या मनातही त्याप्रमाणे भाव निर्माण होतात.

- जर आपण मनाच्या स्पष्टीकरणासाठी योजनाबद्ध व काल्पनिक चित्र काढले तर ते खालीलप्रमाणे असेल.



### *प्रकरण क्र. ९*

# अर्धजागृत मनाची आज्ञावलि

## (Software of the Subconscious mind)

एका काचेच्या भांड्यामध्ये पाणी भरले आहे अशी कल्पना करा. जेव्हा पाणी तापविले की ते उकळते व पाण्याची वाफ ही भांड्यामधून दुसऱ्या एका उपकरणात सोडली जाते. पण पाणी थंड असताना वाफ ही निर्माण होणार नाही किंवा ती दुसऱ्या उपकरणामध्ये वरती चढणार नाही.




- त्याचप्रमाणे माणसाच्या मनात जे विचार येतात, ते विचार जेव्हा भावना आणि उत्कंट इच्छा ह्याच्यामध्ये मिसळून गेले की, त्या विचाराच्या स्पंदनलहरी वाढतात व त्या अर्धजागृत मनाच्या पातळीपर्यंत पोहोचतात. अर्धजागृत मन त्यानंतर ते विचार उचलते, त्यांच्यावर प्रक्रिया करते व ते सृष्टीमाता आणि ईश्वर ह्यांच्याशी संपर्क करते. भावना ही मनाची भाषा आहे. जी अर्धजागृत मन समजून घेते आणि त्यानुसार क्रिया करते.




विचारांची मनापासून ईश्वराकडे संपर्क करण्याची पद्धत.

### प्रकरण क्र. १०

# भावनांचे प्रकार

## (Type of Emotions)

• भावनांचे पुष्कळ प्रकार असून मुख्यतः ते दोन प्रकारच्या गटात मोडतात. म्हणजेच सकारात्मक भावना आणि नकारात्मक भावना. अर्धजागृत मन हे दोन्ही गटांच्या भावनांबरोबर सारख्याच तऱ्हेने काम करते.

**सकारात्मक भावना**

अ) उत्कंट (प्रबळ) इच्छेची भावना
ब) आशा व श्रद्धेच्या भावना
क) प्रणय, प्रेम आणि कामजीवन ह्यांच्या भावना
ड) उत्साह आणि धैर्य ह्यासंबंधीच्या भावना

**नकारात्मक भावना**

अ) निराशायुक्त भावना
ब) गरिबी, टीका, आजारपण आणि मृत्यू ह्यांच्या भितीच्या भावना
क) प्रिय व्यक्तिच्या विरहाच्या भितीची भावना
ड) सूडबुद्धीच्या भावना

इ) मत्सराच्या भावना

फ) राग, द्वेष व लोभाची भावना

ग) अंधश्रध्दा, ज्योतिषशास्त्र, संख्याशास्त्र, हस्तसामुद्रिक ज्योतिष आणि भविष्य कथन इत्यादी गोष्टीवरील विश्वास (ज्योतिषाने सांगितलेली नकारार्थी भविष्यवाणी मनात घर करून राहते.)

• एखाद्यासुद्धा नकारार्थी भावनेमुळे इतर उरलेल्या सकारात्मक भावना दबल्या जातात, व अर्धजागृत मन हे मनावर वर्चस्व करणारी भावना उचलून घेते, व तिचे खरेपणामध्ये रुपांतर करण्याच्या क्रियेस सुरूवात करते.

• सर्व धर्मात असे सांगितले आहे की, तुम्ही काही मिळवण्यासाठी जर ईश्वराची प्रार्थना करीत असाल तर अशा पूर्ण विश्वासाने प्रार्थना करा की, ईश्वर तुमची इच्छा नक्कीच पुरी करेल, व त्याबद्दल जरा सुद्धा संशय बाळगू नका. कारण अविश्वासाने केलेल्या प्रार्थनेला उत्तर मिळत नाही.

कारण विश्वास ही एक सकारात्मक भावना आहे. जेव्हा विचार हे विश्वासाशी मिसळले जातात, ते अर्धजागृत मनाच्या पातळीपर्यंत पोहोचतात. तेथून ते निसर्गमाता आणि ईश्वर ह्यांच्याकडे जातात व सकारात्मक निकाल परत आणतात. सृष्टीमाता जी ईश्वराचीच एक आपोआप चालणारी यंत्रणा आहे, ईश्वराने दिलेल्या कृपाप्रसादावर निसर्गमाता ही अर्धजागृत मनाकडे, प्रार्थना करणाऱ्याची उत्कंट इच्छा कशी पुर्ण व्हावी याचे मार्गदर्शन करते, व तसेच ती इतर संबंधित लोकांच्या मनात, प्रार्थना करणाऱ्याची कशी साहाय्यता करावी याबद्दल संदेश पाठवते,

उलटपक्षी जेव्हा प्रार्थनांमध्ये संशय आणि नकार मिळण्याची भिती ह्यांचे मिश्रण होते तेव्हा अर्धजागृत मन हे फक्त नकारात्मक विचार निवडून घेते, व त्याची निसर्गमाता आणि ईश्वर ह्यांच्याकडे पाठवणी करते, व तशाच तऱ्हेची प्रतिक्रिया मिळविते. आणि प्रार्थना करणाऱ्याची संशय आणि भिती पुर्ण होऊ दे, असे आदेश सृष्टीमाता

सर्व संबंधित लोकांना देते.

- धार्मिक पुस्तके वरील वर्णन केलेल्या तत्वाचे साध्या शब्दांत पुढीलप्रमाणे वर्णन करतात:

- पवित्र बायबल सांगते,

*'तुम्ही ज्या वस्तूची इच्छा करता, जेव्हा तुम्ही प्रार्थना करता, विश्वास ठेवा तुमची इच्छा पुर्ण होईल. ती वस्तू नक्कीच तुम्हाला मिळेल.'* (मार्क ११.२४)

- पवित्र कुराण सांगते,

*'जेव्हा एखाद्या मतावर तुमचा निश्चय दृढ होईल तेव्हा ईश्वरावर भरोसा करा, ईश्वराला ते लोक प्रिय आहेत जे त्याच्या भरवशावर काम करतात .'* (पवित्र कुराण *३:१५९*)

येथे ईश्वरावरील श्रध्दा म्हणजे असा दृढविश्वास की ईश्वर तुम्हाला तुमच्या धडपडीत मदत करील व तुम्ही यशस्वी व्हाल.

- अंतिम पैगम्बर (स.) यांनी सांगितले,

*'आपण ईश्वराकडे जे काही मागतो ते दृढनिश्चयाने मागा.'* (हदिस)

*'ईश्वर सांगतो, लोकांच्या माझ्याकडून ज्या अपेक्षा असतात त्यानुसार मी त्यांना वागवितो.'* (हदिस)

म्हणून नेहमी सकारात्मक वृत्ति व भावना बाळगा तसेच आयुष्य आणि ईश्वर ह्यांच्याकडूनही नेहमी चांगल्या गोष्टींचीच अपेक्षा करा.

## *प्रकरण क्र. ११*

# श्रद्धा - अत्यंत महत्त्वाची सकारात्मक भावना
# Faith - The Most Important Positive Emotion

- पूर्वी रोम आणि इराण ही जगातील एकमेव सुपरपॉवर राष्ट्रे होती. इराणचे साम्राज्य हे पश्चिमेला सौदी अरेबियापर्यंत पसरले होते. इराणचे लोक हे अग्निची पूजा करीत होते आणि ते त्यांच्या राज्यात अन्य धर्माच्या लोकांवर त्यांचा धर्मपालन करण्यास बंदी घालत होते. जेव्हा इस्लामचे दुसरे खलिफा हजरत उमर (रदियल्लाहु अन्हू) यांना असे समजले की, ज्या अरबांवर इराणी राज्य करीत आहेत त्या अरबांना त्यांनी एकमेव ईश्वराची पूजा करण्यास बंदी घातली आहे व त्यांच्यावर दबाव आणला आहे, तेव्हा त्यांनी अरबांना इराण्यांपासून मुक्त करण्याचा निश्चय केला. म्हणून इ.सन ६४० मध्ये त्यांनी हजरत-सादबिन अबिवकास (रदियल्लाहु अन्हू) यांची सैन्याचा प्रमुख म्हणून नेमणूक केली, त्यांच्या हाताखाली ३० हजार शिपायांचे सैन्य दिले व त्यांना इराणी जुलूम व दबावातून अरबांची सुटका करा अशी आज्ञा दिली.

हजरत-सादबिन अबिवकास (रदियल्लाहु अन्हू) ने इराकपर्यंत प्रत्येक ठिकाणी इराणी सैंनीकांचा पराभव केला. परंतु शेवटी त्यांच्यासमोर असा एक प्रश्न उभा राहिला की जो त्याच्या नियंत्रणाबाहेर होता. माघार घेणाऱ्या इराणीं सैनिकांनी फरात नदीवरील सर्व पूल उध्वस्त केले व सर्व नौका बुडवून टाकल्या. पूल किंवा नौकेशिवाय हजरत-सादबिन अबिवकास (रदियल्लाहु अन्हू) यांना नदी ओलांडून

जाणे व इराणीं लोकांना इराकच्या उरलेल्या भागांतून हाकलून देणे अशक्य झाले होते.

हजरत-सादबिन अबिवकास (रदियल्लाहु अन्हू) हे एक उत्कृष्ट योद्धा होते ह्याबद्दल वादच नाही, तथापि ते साधूसारखे वागणारे व धार्मिक वृत्तिचे मनुष्य होते. त्यांनी त्यांचे सैन्य गोळा केले व त्यांना एक स्फुरण आणणारे भाषण दिले. त्या भाषणाचे थोडक्यात सार असे होते,'आपण ईश्वराचा संदेश पसरविण्यासाठी आपला जीव (प्राण)पणाला लावला. ईश्वर आपला नाश होऊ देणार नाही. तो आपल्याला मदत करेल आणि आपल्याला प्रत्येक संकटातून वाचवेल. ही फरात नदी आपल्याला थांबवू शकत नाही वा आपले नुकसानही करणार नाही. म्हणून घाबरू नका. तिच्यामध्ये उड्या मारा आणि पलीकडच्या किनाऱ्यावर पोहोचा.'

हजरत-सादबिन अबिवकास (रदियल्लाहु अन्हू) आणि त्यांचे ३० हजार कडवे सैनिक ह्यांनी त्यांच्या घोड्यांसकट फरात नदीत उड्या मारल्या, व घोड्यांच्या पाठीवर बसून न बुडता नदीपार करून गेले. जेव्हा इराणच्या सैन्याने अरबांच्या सैन्याला घोड्यांवर बसून नदी पार करताना पाहिले त्यांनी आरोळ्या ठोकल्या 'जीन आले', 'जीन आले' व फक्त त्यांचा नेता हरजाद व काही सैनिक ह्याच्याशिवाय अन्य इराणी सैनिक पळून गेले. जगाच्या इतिहासामध्ये पहिल्यांदाच अशी घटना घडलेली आढळते की, ३० हजार सैनिकांनी घोड्यावर बसून नदी ओलांडून पार केली, हा एक मोठा चमत्कार होता.

• हा चमत्कार कशामुळे घडला? केवळ श्रद्धा ! ईश्वरावरील दृढ विश्वास ह्यामुळेच हा घडून आला. केवळ श्रद्धेनेच असे चमत्कार घडतात. फक्त इस्लाममध्येच नव्हे तर सर्व धर्माच्या धार्मिक व्यक्तिंनी असे पुष्कळ चमत्कार घडवून दाखविले आहेत. ज्यामुळे हे आश्चर्य घडून आले याचे एकमेव कारण म्हणजे विश्वास दृढविश्वास बाकी काही नाही.

येशू ख्रिस्त असे पुष्कळ चमत्कार करीत होते व ते महारोग्यांना बरे करीत होते. अंधांना दृष्टी देत होते. तसेच ईश्वराच्या परवानगीने मेलेल्या माणसांना पण जिवंत करीत होते. बायबलमधील खालील ओळी त्याच्या चमत्कारांतील श्रद्धेचे महत्त्व दाखवून देतात.

*'येशू जेव्हा घरामध्ये आले, तेव्हा आंधळी माणसे त्याच्याजवळ आली व येशू ख्रिस्त त्यांच्याजवळ बसले. येशू ख्रिस्त म्हणाले, मी हे करू शकेन असा विश्वास वाटतो का? ते म्हणाले होय देवा ! नंतर येशूने त्यांच्या डोळ्यांना स्पर्श करून म्हटले:*

*तुमच्या श्रद्धेनुसार तुमचा आजार दुर होईल जेव्हा अंध व्यक्तींनी डोळे उघडले तेव्हा त्यांना दुष्टी प्राप्त झाली होती. नंतर येशूने त्याना सक्त ताकीद दिली, की हे कोणालाही सांगु नका.'* (मॅथ्यू ९:२८-३०)

तुमच्या श्रद्धेनुसार तुमचा आजार दुर होईल.' ह्या त्याच्या म्हणण्याचा अर्थ असा आहे की, ज्यांचा विश्वास आहे त्यांच्याच बाबतीत चमत्कार घडून येतील किंवा विश्वासामुळे चमत्कार घडून आले. ही ओळ विश्वासाचे महत्त्व स्पष्ट करते.

## श्रद्धा (विश्वास) म्हणजे काय?

श्रद्धा म्हणजे मूलतः दृढ विश्वास, पूर्ण खात्री.

- श्रद्धा (किंवा विश्वास) ही एक सकारात्मक महत्त्वाची भावना आहे, त्याच्याशिवाय सर्व सकारात्मक भावना ह्या अपूर्ण आहेत. श्रद्धा ही मूळांत आशावादी भावना आहे. तुमच्यामधील श्रद्धा म्हणजेच तुम्हाला तुमच्या क्षमतेबद्दल यश मिळविण्याची खात्री आहे, ईश्वरावर श्रद्धा म्हणजे तुम्ही परमेश्वर आहे हे मानता, आणि परमेश्वर तुम्हाला मदत करील व यश देऊन कृपा करील. श्रद्धेची अनुपस्थिती म्हणजे संशय. तुम्हाला तुमच्या क्षमतेबद्दल व ईश्वराच्या अस्तित्वाबद्दल सांशकता आहे. त्याच्या मदतीबद्दल व कृपादृष्टीबद्दल संशय आहे. त्यामुळे यश न मिळता तुमचा संशय खरा होईल म्हणजेच अपयश.

• जर एखादा सभ्य गृहस्थ सतत गुन्हेगारांच्या सहवासात असेल तर तो गुन्हेगार होऊ शकतो. कारण 'गुन्हा हा जीवनाचा एक भाग आहे' हाच विचार त्याच्या मनात सतत घोळत असतो. हा जो विचार सतत पुन्हा पुन्हा मनात येत असतो, शेवटी अर्धजागृत मन त्याचा स्वीकार करते. हा अर्धजागृत मनावर अधिकार गाजविणारा विचार हा सर्व विचार करण्याच्या प्रक्रियेवर नियंत्रण करतो. जसे माणसाचे विचार असतात तसेच त्यांचे कार्य असते. म्हणून जे गुन्हगारांपासुन दूर राहात नाही ते लोक गुन्हा करण्यास सूरूवात करतात.

विचाराची पुनरावृत्ति जी अर्धजागृत मनावर प्रभाव करते तिला 'स्वयंचलित सूचना'(Auto suggestion) असे म्हणतात.

जेव्हा मनात विश्वासाची भावना कमी असते तेव्हा स्वंयसुचनेद्वारे आपण विश्वास निर्माण करू शकतो.

• नेपोलियन-हिल यांच्या म्हणण्यानुसार,

'श्रद्धा हे एक कायमस्वरुपी अमृत आहे जे विचारांना जीवनशक्ति व प्रेरणा देते.

श्रद्धा हा सर्व मूल्यवान संपत्तिचा साठा करणाऱ्या क्रियांचा सुरूवातीचा (Starting Point) बिंदू आहे.

असे जे काही चमत्कार असतात, जे शास्त्रीय नियमानुसार परीक्षण केले जात नाहीत या सर्व चमत्कारांचा पाया श्रद्धा आहे.

श्रद्धा हाच अपयशावर एकमेव तोडगा आहे.

श्रद्धा हे एक मूलद्रव्य आहे व जेव्हा ते प्रार्थनेमध्ये मिसळले गेले की, ईश्वराशी थेट संपर्क करून देते.

• विश्वास (श्रद्धा) हा एक साहाय्यक (Catalyst) असून तो साधी विचारशक्ति ही मोठ्या स्पंदनकारक विचारशक्तित रुपांतरीत करतो. जी पुढे अर्धजागृत मनाद्वारे सृष्टीमातेकडे पोहोचते.

- धार्मिक पुस्तके ही साध्या शब्दांत ईश्वरी स्पष्टीकरणे देतात, ज्यामुळे सामान्य माणसाला ती सहज समजू शकतात.

अंतिम पैगम्बर (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) यांनी सांगितले.

*'ईश्वर सांगतो, मी  लोकांना त्यांच्या माझ्याकडून अपेक्षा असतात त्यानुसार वागवितो.'* (हदिस

याचा अर्थ असा आहे की, एखादा असा विचार करीत असेल की, ईश्वर त्याच्यावर दया करील व जीवनाच्या प्रत्येक मार्गावर त्याला यशस्वी करील.' तेव्हा खरोखर ईश्वर त्याला जीवनाच्या प्रत्येक मार्गावर यश मिळविण्यासाठी मदत करील.'

व जेव्हा व्यक्ति असा विचार करते की, ईश्वराने त्याला दुर्दैवी बनविले आहे तेव्हा तो जीवनात यशस्वी होणार नाही. आणि अपयशी ठरेल. त्याच्या कल्पनेप्रमाणेच सर्व गोष्टी घडत राहातील व तो अयशस्वी होईल.

- तुम्ही ज्याप्रमाणे विचार करता, धार्मिकपणे किंवा शास्त्रीयदृष्ट्या, तरी ही वस्तुस्थिती कायम असते की, मनांतील प्रभावी विचार ह्याचा माणसाच्या यशामध्ये विशेष प्रभाव असतो.

म्हणून व्यवसायांत आणि जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रामध्ये यशस्वी होण्यासाठी तुमची वृत्ति सकारात्मक असली पाहिजे, तसेच मी यशस्वी होणार हा दृढ विश्वास व श्रद्धा पाहिजे. तसेच आपली स्वतःवर तसेच ईश्वरावर दृढ श्रद्धा असली पाहिजे.

*प्रकरण क्र. १२*

# निसर्गमाता

## (Mother Nature)

निसर्गमाता आणि ईश्वर ह्यांच्यातील फरक :-

- ईश्वराने हे जग निर्माण केले आहे व एकटाच त्याचे पालनपोषण करतो. त्याला जगाचे पालनपोषण करण्यासाठी कोणाच्या मदतीची गरज भासत नाही.

- ईश्वराने प्रत्येक पदार्थाचे रूप, प्रत्येक तऱ्हेची शक्ति, या जगाची संपूर्ण व्यवस्था ह्यांची निर्दोषपणे निर्मिती केली आहे व त्यांच्यात कोणताही दोष नाही.

- ईश्वराने फक्त विश्व व त्यातील प्राणी यांचीच परिपूर्ण निर्मिती केली नाही, तर त्याने परिपूर्ण स्वयंचलित यंत्रणा पण निर्माण केली. जी ईश्वराची आज्ञा व इच्छेनुसार ह्या ब्रम्हांडाची व त्यातील सर्व वस्तूंची कायम देखरेख करते व त्यांना चांगल्या स्थितीत ठेवते.

- ही नियंत्रण करणारी पद्धत इतकी सक्षम आहे की, कोणीही व्यक्ति आजपासूनच्या हजारो वर्षे पूर्वी आकाशातील ताऱ्यांची पूर्वीची किंवा नंतरची स्थिती ह्याचे अचूकपणे निदान करू शकते.

• विश्वाला नियंत्रण करणारी शक्ति देवदुत (Angels) असु शकते, जी ईश्वराने बनवलेले नियम व कायदा याच्यानुसार कार्य करते. किंवा ईश्वराने ह्या जगाचे नियंत्रण करण्यासाठी एखादी रुपांतरित शक्ति(Energy) आणि नियमावली (Software) असू शकते. खरी गोष्ट ईश्वरालाच माहिती आहे. आपण फक्त आपल्या अनुभवाप्रमाणे निरीक्षण करतो. विचार करतो आणि निर्णय घेतो.

माझ्या कल्पनेप्रमाणे ही ईश्वराने निर्माण केलेली स्वयंचलित नियंत्रक पद्धती आहे. तिला मी 'निसर्गमाता' असे म्हणतो. माझी खालील दिलेली निरीक्षणे असे सिद्ध करतात की निसर्गमाता आहे.

**१)** पक्षी दरवर्षी हजारो मैल स्थलांतर करतात. ते चुकीच्या मार्गावर दिशाभूल होऊन जाऊन मरत नाहीत. एखाद्या गूढ नियंत्रण पद्धति किंवा सामर्थ्यामुळे ते योग्य वेळी स्थलांतर चालू करतात, योग्य ठिकाणी पोहोचतात व योग्यवेळी परत येतात. त्यांना मार्गदर्शन कोण करतो?

**२)** ५०० किलोपेक्षा जास्त वजन असलेली कासवे सौदी अरेबियाच्या समुद्र किनाऱ्यावर येतात, अंडी घालतात आणि समुद्रात परत जातात व लॅटिन अमेरिकेपर्यंत पोहत जातात. अंडी ही योग्य काळापर्यंत उबल्यानंतर फुटतात. त्या अंड्यामधून छोटी कासवे बाहेर येतात व ताबडतोब सुरक्षित राहण्यासाठी समुद्राच्या दिशेने पोहावयास लागतात. काहीना ससाणे व गरुडपक्षी घेऊन जातात परंतु बरीचशी कासवे वाचतात.

ह्या अंड्यातील पांढऱ्या आणि पिवळ्या घटकांचे कासवामध्ये रुपांतर कोण करतो? आपली सुरक्षित जागा ही जमिन नसून समुद्र आहे ही गोष्ट काही क्षणापूर्वी जमिनीवर जन्माला आलेल्या कासवांच्या मनावर कोण बिंबवतो? पूर्ण वाढ झाल्यावर आपणांस आपल्या मूळ म्हणजे हजारो मैल दूर असलेल्या सौदी अरेबियामध्ये परत अंडी घालण्यासाठी यावयाचे आहे ही गोष्ट त्यांना कोण सांगतो?

**३)** जर एखाद्या काही महिने वयाच्या लहान मुलाच्या डोळ्यास खाज सुटली तर तो त्याची बोटे व नखे डोळ्यांत घालून डोळा जखमी करणार नाही, तर तो त्याच्या तळहाताच्या व बोटांच्या सांध्याने त्याचे डोळे चोळतो जो एक सुरक्षित उपाय आहे. हा सुरक्षितपणाचा उपाय त्या लहान मुलाला कोण शिकवतो?

**४)** आपण १०० लिटर पाणी हे काही यार्डापर्यंत नेऊ शकत नाही. हजारो व हजारो टनांनी पाणी हे समुद्रापासून आकाशात नेले जाते. तेथून ते हजारो मैल दूरवर वाहून नेले जाते, नंतर पावसाच्या लहान थेंबामध्ये त्याचे रुपांतर होऊन शिडकाव होतो. हे काम कोण करतो?

ढगांच्या निर्मितीसाठी व वाहतुकीसाठी एक शास्त्रीय कारण आहे तीच गोष्ट पाण्याच्या थेंबाच्या बाबतीत लागू पडते. परंतु शास्त्रीय कारण समजून घेतले तरी ह्याचा अर्थ असा नाही की, त्यावर कोणाचेही नियंत्रण नाही. या सर्व गोष्टींवर नियंत्रण करणारी अनाकलनीय पद्धत आहे पण ती शास्त्रीय आहे.

उदा. पाण्याच्या लहान थेंबापेक्षा, जर मोठ्या प्रमाणात पाणी आकाशातून पडू लागले किंवा पाण्याच्या ऐवजी जर बर्फाचे मोठे तुकडे अवकाशातून पडू लागले तर ही नैसर्गिक घटना पण शास्त्रीय कारणीमांसा देऊन समजावली व स्पष्ट केली जाऊ शकते. परंतु स्पष्टीकरण हे मानवाचे जीवन बुडणे व मरणातून वाचवू शकत नाही. ह्या अनावश्यक आणि खतरनाक गोष्टींना कोण प्रतिबंध घालतो?

**५)** पूर्वी व्हेल व डॉल्फिन मासे हे जमिनीवर राहात. पण ते पाण्यात राहाणे जास्त पसंत करीत होते. त्यामुळे शरीराच्या ज्या भागांचा उदा. पाय वगैरे ह्यांचा ते उपयोग करीत नव्हते ते हळूहळू नष्ट झाले व जे भाग ज्यांचा ते नियमितपणे उपयोग करीत होते ह्यांची वाढ होण्यास सुरुवात झाली. उदा. फुफ्फुसे, पोहण्यासाठी पुढील पाय वगैरे. व्हेल मासे नाकपुड्यांनी श्वास घेतात व ते श्वास बराचवेळ रोखून धरू शकतात. आज ते पूर्णपणे माशासारखेच आहेत.

त्यांचे समुद्रजीवनासाठी रुपांतर कोणी केले? हे निसर्गमातेने केले. निसर्गमातेचे एक तत्त्व आहे की सजीव प्राणी जो शरीराचे भाग नियमितपणे जगण्यासाठी वापरतो, त्यांची वाढ होते व ते परिपूर्ण होतात व जो भाग नियमित वापरला जात नाही तो हळूहळू नष्ट होतो.

हा उत्क्रांतिचा सिद्धांत (Theroy of evolution) आहे व तो आधिभौतिक विकास (Matrialistic development) आणि नाश स्पष्ट करतो. निसर्गमातेजवळ असेच आध्यात्मिक व बौद्धिक पातळीवरीलसुद्धा तत्व आहे. उदा. एखादी व्यक्ती आपल्या मनात कोणतीही प्रबळ इच्छा, अंमल गाजविणारा विचार व भिती, वगैरे धरून ठेवू देत, निसर्गमाता ही ते विकसित करण्यासाठी व प्रत्यक्षात आणण्यासाठी योग्य ती कारवाई करते.

**६)** लांब अंतराच्या उड्डाणात, पायलट हे विमान 'ऑटो पायलट' मध्ये ठेवतात व विश्रांति घेतात. ही स्वयंचलित वैमानिकाची यंत्रणा (ऑटो पायलट सिस्टिम) विमान हे योग्य मार्गावर ठेवते, त्याची उंची व विमानाच्या इतर गरजांची योग्य देखभाल करते, परंतु आणीबाणीच्या वेळी किंवा जमिनीवर उतरतांना, पायलट ऑटो पायलट यंत्रणा बंद करतो व त्याचा परत ताबा घेतो. ही स्वयंचलित वैमानिकाची यंत्रणा म्हणजे निसर्गमाता व पायलट म्हणजे ईश्वर हा असतो. निसर्गमाता संपूर्ण जगाचे नियंत्रण करते. ईश्वर निसर्गमातेचे नियंत्रण करतो व योग्य ते निर्णय घेतो जे निसर्गमाता घेऊ शकत नाही.

**७)** निसर्गमातेला नीट समजून घेण्यासाठी आपण कॉम्प्युटरने वितरित केलेल्या स्वयंचलित टेलिफोन बिलाचे उदाहरण घेऊ या.

## कॉम्प्युटर म्हणजे काय?

कॉम्प्युटर बनविणारे कारखानदार मुख्यतः तीन प्रकारच्या वस्तूंचा कॉम्प्युटर तयार करताना वापर करतात.

१) अ-वाहक (Non-conductor) वस्तू उदा. ग्लास, प्लॅस्टिक धागा,

२) अर्ध-वाहक (Semi-conductor) उदा. सिलिकॉन

३) वाहक (Conductor) उदा. तांबे, चांदी, जस्त इत्यादि.

ते कन्डक्टरची तार (तांबे, जस्त) ही सेमी-कन्डक्टरला (Silicon) जोडतात व दोघांना (Non-conductor) वर assemble करतात व एक पूर्ण आणि Complicated circuit तयार करतात. त्या सर्कीटमधुन विजप्रवाह दोन्ही बाजुंनी वाहु शकतो परंतु त्याचा परिणाम वेगवेगळा असतो.

वीजप्रवाह वाहात असतांना एका दिशेने उत्पन्न झालेला परिणाम हा एक असा मानला जातो व जेव्हा प्रवाह दुसऱ्या विरुद्ध दिशेने वाहातो तेव्हा निर्माण झालेला परिणाम हा शून्य (Zero) म्हणून विचारात घेतला जातो.

आपण शून्यापासून नऊपर्यंत दहा अंकाना ओळखतो. पण इलेक्ट्रॉनिक सर्किट (circuit) हे फक्त दोन नंबरच मान्य करते, ते म्हणजे एक आणि शून्य. ह्यालाच बायनरी सिस्टिम असे म्हणतात. या सर्किटची रचना गुंतागुंतीची व अशा अचुक पद्धतीने केलेली असते की, ते सर्किट मेंदूप्रमाणे काम करते. व शून्य आणि एक या फक्त दोन अंकाच्या ज्ञानावर ते सेकंदाच्या एका परिमाणात मोठमोठे हिशेब करण्याचे कार्य करते.

की-बोर्डाच्या मदतीने तपशील पुरविण्याची तरतूद केलेली असते, दर्शकाच्या (monitor) साहाय्याने तपशील (किंवा माहिती) दिसेल अशी सोय केलेली असते व मुद्रकाच्या (printer) मदतीने ते निष्कर्ष बाहेर येण्याची व्यवस्था असते. वरील सर्व कार्यांचे नियंत्रण

करण्यासाठी एक सॉफ्टवेअर ही सेंट्रल प्रोसेसिंग युनिटमध्ये (C.P.U.) टाकलेली असते. जेव्हा अशी प्रणाली ही संबंधित सॉफ्टवेअरने दूरध्वनि केंद्राला जोडलेली असते, तेव्हा ती आत येणारे(in-coming)व बाहेर जाणारे (out-going) कॉल्स ह्यांची नोंद करते, जास्त वापराच्या मर्यादेवर नियंत्रण करते, वैध तारीख झाल्यानंतर प्रणाली संपर्क तोडते व बिल तयार करते.

जर पुन्हा आपण संपूर्ण प्रणालीचे पृथ्थकरण केले, तर तिच्यामध्ये फक्त अ-वाहक, अर्धवाहक आणि वाहक, सॉफ्टवेअर आणि विद्युतशक्ति असते. जेव्हा सिस्टिममधून विद्युतप्रवाह वाहतो, तेव्हा त्यात जीव नसला, बुद्धि नसली तरीही तो सिस्टिम अचूकपणे काम करतो. सॉफ्टवेअरने हुकूम दिलेल्या किंवा त्यात वर्णन केलेल्या सूचनांखेरीज तो सिस्टिम अन्य कुठलेही कार्य करणार नाही.

निसर्गमाता ही सुद्धा एक अशीच उत्कृष्ट स्वयंचलित प्रणाली असून जिची निर्मिती, ईश्वराने या जगाचे नियंत्रण करण्यासाठी केली आहे. ती प्रणाली ईश्वराच्या आज्ञेप्रमाणे काम करते व तिला जी गोष्ट सांगितली नाही ती अजिबात करीत नाही.

निसर्गमाता ही देवदूतांचे एक सैन्यदल असू शकते, किंवा कॉम्प्युटरप्रमाणे जीव नसलेली एक वस्तू असू शकते, त्यात फक्त शक्ति व बुद्धी आहे पण शरीर नाही.

८) आपला शरीरावर पूर्ण ताबा असतो, पण जर आपण खोलपणे विचार केला तर आपल्याला असे कळते की, जरी शरीर हे आपले असले तरी त्याची देखभाल दुसरेच कोणीतरी करीत असते. ही देखभाल करणारी एक प्रकारची शक्ति आहे. तसेच ती एक प्रकारचा सॉफ्टवेअर असून त्याच्या आदेशानुसार आपले शरीर काम करते व त्याची देखभाल होते.

उदा. आपल्या हृदयाच्या कोपऱ्यात एक प्रवाह (Current) आपोआप निर्माण होतो व तो दुसऱ्या बाजूच्या दिशेने प्रवास करतो, ज्यामुळे हृदय हे आकुंचन व प्रसरण पावते. अशा तऱ्हेने हृदयाचे

ठोके पडत असतात. हा प्रवाह (Current) कोणी तयार केला?

जर आपण संडासात गेलो, तरी आपली विष्टा (Stool) ही आपोआप कधीही शरीराबाहेर येणार नाही. कारण विष्टा होण्यासाठी आपल्या शरीरात आतड्यांची स्वंयचलीत हालचाल होत असते. जी गांडुळाच्या हालचालीसारखी असते. जोपर्यंत ही हालचाल होत नाही तोपर्यंत विष्टा शरीराबाहेर येत नाही. जुलाब किंवा हगवण होणे ही अपवादात्मक गोष्ट आहे. ज्यांना बद्धकोष्ठ आहे त्यांना विचारून पहा ! त्यांनी कितीही जोर काढून सुद्धा विष्टा आपोआप बाहेर येत नाही. आतड्यांच्या आपोआप हालचालीचे काम कोण करतो? ह्याचप्रमाणे अशा अन्य बऱ्याच गोष्टी उदा. पचन, झोप, संभोग, श्वसन, रोगाविरूद्ध प्रतिकारशक्ति वगैरे वगैरे ह्या सर्व क्रिया स्वयंचलित आहेत व कोणीतरी आपल्यासाठी त्या करीत असतो.

ह्या क्रिया करणाऱ्याची तुम्ही निश्चित व्याख्या देऊ शकाल?
तुमचा आत्मा?
नाही.

कोणीतरी एकदा ईश्वराचे प्रेषित मुहम्मद पैगम्बर (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) यांना विचारले, 'आत्मा म्हणजे काय? तेव्हा ईश्वराने आयत अवतरीत केली, की

*आत्मा ही ईश्वराची आज्ञा किंवा हुकूम आहे*. (पवित्र कुराण १७:८५

ह्या माहितीप्रमाणे तसेच अन्य पुस्तकामधून आकडे व तपशील ह्यांचा अभ्यास केल्यावर मला असे वाटते की, आत्मा एक अनाकलनीय शक्तिचा प्रकार असून, त्याच्यात पण एक सॉफ्टवेअर आहे. तथापि ते शरीराची कामे नियंत्रित करत नाही. शरीराच्या कार्यावर दुसऱ्या एखाद्या शक्तिचा आणि सॉफ्टवेअरचा ताबा आहे. कारण हृदयविकाराच्या (Heart-attack)वेळी हृदयाचे ठोके थांबतात. आत्मा हा हृदयाची धडधड कधीही बंद करू शकत नाही. आणि जर त्याने असे केले तर ते आत्महत्या केल्याप्रमाणे आहे. आत्महत्या करण्यास

मनाई आहे व ती करणे एक पाप आहे. आत्मा असे करत नाही. वस्तुस्थिती अशी आहे कि अखेरच्या श्वासापर्यंत आत्म्याला शरीर सोडण्याची इच्छा होत नसते. ईश्वरही असे करत नाही. कारण ईश्वराला एखाद्याचे हृदय बंद करणे वा आतड्यांची हालचाल थांबविणे ह्या कामांखेरीज इतर अन्य महत्त्वाची कामे आहेत.

मेंदू आणि अर्धजागृत मन सुद्धा हृदयाची धडधड बंद करणार नाही. कारण लहान बालकाच्या हृदयाची धडधड ही आईच्या गर्भाशयांतच चालू होते, तेव्हा बालकाचा मेंदू व अर्धजागृत मन ह्यांचा विकास अजून व्हायचा असतो. अर्धजागृत मनसुद्धा त्याचे नियंत्रण करू शकत नाही.

मानवाच्या गूढ अशा नियमन करणाऱ्या स्वयंचलित प्रणालिप्रमाणेच अशीच एक स्वयंचलित पद्धति या ब्रम्हांडामध्ये आहे जिला मी निसर्गमाता असे म्हणतो.

) जेव्हा ईश्वराला एखादया गोष्टीची निर्मिती करावीशी वाटते, तेव्हा तो सांगतो,

*'ज्याअर्थी तो निर्मितीत निष्णांत आहे. तो तर जेव्हा एखाद्या वस्तुचा संकल्प करतो तेव्हा त्याचे काम फक्त एवढेच कि तिला आज्ञा द्यावी की अस्तित्व धारण कर, आणि ती अस्तित्वात येते'* (पवित्र कुराण ३६:८२

अशारितीने ईश्वराने हे ब्रम्हांड व त्यामधील सर्व गोष्टीसुद्धा निर्माण केल्या आहेत. पण माझ्या मतानुसार ह्या विश्वाची देखभाल करण्यासाठी ईश्वर नेहमीच 'होऊ दे' असे म्हणणार नाही. पण त्याने अशी काही अज्ञात प्रणाली तयार केलेली असावी, जी ईश्वराच्या इच्छा आणि आज्ञानुसार ब्रम्हांडाची देखभाल करण्याचे काम तडीस नेते. मी या प्रणालीला निसर्गमाता असे म्हणतो. ह्या स्वयंचलित प्रणालीचा अन्य जनांना पण अनुभव येतो व ते त्याला म्हणतात 'खुदा की कुदरत !' (ईश्वराची सामर्थ्य-लिला)

***प्रकरण क्र. १३***

# ईश्वराची ओळख

## (Introduction to God)

• असे समजा की, तुमच्या हातात एक काचेचा ग्लास आहे. हा ग्लास व त्यामधील पाणी दोन्ही पारदर्शक आहेत. तुम्ही त्यामध्ये पाहू शकता. त्याच्याकडे बघू शकता व त्याच्या आरपार पण पाहू शकता. ग्लास तुमच्या हातात असल्याने तुमचे त्यावर पूर्ण नियंत्रण आहे.




• त्याचप्रमाणे हे सर्व जग ईश्वराला पारदर्शक आहे. तो त्याकडे बघू शकतो व तो त्याच्यामध्ये पण पाहू शकतो आणि त्याच्या आरपारही पाहु शकतो. हे संपूर्ण जग ईश्वराच्या दोन बोटांमध्ये आहे. तो त्याच्या इच्छेप्रमाणे जगात काहीही करू शकतो आणि त्याचा जगावर पूर्ण ताबा आहे. (ईश्वराला आकार नाही, स्पष्टीकरणासाठी उदाहरण म्हणुन बोटांचे उदाहरण दिले आहे.)




*ईश्वराला आपल्या हृदयातील विचारांचेही ज्ञान आहे. हे खालील श्लोकातुन सिध्द होते.*

- *ईश्वर सांगतो,*

*'आकाशात व पृथ्वीमध्ये जे काही आहे ते सर्व ईश्वराचे आहे. तुम्ही आपल्या मनांतील गोष्टी प्रकट करा अथवा लपवा ईश्वर कोणत्याही परिस्थितीत तुमच्याकडून त्याचा हिशेब घेईल. मग त्याला हा अधिकार आहे, की त्याने हवे त्याला माफ करावे आणि हवे त्याला शिक्षा द्यावी. प्रत्येक गोष्टीवर त्याला सामर्थ्य आहे.'* (पवित्र कुराण २ : २ )

*'तुमची गरज काय आहे ह्याचे ज्ञान तुमच्या वडिलांना (ईश्वराला) आहे.'* (पवित्र बायबल, Matt : )

*'त्यांनी (लोकांनी) बोलावण्यापूर्वी मी (ईश्वर) उत्तर देईन.'*
(पवित्र बायबल, ५ : २

- आपण मानवप्राणी हे ईश्वराला पारदर्शक आहोत. तो आपल्या हृदयाचा प्रत्येक ठोका ऐकतो. तसेच आपल्या अंतःकरणाच्या

अगदी खोल तळातील विचारसुद्धा त्याला कळतो. तो आपल्याकडे पाहातो, तो आपल्यात बघतो व तो आपल्यामधून आरपार पाहतो. तो आपला निर्माणकर्ता आहे.

*आपणास स्वत:बद्दल जी माहिती आहे त्याच्यापेक्षा त्याला आपल्याविषयी जास्त माहिती आहे.* (पवित्र कुराण ६७:१४

तो आपल्यावर प्रेम करतो. तो आपले रक्षण करतो. तो आपले पालनपोषण करतो. या पृथ्वीलोकावर जीवन कसे जगावयाचे ह्यासंबंधी त्याने बरेच मापदंड निश्‍चित केलेले आहेत. जर एखादी व्यक्ति त्याच्या हुकुमांचे पालन करते तेव्हा ईश्वर त्याचे या पृथ्वी ग्रहावरील जीवन सुखकर करतो. तो त्याचे जिवन मुत्युनंतर सुखी करेल जिथे मणुष्य आत्मा किंवा शक्तिच्या रूपात असेल.

- बांधकामदार (बिल्डर) हा इमारती बांधतो, गिऱ्हाईकांना त्यातील फ्लॅट विकतो, त्यांची संस्था बनवितो व इमारतीच्या मालमत्तेचे व्यवस्थापन फ्लॅटच्या मालकांच्या हाती सुपूर्द करतो.

ईश्वराने हे जग निर्माण केले आहे व त्यात बऱ्याच जीवांना राहाण्याची अनुमती दिली आहे. पण त्याने त्याचे व्यवस्थापन जीवांच्या हातात दिलेले नाही. तो सजीवाच्या प्रत्येक हालचालीवर ताबा ठेवतो. हे विश्व ईश्वराच्याच मालकीचे आहे. त्याने ह्या पृथ्वीतलावर जीवन कसे जगावयाच, ह्यासंबंधीचे काही नियम आखून दिलेले आहेत. जर मानवाने त्यांचे पालन केले तर त्यांचे जीवन सुखी व भरभराटीचे होते. जर त्या नियमांकडे दुर्लक्ष केल्यास मानवाचे आयुष्य दुःखी व कठीण बनते. विपन्नावस्था, अपमान, कष्ट, अन्याय, दडपण इत्यादि मानवानेच पेरलेल्या कर्माची फळे आहेत. ईश्वर हा कोणाचेही नुकसान करीत नाही.

- त्याच्या अगदी अंतिम वाणी (पवित्र कुराणात) ईश्वर सांगतो,

*काळाची शपथ, मानव वस्तुत: तोट्यात आहे, त्या लोकांखेरीज ज्यांनी श्रद्धा ठेवली आणि सत्कर्मे करीत राहिले. आणि एकमेकांना सत्याचा*

*उपदेश आणि संयमाचा आदेश देत राहीले.* *(पवित्र कुराण १०३)*

दुसऱ्या जागी ईश्वर असे सांगतो,

*'जो कोणी सत्कर्म करील मग तो पुरुष असो अथवा स्त्री मात्र तो श्रद्धावंत असावा. तर त्याला आम्ही निर्मळ सुखदायी जीवन देऊ आणि (परलोकात) अशा लोकांना त्यांचा मोबदला त्यांच्या उत्तम कृत्यानुसार प्रदान करु'* (पवित्र कुराण १६:९७)

ईश्वर असेही सांगतो,

*'शपथ आहे अंजीर व जैतुनची, आणि तुर-ए-सीना आणि या शांतातापूर्ण (मक्का) शहराची, आम्ही मानवाला उत्कृष्ट रचनेत निर्माण केले, मग उलट फिरवून आम्ही त्याला निकृष्टात निकृष्ट करुन टाकले, त्या लोकांखेरीज ज्यांनी श्रद्धा ठेवली आणि सत्कृत्ये करीत राहिले की त्यांच्यासाठी कधी न संपणारा मोबदला आहे. तर (हे पैगंबर) यानंतर कोण मोबदला व शिक्षेच्या बाबतीत तुम्हाला खोटे ठरवू शकतो? काय ईश्वर सर्व शासकांपेक्षा मोठा शासक नाही?* (पवित्र कुराण ९५ : १-८)

पवित्र कुराणाच्या दुसऱ्या प्रकरणात तो असे सांगतो,

*'ईश्वर कोणत्याही व्यक्तीवर त्याच्या शक्तीपेक्षा जास्त जबाबदारीचे ओझे टाकीत नसतो. प्रत्येक व्यक्तीने जे पुण्य कमविले आहे, त्याचे फळ त्याच्यासाठीच आहे आणि जे पाप गोळा केले आहे त्याचा दुष्परिणाम त्याच्यावरच होणार आहे'* (पवित्र कुराण २:२८६)

- यश आणि भरभराट ह्यांच्यासाठी धडपड करतांना ईश्वराकडे वैयक्तिक पातळीवर किंवा सामाजिक व राष्ट्रीय स्तरावर दुर्लक्ष होता कामा नये. प्रत्येकाचा ईश्वरावर विश्वास असलाच पाहिजे व त्याचे योग्य मार्गाने अनुकरण केले गेले पाहिजे.

- जगामध्ये पूर्वी पुष्कळ संस्कृति होऊन गेल्या. इतिहासाच्या पुस्तकात आपण त्यांचा सुसंस्कृतपणा, त्यांचे वैभव व त्यांनी बांधकाम केलेली आश्चर्यकारक स्मारके इत्यादिंचा अभ्यास करतो. तथापि इतिहासकार हे त्यांच्या ऱ्हासाची व अचानक शेवट होण्याची काहीही

कारणे सांगू देत, आपण ती अकस्मात बरखास्त का झाली ह्याबद्दल आश्चर्यचकित होतो.

त्यांचा नाश होण्याची कारणे कोणासही ठाऊक नाहीत. पवित्र बायबल, तोहरा आणि कुराण हे आद, समूद, हूद आणि लूत ह्या संस्कृतिबाबत सांगतात. ह्या संस्कृतिंचा अंत झाला कारण त्यांनी ईश्वर आणि त्याच्या आज्ञा ह्यांचेकडे दुर्लक्ष केले.

अशा पुष्कळ जुन्या समाजव्यवस्था (किंवा संस्कृत्या) ज्यांचा अभ्यास आपण इतिहासामध्ये करतो त्यासुद्धा ईश्वराच्या कोपामुळे काळाच्याबरोबर नष्ट झाल्या असतील.

- जर एखादा वैयक्तिक पातळीवर ईश्वराकडे दुर्लक्ष करीत असेल तर तो त्याच्या प्रयत्नांच्या जोरावर स्वतःची प्रगति एका ठराविक मर्यादेपर्यंत करू शकतो परंतु अखेरीस तो त्याच्या मूळच्या आर्थिक स्थानावर परत येतो. (आपण ह्याचे थोडक्यात वर्णन चांगल्या कामांचे महत्त्व या प्रकरणांत, विभाग : गरीबीचे खाचखळगे ह्यामध्ये करू) सामाजिक किंवा राष्ट्रीय स्तरावरसुद्धा जर एखाद्याने ईश्वराकडे व त्याच्या आज्ञांकडे काणाडोळा केला, तर तो काही काळापर्यंत एका ठराविक मर्यादेपर्यंत प्रगति करू शकेल तथापि त्याचा उत्कर्ष शेवटी नाश पावतो व तो त्याच्या पूर्वीच्याच पातळीवर जाऊन पडतो. रशिया हे ह्या गोष्टीचे अगदी ताजे उदाहरण आहे.

- वैयक्तिक स्तरावर किंवा राष्ट्रीय पातळीवर संपत्ति कमविण्याच्या व श्रीमंत बनण्याच्या क्रियेमध्ये ईश्वराची उपेक्षा करून चालणार नाही. प्रत्येकाने त्याचे योग्य त्या दृष्टीने अनुकरण केले पाहिजे. म्हणून जर तुम्हाला प्रगति करावयाची असेल तर ईश्वराची प्रार्थना ही आपल्या नित्य व्यवहारातील एक कृति म्हणून केली पाहिजे.

- ह्या पुस्तकाच्या शेवटी आपण परमेश्वर कोण आहे? व निरनिराळे धर्म काय सांगतात? खरा धर्म कोणता? पैगम्बर कोण आहेत? वगैरे गोष्टींचा अभ्यास करू.

*प्रकरण क्र. १४*

# कल्पना आणि विचार

## (Imagination and Thought)

- यश प्राप्त करण्याची क्रिया ही एका सकारात्मक विचाराने सुरू होते.

- माणसाच्या मनात जी काही कल्पना आणि विश्वास असतो, तो ते हस्तगत (Achive) करू शकतो.

- विचार हे वस्तु (Things) आहेत पण ते शक्तिरुपात (Energy form) आहेत. काही विषेश प्रक्रियेमुळे विचार हे वस्तूमध्ये रुपांतर केले जाऊ शकतात.

- श्रीमंत होण्याच्या क्रियेची सुरुवात ही श्रीमंत होण्याची तीव्र इच्छा, आणि ती मिळविण्याचा निश्चय ह्याने होते.

- मदत, योजना, युक्ति, अंतःप्रेरणा, समस्येवर उपाय इत्यादि हे सृष्टीमातेकडून व ईश्वराकडून अर्धजागृत मनाला विचारांच्या रुपात मिळतात. जे लक्षाधीश होण्यासाठी धडपड करतात त्यांनी वरील गोष्टी समजावून घेतल्या पाहिजेत, ओळखल्या पाहिजेत व त्यांना महत्त्व दिले पाहिजे, व त्यांच्या अर्धजागृत मनाने दिलेल्या युक्तिप्रमाणे काम केले पाहिजे.

- जेव्हा एखाद्या, भावी लखपति होऊ इच्छिणाऱ्याच्या मनात निरनिराळ्या पैसे मिळवून देणाऱ्या कल्पना पहिल्यांदाच येतात तेव्हा त्यांचा प्रभाव अत्यंत विचित्र वाटतो. पैशासाठी संघर्ष करणाऱ्याने त्या कल्पना मारु नयेत आणि त्यांच्याकडे दुर्लक्ष न करता त्या वाढविल्या पाहिजेत, त्यांचे निरीक्षण केले पाहिजे व त्या प्रत्यक्षात अंमलात आणण्यासाठी योजना बनविल्या पाहिजेत.

अशा काही विचित्र कल्पनांचे सत्य स्वरुपात रुपांतर केले गेले त्याची उदाहरणे खालीलप्रमाणे आहेत.

**फोर्ड गाड्या (Ford Cars)**

पूर्वी मोटारगाड्या ह्या अतिशय महाग होत्या. व समाजातील काही श्रीमंत लोकच त्या खरेदी करू शकत होते. हेन्री फोर्डचे अशा स्वस्त मोटारीचे स्वप्न होते, ज्या सामान्य माणूस सुद्धा विकत घेऊ शकला असता. ही गोष्ट अशक्यप्राय होती पण फोर्डसारख्या महत्त्वाकांक्षी माणसासाठी नव्हती.

त्याने त्याच्या कल्पना विक्रेत्यांना सादर केल्या. त्यांच्याकडून आगाऊ रक्कमा घेऊन त्याने गाड्या तयार करण्याच्या कारखान्याची स्थापना केली, आणि त्याने कच्च्या (Ores) लोखंडापासून गाडी बनवली. ही त्यावेळची गोष्ट आहे, जेव्हा लोखंड आणि पत्र्याचे धातू हे मोठ्या प्रमाणात उपलब्ध नव्हते. श्री. फोर्ड हा अशुद्ध लोखंड हे खाणींतून घेत होता. ते शुद्ध करून त्याचे लोखंड बनवत होता आणि त्या मालापासून तो गाड्या तयार करीत होता. गाडीला लागणाऱ्या सर्व गोष्टी त्याच्या कारखान्यात बनत होत्या. ही एक अशक्यप्राय गोष्ट होती. पण त्याने ती कृतित उतरवून दाखविली.

श्री. फोर्डने एका कल्पनेची आकृती रेखाटली होती जी अशक्य होती; पण ठाऊक असलेल्या पद्धतीने त्याने ती प्रत्यक्षात उतरविली. त्यामुळे त्याला पुष्कळ संपत्ति त्यामोबदल्यात प्राप्त झाली व जगाला त्यांच्या खरेदी करण्याच्या मर्यादेत गाडी मिळाली.

## फेडेक्स कुरीयर सेवा (FedEx Courier Services)

फेड्रिक्स त्याच्या शिक्षणाच्या शेवटच्या वर्षात होता. या वर्षी त्याला 'समाजाचे प्रश्न कसे सोडवायचे' ह्यावर एक प्रकल्प अहवाल (Project report) तयार करावयाचा होता. त्याने 'टपालसेवा' हा त्याच्या प्रकल्पाचा विषय म्हणून निवडला.

टपालसेवेमध्ये माल हा त्याच्या ठरलेल्या ठिकाणी कधी पोहोचेल ह्याबद्दल खात्री आणि जबाबदारी नव्हती. त्यामुळे औद्योगिक कारखान्यांना (Factory) खूप त्रास होत होता. फ्रेड्रिक्सने कुरियर कार्यवाही पद्धतीचा अभ्यास केला, विलंब लागणाऱ्या कारणांचे निरीक्षण केले व एक प्रकल्प अहवाल तयार केला. तो असा की, जर सर्व पार्सले आणि कागदपत्र (दस्तऐवज) हे एका मध्यवर्ति केंद्रावर गोळा करून तेथून त्यांचे वाटप केल्यास विनाकारण होणारा विलंब टळेल.

फेड्रिक्सच्या प्राध्यापकाला ह्या प्रकल्प अहवालावर हंसू आले आणि त्याने तो अहवाल फेटाळून लावला.

परंतु फेड्रिक्सचे समाधान झाले होते. तो ह्याबाबत निश्चयी होता व त्याच्यामध्ये स्वतःची अशी एक कंपनी चालू करण्याची ज्वलंत इच्छा होती की, ज्यामुळे जबाबदारी घेतली जाईल व गिऱ्हाईकांना लवकर बटवड्याचे आश्वासन मिळेल. वाढत्या उद्योगधंद्याची ही एक अत्यंत निकडीची गरज होती.

त्याने वर्तमानपत्रांत अशी जाहिरात केली की, तो मालाच्या पार्सलचे वाटप हे ठराविक शहरात ठरलेल्या वेळेत करील आणि वाटपाच्या वेळेबद्दल हमी दिली. पहिल्या दिवशी त्याला माल पोहोचविण्याच्या सहा ऑर्डरी मिळाल्या. त्या त्याने वचन दिल्याप्रमाणे योग्य वेळात पुऱ्या केल्या. त्याने लोकांकडून विश्वास प्राप्त केल्यावर त्याला पुष्कळ ऑर्डरी मिळू लागल्या.

ज्या कुरियर सेवा कंपनीची फेड्रिक्सची कल्पना होती व ती त्याने सुरू केली ती आज फेडेक्स या नावाने प्रसिद्ध आहे. ही एक कुरियर सेवा कंपन्यांमध्ये सर्वात मोठी कंपनी असून तिच्याकडे ६८०

विमानांचा ताफा आहे व तिची उलाढाल ही २८००० दशकोटी डॉलर्स इतकी आहे.

फेड्रिक्सची ही कल्पना एक अद्वितीय होती. तीव्र इच्छाशक्ति आणि निश्चय ह्यांच्यामुळे तो तिचे सत्यात रुपांतर करू शकला. त्याबद्दल त्याला अफाट संपत्ति मिळाली व जगाला एक भरवशाची कुरियर सर्विस प्राप्त झाली.

### कोका कोला (Coco Cola)

एका बोचणाऱ्या थंडीच्या रात्री, एक केमिस्ट काही रसायने, एक किटली आणि एका कागदावर लिहिलेले सूत्र (फॉर्म्युला) ह्याच्यासह आसा कँडलरकडे गेला व त्याला ते सूत्र प्रचंड किंमतीला विकले. ॲसा कँडलरने त्याची आयुष्यभर केलेली बचत रक्कम त्या रसायने व फॉर्म्युलासाठी दिली.

त्या केमिस्टच्या दृष्टीने ती रसायने, किटली व ते सूत्र ह्या मामुली गोष्टी होत्या. पण ॲसा कँडलरसाठी त्या मामुली नव्हत्या. त्याने एका कडवट आणि घसा क्षणभर सुन्न करणाऱ्या पेयाचे स्वप्न पाहिले होते ज्यामुळे मंद पेय (Soft drinks) उद्योगांत एक क्रांति घडून येईल, आणि खरोखरच ती घडून आली.

ॲसा कँडलरने त्याच्या आयुष्यभराची बचत ह्या विचित्र स्वप्न व कल्पनेवर खर्च केली होती व ती प्रत्यक्षात खरी ठरली. त्यामुळे त्याला पुष्कळ धन मिळाले व जगाला एक आवडते पेय मिळाले.

कोकाकोला हे एक फक्त पार्टीमधील व समारंभातील लोकप्रिय पेय नाही, तर ते लाखो लोकांच्या नोकरीचा व आर्थिक उत्पन्नाचा मार्ग आहे.

### मॅक्डोनाल्ड (McDonald)

श्री. मॅक्डोनॉल्ड हा हॉटेलच्या धंद्यात होता. तो त्याच्या क्षेत्रामध्ये अतिशय यशस्वी होता कारण त्याने निरीक्षण केले व

गिऱ्हाईकांच्या गरजा आणि अपेक्षा पुऱ्या केल्या.

गिऱ्हाईकांच्या अपेक्षा अशा आहेत.

- सोयीची जागा (Convenient Location)
- जलद सेवा (Fast service)
- योग्य किंमत (Proper Cost)
- उत्कृष्ट दर्जा (Good Quality food)

श्री मॅक्डोनॉल्डने महत्त्वाच्या जागी हॉटेल्स सुरू करून गिऱ्हाईकांच्या वरील सर्व गरजा पुऱ्या केल्या. त्याने फक्त मर्यादित पदार्थ ठेवले. त्यामुळे ते बनवून तयार करणे सोपे झाले. गिऱ्हाईकाने ऑर्डर दिल्यापासून ती ताबडतोब पुरी केली जाऊ लागली.

थोडेच पदार्थ मोठ्या प्रमाणात बनविल्यामुळे किंमत पण कमी झाली. त्यामुळे त्याला हॉटेलात कमीतकमी दर ठेवणे शक्य झाले. त्याने त्याच्या पदार्थाचा दर्जा उत्कृष्ट ठेवला. कारण त्याला फक्त काहीच पदार्थाकडे लक्ष द्यावे लागत होते.

लोकांच्या चारही गरजा पूर्ण केल्यामुळे तो एकदम प्रसिद्ध झाला. ह्या सुरुवातीच्या यशानंतर त्याला त्याचा धंदा वाढवण्याची इच्छा होती.

पण कशातऱ्हेने?

हॉटेल्सची एक साखळी सुरू करण्याच्या कामात तो इतका व्यस्त नव्हता, जेवढा त्यांचे (हॉटेल्सचे) व्यवस्थापन बघणे, हे एक हॉटेलमध्ये चविष्ट पदार्थ बनविण्यापेक्षा मोठे आव्हान त्याच्याकडे होते.

त्याने एका कल्पनेचा विचार केला जी पूर्वी कोणीही मनात आणलीही नव्हती. त्याने त्याची भागीदारी ही फक्त २ टक्के तत्वावर देऊ केली. म्हणजेच तो फक्त २ टक्केच भागधारक असेल व दुसऱ्या व्यक्तिचा भाग ९८ टक्के असेल व त्या २ टक्के भागीदारीच्या

परताव्यात तो त्याची सदिच्छा म्हणजेच त्याचे नाव (मॅक्डोनॉल्ड) व संपूर्ण स्वयंपाकाचे आणि हॉटेल व्यवसायाचे व्यवस्थापन बघण्यासाठी सल्लामसलत देईल.

ही अशी किफायतशीर देऊ केलेली सवलत होती. त्यामुळे अल्प काळातच फक्त अमेरिकेमध्येच नव्हे तर सर्व देशामध्ये मॅक्डोनॉल्डची हॉटेल्स उभी राहिली.

मॅक्डोनॉल्डने एका व्यावसायिक पद्धतीची कल्पना केली होती. जी रूढीबद्ध भागीदारीपेक्षा वेगळी होती. ती त्याने खरी केली. त्याबद्दल त्याला अफाट पैसा मिळाला व जगाला उत्तम जेवण आणि जागतिक दर्जेदार हॉटेल्स ह्यांचा लाभ झाला.

**झेरॉक्स (Xerox)**

श्री. चेस्टर कार्लसन ह्यांनी एका यंत्राची कल्पना केली होती जे कुठल्याही कागदपत्राची प्रत काही सेकंदात काढू शकेल ती त्याने प्रत्यक्षात अंमलात आणली व कोट्यवधि डॉलर्स मिळविले.

**श्री. थॉमस एडिसन**

श्री. थॉमस एडिसन ह्याने पुष्कळ अशक्यप्राय शोधांची उदा. विजेचा दिवा व ग्रामोफोन वगैरे कल्पना केली होती. त्याने त्याच्या कल्पना प्रत्यक्षात खऱ्या करून दाखविल्या व तो जगातील एक श्रीमंत शास्त्रज्ञ झाला.

- अशा तऱ्हेची शेकड्याने उदाहरणे आहेत ज्यामध्ये स्वप्न बघणाऱ्याने काहीतरी अशक्य स्वप्न पाहिले, विचित्र स्वप्न पाहिले, पण त्याचे सत्यात रुपांतर करण्याचा त्यांचा दृढ निश्चय होता व तो त्यांनी पुरा करून दाखविला.

- कल्पनेचे प्रत्यक्ष खऱ्या स्वरुपात रुपांतर करण्यासाठी लागणारा अत्यंत महत्त्वाचा घटक म्हणजे मनात पेटत राहणारी तीव्र किंवा ज्वलंत इच्छा. पण ज्वलंत इच्छा म्हणजे काय? मी तुम्हाला पुढील

उदाहरणांवरून ज्वलंत इच्छा म्हणजे काय याची कल्पना देऊ शकतो.

- ई. सन ७५० मध्ये तारिक बिन झियाद हा खलिफा वलिद इब्ने अब्दुल मलिक ह्यांच्या सैन्याचा पश्चिम भागांतील प्रमुख सेनापती होता. तारिक बिन झियादकडे उत्तर आफ्रिका व दक्षिणेकडील युरोपमधले स्पेन वगैरे समुद्रापलीकडील देश जिंकण्याची कामगिरी सोपविली होती.

त्याने आफ्रिका जिंकले परंतु स्पेनवर विजय मिळविणे हे सोपे काम नव्हते. तारिक बिन झियादने तर स्पेन जिंकावयाचा निश्चयच केला होता. म्हणून त्याने त्याचे सैन्य जहाजात भरले, स्पेनच्या किनाऱ्यावर गेला. तेथे सैनिक व शस्त्रास्त्रे उतरविली व सर्व जहाजे त्याने जाळून टाकली.

जेव्हा जहाजे बुडावयास लागली तेव्हा त्याने सैनिकांना सांगितले, 'ह्या जहाजांकडे पाहा. ती जशी खाली तळात जातील तसाच तुमचा परत मागे फिरण्याचा रस्ता बंद झालेला असेल. तुम्ही हा समुद्रकिनारा विजयी झाल्याखेरीज सोडू शकणार नाही. विजय किंवा सर्वनाश याखेरीज तुमच्याजवळ काहीच निवड नाही.'

आणि ते जिंकले !

तारीक बिन झियादच्या १२,००० सैनिकांनी स्पेनच्या १ लाख सैन्याशी ज्या डोंगरावर युद्ध केले व त्यात विजय मिळविला, ही जागा आजही जबले तारिक किंवा Gibraltar म्हणून प्रसिद्ध आहे. (अरबीमध्ये जबल म्हणजे पर्वत वा डोंगर जबले तारिक म्हणजे तारिक पर्वत (वा तारिक डोंगर)

ज्या तऱ्हेने तारिक बिन झियादमध्ये इच्छा होती ती तीव्र ज्वलंत इच्छा ह्या प्रकारची होती.

ज्याच्यामध्ये ज्वलंत इच्छा आहे. ती धारण करणाऱ्या व्यक्तिला कुठलीही इच्छा ही प्रत्यक्षात रुपांतर करता येते.

• पण जेव्हा मनाला ज्वलंत इच्छा ही विकसित करावयाची असते पण ती इच्छा त्याच्या अंतःकरणात पेटत नाही. अशा वेळी आपण काय करावयाचे?

ह्याचे उत्तर आहे स्वयंसूचना (Auto Suggestion) जिचा अभ्यास आपण पुढील प्रकरणात करणार आहोत.

*प्रकरण क्र. १५*

# स्वयंसूचना

## (Auto Suggestion)

**स्वयंसूचना कशी काम करते?**

• जेव्हा लोक वाईट गोष्टीच्या संपर्कात येतात तेव्हा त्यांना त्या पसंत पडत नाहीत व ते त्या टाळतात. पण ते वाईट गोष्टीच्या काही काळ सहवासात राहिले, तर त्यांना त्या गोष्टीची सवय होते व ते त्या सहन करतात. पण जर का ते दुष्ट गोष्टीच्या बऱ्याच काळ सान्निध्यात राहिले तर शेवटी ते त्यांचा स्वीकार करतात. हा मनुष्याचा स्वभाव आहे.

• पाव्हलोव्ह(Pavlov)या रशियन शरीरविज्ञान शास्त्रज्ञाने (Physiologist) त्याच्या कुत्र्यावर एक प्रयोग केला. तो घंटा वाजवीत होता व त्या कुत्र्याला लगेच काही अन्न देत होता.

काही काळानंतर कुत्र्याला त्या घंटानाद व अन्नाची सवय झाली. व प्रत्येक वेळी घंटा वाजल्यावर, जरी त्याला अन्न दिले किंवा नाही तरी सुद्धा कुत्र्याच्या तोंडाला पाणी सुटत होते, हा पाव्हलोव्ह (Pavlov) यांचा नित्कर्ष जगप्रसिद्ध आहे व त्याला 'स्थितिजन्य प्रतिसाद' (Conditional Response) ह्या नावाने ओळखले जाते.

ह्याचा अर्थ असा आहे की, मनाला काही काळ जागृत अवस्थेत

काही बाह्य इशारे मिळत गेले की, व त्यातुन शरीरात काही बदल, भावना व प्रतिसाद निर्माण झाले तर त्यानंतर जर मनाला तसाच बाह्यइशारा मिळाला तर मन आपोआपच व जास्त जागृत प्रयत्न न करता, तसाच बदल, भावना व प्रतिसाद विकसित करते.

उदा. जर मनाला संभोग करावा असा संकेत मिळाला तर सुरुवातीला ते शरीरात नैसर्गिकरित्या संभोग करण्यासाठी बदल घडवून आणील. जर संभोगानंतर माणसाला सुख आणि समाधान मिळाले तर मन त्या संभोगाच्या संकेताला खुषीने जोडते व भविष्यात ते शरीराला सकारात्मकरीत्या अगदी अल्पसा ईशारा व थोड्याशाच शक्यतेनुसार संभोगाला तयार करील. या उलट जेव्हा संभोगाचा ईशारा मनाला मिळाला आणि त्याचे शरीर नैसर्गिकरीत्या संभोगाला तयार झाले. पण संभोग झाल्यानंतर जर व्यक्तिला अपराधीपणा, असमाधान, शिक्षा, त्रास वगैरे वाटले व जर असे वांरवार घडले तर मन संभोगाच्या इशाऱ्याबद्दल अपराधीपणा, शिक्षा, असमाधान, त्रास अशा संवेदना दुखाशी जोडेल व भविष्यामध्ये संभोगाचा संकेत मिळाल्यावर मेंदू हा शरीरास संभोग करण्यासाठी तयार करणार नाही. परंतु तो संभोग टाळण्यासाठी दुसऱ्या काहीतरी बचाव रचनेचा विकास करेल. (नपुसंकत्वाचे हे पण एक मूलभूत कारण आहे.)

अशारितीने जर मनाला धंदाव्यवसाय आणि यशाचा इशारा दिला आणि त्यानंतर अस्वाभाविकपणे आपण यशस्वी होण्यापुर्वीच तो आनंद अनुभवतो जो आनंद आपल्याला यशस्वी झाल्यानंतर होणार आहे आणि जर हा अनुभव व विचार आपण मनात पुन्हा-पुन्हा आणला. तर मन हे धंदाव्यवसायाला सुख व यशाशी जोडेल. आणि नंतर कधीही मनात धंदाव्यवसायाचा विचार येईल तेव्हा मन शरीरात आनंद व यशाचा प्रतिसाद निर्मान करील. आनंद व यशाचा प्रतिसाद म्हणजेच मन व अर्धजागृत मनात होकारार्थी वृत्ति, उत्साह, सातत्य, नवीन योजना व कल्पना उत्कंट इच्छा इ. निर्माण करणे. यशासाठी अर्धजागृत मनात उत्कंट इच्छा असणे अत्यावश्यक आहे. जी आपण अस्वाभावीकपणे स्थितीजन्य प्रतिसादातुन मनात जागृत

करतो. उत्कंट इच्छा अस्वाभावीकपणे अर्धजागृत मनात कशी निर्माण करावी, याचा आपण स्वंयसुचना (Auto-suggestion) मध्ये अभ्यास करू.

## स्वयंसूचना (स्वयंप्रेरणा) व तिचे महत्त्व :- -

- कवि हा कविता कशी लिहितो? तो सर्वप्रथम मनात त्याच्या विषयाची निश्चिती करतो व त्याचे दृष्टिकोन स्पष्ट करतो. साध्या शब्दात सांगायचे झाल्यास त्याला काय सांगावयाचे आहे हे कवि ठरवितो, नंतर शांतपणे वाट पाहातो व त्यानंतर त्याच्या मनातील आतला आवाज ऐकण्यावर लक्ष केंद्रित करतो. तो त्याच्या इच्छेनुसार कविता लिहू शकत नाही. तो विचारांचा ओघ वाहण्याची वाट पाहतो व विचार लहरी जेव्हा येण्यास सुरुवात होते तेव्हा ते कागदावर लिहित जातो.

जर तुम्ही एखाद्या कविने त्याची नवीन लिहिलेली कविता त्या कविने स्मरणशक्तित ठेवण्याच्या आधीच दूर घेऊन गेलात, तर तो ती कविता पुन्हा लिहू शकणार नाही. कारण त्याच्या इच्छेप्रमाणे जो प्रथम आलेला विचाराचा प्रवाह किंवा विचारप्रवाहांचा ओघ तो स्वत: पुन्हा आणू शकत नाही.

त्याने जे काही लिहिले होते ते सृष्टिमातेकडून आले होते. कवि, लेखक, संगीतकार व शास्त्रज्ञ इत्यादि हे त्यांच्या मनाची एक अशा तऱ्हेची सवय विकसित करतात की, त्यांचे विचार हे त्यांच्या अर्धजागृत मनातुन उचलले जातात, जेथून ते निसर्गमातेकडे पाठविले जातात व नंतर विचारांचा प्रवाह निसर्गमातेकडून कविता, वाङ्मय, गाण्याचा ध्वनि, गाणे व नवीन शोधांच्या कल्पना ह्यांच्या रुपात परत मिळवला जातो.

- अर्धजागृत मनाकडून विचारांचा ओघ निसर्गमातेकडे जाणे, तिथुन त्यांचे रूपांतर होऊन परत येणे अशा तऱ्हेच्या मनाच्या पद्धतीचा उपयोग व्यावसायीक उद्योजक किंवा ज्याला धनवान, वैभवशाली,

यशस्वी व्हायचे असते अशा लोकांनाही अत्यंत आवश्यक आहे. कोणीही गुंतागुतीच्या समस्येवरील अचुक उपाय व नविन कल्पना यांचा स्वत:च्या मर्जीनुसार विचारही करू शकत नाही. अचुक उपाय व नविन कल्पना हे निसर्गमाता व ईश्वर यांच्याचकडुनच माणसाला मिळते.

स्वयंसूचना म्हणजे स्वतःला केलेली सूचना. ही मनाला विशिष्ट पद्धतीने विचार करायला लावणाऱ्या पद्धतीपैकी एक पद्धत आहे. आपण पूर्वी अभ्यास करताना असे पाहिले आहे की, एखाद्या व्यक्तिने काही विचार मनात वारंवार आणले, जरी ते खरे किवा खोटे असले तरीही मन त्यांवर विश्वास ठेवते, ही एक खरी वस्तुस्थिती आहे. जर एखादी खोटी गोष्ट खरी समजुन आपण मनात वारंवार आणली तर मन त्या खोटया गोष्टीचा सत्य म्हणून स्विकार करते. म्हणून स्वयंसूचनेमध्ये आपल्या  मनाला ज्या विचारांचा स्वीकार करायचा आहे व जे विचार ज्यांच्यामुळे भरभराट आणि यश ह्या क्रियेची सुरुवात होते, असेच विचार आपण वारंवार करतो.

माणूस हा त्याच्या मनात ज्या विचाराचा मुद्दामच पगडा बसवितो आणि त्या विचारांना सहानुभूति, विश्वास, उत्साह इत्यादिंनी उत्तेजन देतो. असे विचार किंवा भावना नंतर मनामध्ये चुंबकीयशक्तीप्रमाणे कार्यरत होतात. ज्यामुळे अशाच स्वरुपाच्या किंवा संबंधित विचारांचे मनाकडे आकर्षण होते. असे विचार हे प्रवृत्त करणारी शक्ति बनतात जे त्या मानवाच्या प्रत्येक हालचाली, कृति आणि कार्य ह्यांचे नियंत्रण करतात. म्हणुन माणूस हा त्याच्या मनात ज्या विचाराचा मुद्दामच पगडा बसवितो,तेच विचार यश आणि भरभराटीची पहिली पायरी आहेत.

स्वयंसूचनेच्या पुढील पाच पायऱ्यांनी मनात योग्य ते विचार खोलवर बिंबवले जातात.

## स्वयंसूचना (Auto-suggestion)

### पहिली पायरी :- Define your goal clearly

- तुमची यशाची ध्येये स्पष्टपणे ठरवा. उदा. जर तुम्हाला खूप पैसा हवा असेल तर नुसते तुम्हाला श्रीमंत बनायचे आहे असे म्हणू नका तर असे सांगा की, मला अमुक इतकी रक्कम हवी आहे (जसे मला १ लाख वा दहा लाख रुपये हवेत इत्यादि....) तसेच कालमर्यादा ठरवा. नुसते असे म्हणू नका,'मला भविष्यात श्रीमंत व्हावयाचे आहे.' पण असे सांगा मला चौथ्या वर्षाअखेर इतके पैसे मिळालेच पाहिजेत.' (किंवा आणखी ठराविक मुदतीमध्ये एवढे पैसे मला मिळाले पाहिजेत)

ध्येय स्पष्ट करण्याचे कारण असे आहे की, अर्धजागृत मन हे फक्त विशिष्ट तपशीलावर काम करते. उदा. जर तुम्ही डिक्शनरी लोड केलेल्या कंम्प्युटरला सकारात्मक भावना (Positive emotion) ह्याचा अर्थ काय असे विचारलेत तर तो बरोबर उत्तर देणार नाही, पण जर त्याला विशिष्टरीतीने विश्वास (Faith) ह्या शब्दाचा अर्थ काय असे विचारलेत तर तो बरोबर उत्तर देईल, विश्वास म्हणजे संपूर्ण भरवंसा आणि श्रद्धा.'

तसेच निसर्गमाता ही अर्धजागृत मनाला फक्त त्याच विचारांचा तपशील देते जे विचार स्पष्टपणे ठरवले आहेत व त्यांना विशिष्ट कालमर्यादा असते.

### दुसरी पायरी : Specify your effort

यश मिळविण्याच्या क्रियेत तुम्ही काय प्रयत्न कराल हे निश्चित ठरवा.

- प्रत्येक मूल्यवान वस्तूला किंमत असते. एखाद्याला यश हे मोफत मिळत नाही. प्रत्येकाला बौद्धीक व शारीरिकदुष्टया खूप कष्ट करून बदल्यात वैभव हे मिळावयाचे असते.
- तुम्ही तुमचा प्रयत्न स्पष्ट केला पाहिजे उदा. एखादा विद्यार्थी

सांगेल,'मी दररोज १४ तास अभ्यास अशा रीतीनं करीन की त्यामुळे मला ९०% मार्कस मिळविता येतील'. एखादा नवीन उद्योग सुरू करणारा असे सांगेल.'माझे ध्येय पूर्ण करण्यासाठी मी दर दिवशी १२ तास काम करीन,' किंवा मी अमुक तमुक विक्री उत्पादन करीन.'

- मूलभूतपणे ही तुमची क्रिया करण्याची योजना आहे. जी पार पाडण्यासाठी तुम्ही खूप प्रयत्न कराल.

## तिसरी पायरी : Record your aim and effort on paper

तुम्ही काय निश्चय करावयाचे ठरविले आहे ते एखाद्या कागदावर लिहून काढा म्हणजे तुमचे स्पष्ट ध्येय, ते पुरे करण्यासाठी तुमची क्रिया योजना व प्रयत्न. त्यामुळे तुमच्या यश मिळविण्यासाठी एक पूर्ण क्रिया योजना किंवा आराखडा (Blue print) तयार होईल.

नीटपणे स्पष्ट केलेली समस्या ही अर्धी सोडविली असते. त्याचप्रमाणे नीटपणे स्पष्ट केलेला प्रकल्प हा अंशतः पूर्ण होतो. महाभारतात, फक्त अर्जुन हाच पोपटाच्या डोळ्यावर बाण मारण्यात यशस्वी झाला होता. कारण त्याचे त्याच्या लक्ष्यावर पूर्ण ध्यान केंद्रित झाले होते. जेव्हा त्याला विचारले गेले तू काय पाहात आहेस? त्याने उत्तर दिले मला फक्त पोपटाचा डोळाच दिसत आहे. त्यावेळात इतर सर्वांनी सांगितले आम्हाला झाड दिसते किंवा पोपट वगैरे दिसतो. त्याच्यापैकी कोणीही त्याच्या ध्येयाकडे (लक्ष्याकडे) लक्ष केंद्रित करू शकत नव्हता. म्हणुन त्या लक्ष्यापर्यंत बाण मारण्यात कोणीही यशस्वी झाला नव्हता. जेव्हा तुम्ही तुमचे ध्येय स्पष्टपणे व थोडक्यात निश्चित करता त्यामुळे तुमची शक्ति, प्रयत्न, वेळ ह्या अनावश्यक गोष्टीमध्ये वाया जात नाहीत. म्हणून यश मिळविण्यासाठी तुमची निश्चित योजना तयार असने अतिशय महत्वपुर्ण आहे.

## चौथी पायरी

- तुम्ही जे काही लिहिलेले आहे ते प्रत्येक दिवशी सकाळी व

संध्याकाळी उत्कट भावनेने वाचा व तुमच्या मनाला असे ठासुन सांगा कि तुम्ही तुमचे लक्ष्य गाठण्यासाठी सुरुवात केलेली आहे.

• ही पायरी म्हणजे स्वयंसूचनेचे हृदय व एक महत्त्वाचा भाग आहे. त्याशिवाय मन हे विशिष्ट पद्धतीने विचार करणार नाही किंवा वागणार नाही. आपण आधी असा अभ्यास केला की गुन्हा हा वारंवार एखाद्या व्यक्तिसमोर केला जातो, प्रथम तो त्याला नकार देतो, नंतर सहन करतो व शेवटी त्याचा स्वीकार करतो. त्याचप्रमाणे असत्य गोष्ट ही परत परत घडू लागली तर मन हे शेवटी ती खरी आहे म्हणून विश्वास ठेवून त्याचा स्वीकार करते.

या सिद्धांताच्या आधारांवर, तुमच्या यशाची संपूर्ण कृति योजना तुमच्या मनात वारंवार व सकारात्मक भावनांनी अशा रीतीने आणा की, तुम्ही आधीच यशस्वी होण्यास सुरुवात केली आहे. त्यामुळे मन ती भावना वास्तववादी आणि खरी आहे असे मानून तिचा स्वीकार करील. जेव्हा मनाचा तुमच्या कृतियोजनेवर सकारात्मक विश्वासभावना व यशाची खात्री यावर विश्वास बसतो, तेव्हा हे यशाचे विचार तुमच्या अर्धजागृत मनात पकडले जातात. ते नंतर अर्धजागृत मनाकडून सृष्टीमातेकडे पुढे संपर्कासाठी पाठविले जातात.

• सृष्टीमाता त्या विचारांचा ईश्वराकडे संदेश पाठविते. तुमचे प्रयत्न, तुमचा प्रामाणिक हेतू व तुमच्यासाठी व समाजासाठी काय योग्य आहे ह्यावर ईश्वर त्याचा निवाडा करतो. ईश्वराच्या निकालानुसार सृष्टीमाता कल्पना, योजना व सूचना तुमच्या अर्धजागृत मनाकडे परत पाठवून, तुमची कृतियोजना कशी अंमलात आणावयाची ह्याचे निर्देशन करते. तुमच्या यश प्राप्तीसाठी तुम्हाला कशातऱ्हेने मदत व साहाय्य करावे ह्यासाठी सृष्टीमाता ह्या संदेशाचे प्रसारण सुद्धा सर्व संबंधित माणसांना करते. म्हणून तुम्हाला यशोमार्गाकडे जाण्यासाठी व तुमचे स्वप्न पुर्ण पुरे होण्यासाठी तुमच्या मनात स्पष्ट कल्पना व विचार येतील. ह्या जगातील प्रत्येकजण तुमचे जबाबदारीचे काम पुरे होण्यासाठी तुम्हाला मदत करीत आहेत. आणि तुम्हाला असेही आढळून येईल की, गोष्टी आपोआप घडून येतात व त्यामुळे तुमच्या

ध्येयाच्या जवळ जाण्यास मदत मिळते.

वरील क्रियेचे phenomena धार्मिक पुस्तकात वर्णन केलेले आहे. त्याचे सारांश खालीलप्रमाने आहे.

*ई.सन ६१ साली, ईश्वराने अंतिम प्रेषित (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) यांना स्वर्ग दाखवण्यासाठी आकाशात बोलविले. या स्वर्गाच्या यात्रेत त्यांनी पाहिले की, काही वस्तु जमिनीहुन आकाशाकडे जात होती. तर काही वस्तु आकाशातुन जमिनीकडे येत होती. त्यांनी आपले सोबती महान ईश्वरदुत जिब्रील यांना त्याबाबत विचारले तेव्हा ते म्हणाले कि जमिनीहुन आकाशाकडे जात असणारी वस्तु म्हणजे लोकांची कर्मे आहेत, आणि आकाशातुन जमिनीकडे येणारी वस्तु हे ईश्वराचा हुकूम आहे (लोकांच्या कर्माप्रमाणे)*

(हदीस.)

- सृष्टीमाता ही ईश्वराच्या आदेशाप्रमाने काम करते. ती कोणालाही स्वतःच्या मर्जीनुसार संदेश पाठवत नाही, ईश्वराचा हुकूम असेल त्यालाच ती संदेश पाठवते.

जसे ईश्वर सांगतो,

*'सर्व ज्ञान आणि शहाणपणा ह्यांचे नियंत्रण माझ्याकडे आहे. माझ्या ईच्छेशिवाय कोणालाही तेथे प्रवेश मिळत नाही.'* (पवित्र कुराण २:२५५)

हेच ते ईश्वरी नियंत्रण आणि कृपा ज्यामुळे काहीवेळा एखादा कमी शिकलेला माणूस विद्वान, बुद्धिमान व तत्त्वज्ञानी माणसासारखा बोलतो. आणि जर एखाद्यावर ईश्वरी कृपा नसेल तर पदवीधर व्यक्तिही जिच्याकडे प्रचंड बुद्धिमत्ता व बुध्यांक (आय क्यू) आहे. पण ती व्यक्ति देखील कधी-कधी वेड्यासारखे बोलते.

- स्वयंसूचनेमध्ये तुमची कृति योजना रात्रंदिवस जोराने वाचण्यापेक्षा भावनेचा भाग जास्त कठीण आहे. परंतु भावना ही असायलाच हवी. तुम्ही प्रत्यक्ष यश मिळविण्यापूर्वी अशी कल्पना व भावना केली पाहिजे, की मी यशस्वी होत आहे. कारण ह्या भावनेशिवाय तुमचे अर्धजागृत मन प्रतिसाद देणार नाही.

- जर तुम्ही एखादे धार्मिक पुस्तक वाचत असल्यास तुम्हाला असे दिसून येईल की, स्वर्गाचे वर्णन हे इतके प्रभावशीरपणे केलेले असते की प्रत्येकाला स्वर्ग मिळण्याची किंवा तेथे राहाण्याची इच्छा होते. ही आशावादी भावना आणि स्वर्गातील कायम टिकणारे आरामदायी जीवन हा विश्वासच मनुष्यजातीला त्याच्या योग्य मार्गावरून चालत जात असताना, ह्या जगातील दुःख आणि कष्ट आनंदाने सहन करण्यात मदत करते.

तुम्हाला ह्या चौथ्या पायरीचे अनुकरण करणे कठीण दिसून आल्यास तर तुम्ही असे करा कि, तुमचे उदिष्ट साध्य झाल्यानंतरच्या तुमच्या जीवनाची कल्पना करा. म्हणजेच सुख, आराम, समाधान, दर्जा समाजात मान व प्रसिद्धी यांची कल्पना करू लागा. जसे कठिण जीवन स्वर्ग मिळण्याच्या केवळ कल्पनेनेच सोपे होते. त्याचप्रमाणे यशप्राप्तिनंतर सुखी व समाधानी जीवनाची कल्पना ही सध्याची धडपड व कष्ट हे सोपे करील. तसेच यश मिळवण्यापुर्वी यशाची कल्पना करने सोपे जाईल व तुमच्यातील ज्वलंत इच्छा प्रज्वलित होईल.

- प्रत्यक्षात यशस्वी होण्यापूर्वी आपण यशस्वी झालो आहोत ही कल्पना करणे जेव्हा कठिण होते त्यावेळी आपण काय करावे?

होय. हे काम कठिण आहे. पण एक गोष्ट नीट लक्षात ठेवा मन, अर्धजागृतमन, सकारात्मक भावना, निसर्गमाता व ईश्वर हेच यशाचे मार्ग आहेत. त्यांच्यापैकी कोणाकडेही दुर्लक्ष केले तर यशाची क्रिया अशक्यप्राय बनेल. म्हणून काहीही करून यशाचा नियम आणि स्वयंसूचनेमध्ये वर्णन केलेल्या पायऱ्यांचे अनुकरण करण्याचा प्रयास करा.

यशस्वी होण्यापुर्वीच तुम्ही यशस्वी झाला आहात अशी कल्पना करण्यासाठी पैसे लागत नाहीत. किंवा तुम्ही जगासमोर विनोदी पात्र बनत नाही. हा एक विचार करण्याचा विशिष्ट प्रकार आहे. व ज्यांनी यश मिळविले आहे त्यांनी हा मार्ग अनुसरला आहे व तुम्हाला पण त्याच मार्गाने जायचे आहे.

येथे एक गोष्ट ध्यानात ठेवा. जोपर्यंत तुम्ही उत्कंट इच्छेने तळमळत नाही आणि जोपर्यंत तुमच्यामध्ये यशस्वी होण्यासाठी जबरदस्त विश्वास नाही, तोपर्यंत तुम्ही यशस्वी होणार नाही.

- जर खरी कल्पना करणे तुम्हाला अवघड वाटत असेल तर तुमच्या कल्पनाशक्तिला मदत करण्यासाठी तुमच्याजवळ यशप्राप्तिनंतर काय असेल असे काहीतरी करा. उदा. जर तुम्हाला घर घेण्याची इच्छा असेल तर दरवाजाची बेल किंवा तुमच्या स्वप्नातील घरासाठी एखादी वस्तु खरेदी करा. जर तुम्हाला अलिशान गाडी हवीशी वाटत असेल तर तिचे हँडल किंवा सीटचे कव्हरच फक्त खरेदी करा. जर तुम्हाला खूप संपत्ति आपल्याकडे असावी असे वाटत असेल तर काही खऱ्या चलनी नोटा घ्या. त्या कोऱ्या कागदांच्या बंडलावर ठेवून द्या व नोटांचे एक पूर्ण बंडल करा ते तुमच्या खिशात ठेवा व त्या खऱ्या चलनी नोटा आहेत असा भाव मनात धरा. वर वर्णन केल्याप्रमाणे त्या गोष्टी तुमच्याजवळ असल्या की, स्वतःशी असे म्हणा की हा यशाचा लहान भाग आहे व बाकी उरलेला यशाचा भाग येत आहे. अशा गोष्टींची बळजबरीने कल्पना करण्याचा प्रयत्न करा.

वर वर्णन केल्याप्रमाणे इच्छेच्या नियमित पुनर्रोच्चाराने तुमचे अर्धजागृत मन हे विचार व यशाच्या योजना पकडून ठेवते, तेव्हा ते निसर्गमातेकडून तुमच्यासाठी व तुमच्या यशासाठी पूर्ण, सुरक्षित व संपूर्ण योजना आणते.

- लक्षात ठेवा, विचार हे वस्तु आहेत जे काही मन विश्वासाने कल्पना करते ते व्यक्तीला मिळु शकते किंवा तो ते निर्माण करू शकतो. त्याला स्वप्ने, कल्पनाशक्ति, निश्चय, सतत प्रयत्न व प्रार्थना ह्यांची गरज असते. त्याला साध्या कठीण कामाशी काही देणे घेणे नसते. साधे कठीण प्रयत्न श्रीमंति आणत नाहीत तर कष्टाबरोबर सकारात्मक मानसिकताच श्रीमंती आणते. जगातील ९५% लोकसंख्या ही खूप कष्ट करते. प्रत्यक्षात कष्टाचे काम केल्याशिवाय त्यांना त्यांचा रोजचा भाकरतुकडा पण मिळत नाही. पण ते यशस्वी नाहीत.

समाजातील फक्त ५% लोक हे यशस्वी आहेत. व हेच ते लोक आहेत जे अपार मेहनत करतात पण त्यामागे सकारात्मक व योग्य मनस्थिति असते जी यशासाठी अत्यावश्यक आहे.

• म्हणून तुमच्या विचारांची सवय आणि सकारात्मक (कल्पना) ह्यांना आकार देण्यासाठी मेहनत घ्या आणि नंतर शारीरिक कष्टांवर लक्ष द्या.

या संबंधी जास्त माहितीसाठी यांचे सुप्रसिद्ध Think and grow rich नावाचे पुस्तक वाचा.

## पाचवी पायरी

कोणत्या दादाचा (डॉनचा) मुलगा हा उद्योगपति आहे?

कोणाचाही नाही.

कोणत्या वसाहतवादी देशात इंग्लंड, फ्रान्स, स्पेन किंवा पोर्तुगाल त्यांनी त्यांच्या वसाहतीमधून लुटून आणलेली धनदौलत शिल्लक राहिली?

कोणत्याही देशात नाही.

उदा. दुसऱ्या जागतिक युद्धात जर्मनीने फ्रान्सवर कब्जा करून लूटमार केली व इंग्लंडवर २० हजार टन दारुगोळ्याचा वर्षाव केला. लंडनची एकही इमारत त्यामुळे धड राहिली नाही. म्हणुनच वाईट मार्गाने मिळविलेली संपत्ति ही कधीही शिल्लक राहत नाही, ती नेहमी नाश पावते.

योग्य मार्गाने मिळविलेले यश हाच यशाला दिर्घकाळ राखून ठेवण्याचा एकमेव मार्ग आहे.

ईश्वर सांगतो,

*'ज्यांचा माझ्यावर विश्वास आहे व जे योग्य मार्गाने जातात त्यांनाच मी सुखी जीवन व भरभराट देतो.* (पवित्र कुराण १६:९७)

• इ.सन पूर्व ५४० मध्ये कपिलवस्तूचा राजपुत्र सिद्धार्थ हे त्यांच्या जीवनात प्रथमच राजवाड्यातून बाहेर पडले व रथात बसून शहराच्या भोवती फेरफटका करू लागले. जेव्हा त्यांनी एक प्रेत आणि एक वृद्ध व्यक्ती अत्यंत वाईट स्थितीत पाहिले तेव्हा त्यांना हे कळून चुकले की भौतिक जगातील यश हे काही खरे यश नव्हे तर ते क्षणभंगूर आहे. त्यांनी त्यांचे राज्य सोडले व योग्य मार्ग समजून घेण्यासाठी त्यांनी १२ वर्ष ध्यान साधना केली. नंतर त्यांना ज्ञानप्राप्ति झाली व ते महान गौतमबुद्ध बनले.

• अंतिम प्रेषित हजरत मुहम्मद(सल्लल्लाहु अलैहि व सल्लम)यांना मोठेपणी सज्ञानी झाल्यावर असे समजून आले की, अरेबियामध्ये श्रद्धा, धर्माबाबत खुपच असुसंस्कृत व अयोग्य परंपरा आहेत. मक्केच्याजवळ पर्वतशिखरावर गारे हिरा' म्हणुन एक गुहा होती. तिथे ते शांत वातावरणात ध्यानसाधना करण्यासाठी जात होते. ईश्वराने त्यांना फक्त योग्य मार्गच दाखविला नाही, तर जगाच्या प्रलयापर्यंत त्यांना ईश्वराचा प्रेषित (पैगंबर) हे पद बहाल केले.

त्यांना ईश्वराचे प्रेषित म्हणून घोषित केल्यावर ईश्वर मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) यांना म्हणाले,

*हे मुहम्मद (स.) तुम्ही फक्त उपदेश देऊ शकता! जे लोक तुम्हाला आवडतात त्यांना तुम्ही उपदेश समजण्याची सुबुद्धी देऊ शकत नाही! पण माझी ज्यांना सुबुद्धी देण्याची इच्छा असेल त्यांनाच मी ज्ञान देतो. आणि मी त्या लोकांना चांगल्या प्रकारे जाणतो, जे मार्गदर्शन स्विकारणारे आहेत.'*

(पवित्र कुराण २८ : ५६)

गौतम बुद्ध आणि प्रेषित मुहम्मद (स.) ह्यांना परिस्थितीची जाण, संवेदनशील मन, व सुबुद्धी कोणी दिली?

• सर्व पवित्र धार्मिक व्यक्ति ह्या ज्ञानी व स्वभावाने दूरदर्शी होत्या व त्यांना हे ज्ञान, धोरणीपणा व योग्य मार्गाचे ज्ञान हे ईश्वराकडून प्राप्त झाले होते.

प्रत्येक नवीन उद्योजक व धंदेवाईक व्यक्तिला एखाद्या ग्राहकाशी व्यवहाराचा करार करण्यापूर्वी नफा व तोटा ह्यांची माहिती असण्याचे दूरदृष्टीधोरण व शहाणपण असले पाहिजे. तथापि हा दूरदर्शीपणा किंवा शहाणपण हे शिकता येत नाही, शिकविले जात नाही. किंवा पवित्र व्यक्तिच्या आशीर्वादानेही मिळत नाही.

फक्त ईश्वर हा एकमेवच ते ज्ञान देतो.

ईश्वर सांगतो,

*'ईश्वर फार उदार व विवेकशील आहे. तो ज्याला इच्छितो त्याला विवेक प्रदान करतो, आणि ज्याला विवेक लाभला त्याला खऱ्या अर्थी मोठी दौलत लाभली. या गोष्टीपासून केवळ तेच लोक बोध घेतात जे विवेकशील आहेत.'* (पवित्र कुराण २:२६९)

इतिहासामध्ये अशी कित्येक उदाहरणे आहेत कि ज्यां लोकांना दूरदर्शीपणा किंवा शहाणपण यांची गरज भासली तेव्हा त्यांना ईश्वराचा आधार घ्यावा लागला. तसेच जर उद्योजक आणि व्यावसायिक ह्यांना त्याच गोष्टी हव्या असल्यास त्यांनीही त्याच मार्गाचा अवलंब केला पाहिजे. त्याशिवाय दुसरा अन्य मार्ग नाही.

म्हणून तुम्हाला लखपति होण्याची इच्छा असेल तर तुमच्या धंदाव्यवसायाच्या व्यवहारात एका ईश्वराच्या प्राथनेचा समावेश करा. हा स्वयंसूचनेमधील शेवटचा पण अत्यंत महत्त्वाचा भाग आहे.

## स्वयंसूचनेचा सारांश

१) तुमचे ध्येय स्पष्ट करा.

२) तुमच्या प्रयत्नांची दिशा ठरवा.

३) तुमचे ध्येय व प्रयत्न ह्यांची कागदावर नोंद करा.

४) रात्रंदिवस सतत तुमच्या मनाला ध्येय आणि प्रयत्न ह्यांची आठवण करून द्या आणि तुमच्या यशाची खात्री सकारात्मक भावना व श्रद्धा ह्यांच्यासह मनाला सतत देत राहा.

५) तुमची योजना ही प्रामाणिकपणा व माणुसकी आणि ईश्वराची आराधना ह्यांचा पाठिंबा व मदत ह्यांच्यावर आधारलेली असावी.

मन, अर्धजागृतमन व निसर्गमाता हे होकारात्मक विचारांनी कसे काम करतात त्याची उजळणी -



**अर्धजागृत मन हे सकारात्मक विचारांबरोबर कसे कार्य करते त्याची उजळणी :**

जेव्हा माणसाच्या अंतःकरणात ज्वलंत इच्छा ही जागृत होते आणि तो सकारात्मक वृत्तिने विचार करतो आणि ती इच्छा पुरी होण्यासाठी विश्वासाच्या भावनेने व चिकाटीने प्रयत्न करतो व ईश्वराची मदत घेतो. त्यानंतर निसर्गमातेला त्याचे विचार आणि योजना ह्या अर्धजागृत मनाद्वारे कळतात. निसर्गमाता मग त्यांचे पृथ्थकरण (analysis) करते, ईश्वराशी संपर्क साधते. त्याच्याकडून सूचना मिळविते व प्रयत्न करणाऱ्या माणसाच्या अर्धजागृत मनाकडे जास्त परिपूर्ण कल्पना, प्रेरणा व योजना ह्या परत पाठविते. व यशप्राप्तीसाठी प्रयत्न करणाऱ्या व्यक्तिशी संबंध येणाऱ्या सर्व माणसांना 'त्याला मदत करा' असे संदेश पाठविते. त्यामुळे ह्या व्यक्तिच्या धडपडीशी आणि त्याच्याशी ज्यांचा संबंध येणार आहे ते सर्वजण अर्धजागृत मनाच्या पातळीवर त्याला मदत करण्याचा विचार करतात व जेव्हा वेळ येते त्यावेळी ते त्याला मदतीचा हात देतात. त्यामुळे धडपड करणाऱ्या व्यक्तिला आपल्या ध्येयाच्या मार्गाकडे जाता येते. अशी व्यक्ति स्वतःला अत्यंत भाग्यवान समजते आणि साध्या व योग्य प्रयत्नांनी यश प्राप्त करते.

## मन, अर्धजागृत मन व सृष्टीमाता ह्या नकारात्मक विचारावर कसे कार्य करतात त्याचा सारांश



**अर्धजागृत मन हे नकारात्मक विचारांवर कसे काम करते त्याचा सारांश :**

जेव्हा एखादी व्यक्ति भक्कम विश्वासाने नकारात्मक विचार करते, तेव्हा त्याचे अर्धजागृत मन हे ते नकारात्मक विचार उचलते आणि ते निसर्गमातेकडे पाठविते. निसर्गमाता त्याचे पृथक्करण (analysis) करते व त्यांचा ईश्वराशी संपर्क साधते. जर विचारकर्त्याची कामे ही उदात्त (noble) असतील तर पहिल्यावेळी त्याला परमेश्वर परिस्थितीचा विचार करण्याचे ज्ञान ,शहाणपण व सुबुद्धि देतो व सकारात्मक वृत्ति व विचार करण्याचा आशीर्वाद देतो. पण व्यक्तिची कामे जर चांगली नसतील किंवा एखादा सभ्य गृहस्थ हा मार्गदर्शन मिळूनसुद्धा नकारार्थी विचार करू लागला तर स्वर्गीय मदत ही पाणी व हवा ह्यांच्याप्रमाणे फुकट नाही, व जे स्वतःला मदत करतात त्यांनाच ईश्वर मदत करतो. अशी ईश्वराची आज्ञा न पाळणाऱ्यांसाठी निसर्गमाता योग्य ती कारवाई करते आणि त्यांच्या नकारात्मक विचारांचे सत्य स्वरूपात रुपांतर करते.

निसर्गमाता अशा व्यक्तिच्या भय आणि नकारात्मक कल्पना ह्यांचे प्रत्यक्षात अंमलात आणण्यासाठी परत संदेश किंवा योजना पाठविते. निसर्गमाता सर्व संबंधित व्यक्तिंना पण त्या माणसाला सहकार्य करू नका व त्याच्या अपयशाच्या कार्यात गति येण्यासाठी योग्य ते करा असा संदेश पाठविते.

**सकारात्मक विचार (Positive Thinking):**

- ईश्वराने नकारात्मक विचार करण्यास मनाई केली आहे. व तो पवित्र कुराणात सांगतो,

- *' ईश्वराच्या कृपेपासुन निराश होऊ नका, त्याच्या कृपेपासुन तर केवळ अश्रद्धावंतच निराश होत असतात.'* (पवित्र कुराण १२:८७)

पवित्र बायबल असे सांगते,

*'ईश्वर पाठीशी असताना कोणतीही गोष्ट अशक्य नाही.'*
(पवित्र बायबल, Luke १:३७)

*'घाबरू नका ! ईश्वर हा महान कार्य करील ' (तुमच्या यश व भरभराटीसाठी)* (पवित्र बायबल, Joel २:२१)

*'तो कुणाचेही नुकसान करीत नाही. मानवाला भोगावे लागणारे कष्ट हे त्याच्याच स्वतःच्या कर्मांची फळे आहेत.'* (पवित्र कुराण २:२८६)

- अंतिम प्रेषित (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) यांनी असे म्हटले आहे,

*' ईश्वर सांगतो! लोकांच्या माझ्याकडून ज्या अपेक्षा असतात त्याप्रमाणे मी त्यांना वागणूक देतो.'* (हदिस)

- आपण वरील ओळींचे पुढीलप्रमाणे स्पष्टीकरण करू.

म्हणजेच एखाद्याने असा विचार केला की ईश्वराने त्याला नशीबवान बनविले आहे व त्याची माझ्यावर कृपादृष्टी असून तो मला मदत करेल, तर खरोखर परमेश्वर त्याच्या इच्छेनुसार साहाय्य करील. जर एखाद्याने विचार केला की, ईश्वराने मला कमनशीबी ठरविले आहे व मी नेहमी अपयशीच ठरेल तर खरोखर त्याला ईश्वरी मदत मिळणार नाही व तो नेहमी अपयशी होईल.

ईश्वर हा महान आहे. त्याला कुठलीही गोष्ट अशक्य नाही.

जर एखाद्याने आशा सोडून दिली, तर तो अप्रत्यक्षरीत्या ईश्वराच्या अशक्यप्राय गोष्टी करण्याच्या क्षमतेबद्दल साशंक आहे, किंवा तो ईश्वराला कमी समजत आहे किंवा त्याचे श्रेष्ठत्व अमान्य करीत आहे.

आपणास एखादी गोष्ट अशक्यप्राय असते, पण ती ईश्वरासाठी नाही. आपण एकट्याने ती गोष्ट करू शकत नाही पण ईश्वर ती करू शकतो. ईश्वर ती सहजसाध्य करतो किंवा आपल्याला ती गोष्ट मिळण्यासाठी ती सोपी करून टाकतो.

म्हणून जेव्हा एखादे कठीण व अशक्य काम आपण करू शकणार नाही ह्याबद्दल आपला विश्वास डळमळतो, तेव्हा आपण अशी सकारात्मक वृत्ति ठेवली पाहिजे की, ईश्वर हा आपले ध्येय साध्य करण्यासाठी काहीतरी मार्ग दाखवेल म्हणून सतत सकारात्मक विचाराने काम करीत राहिले पाहिजे.

- दुसऱ्या एका ठिकाणी पवित्र कुराणात असे सांगीतले,

*"आणि त्या तिघांनादेखील त्याने माफ केले ज्यांचे प्रकरण पुढे ढकलले गेले हाते - जेव्हा जमीन सर्वथैव विस्तीर्ण असुनदेखील त्यांच्यावर तंग झाली आणि त्यांच्या स्वत:च्ये जीवनदेखील त्यांना भारी वाटु लागले आणि त्यांनी जाणुन घेतले की ईश्वरांपासुन वाचण्यासाठी कोणतेही आश्रयस्थान खुद्द ईश्वराच्या कृपाछत्राशिवाय नाही."* (प्रकरण क्र. ९, ओळ ११८)

ह्या आदेशाची पार्श्वभूमी अशी आहे. पूर्वी एकदा तीन व्यक्तिंवर ईश्वराच्या आज्ञेनुसार बहिष्कार टाकण्यात आला होता व तो जवळजवळ चाळीस दिवस होता. त्यामुळे ते तिघे जरी शहरभर फिरण्यास मुक्त होते तरी कोणीही त्यांच्याशी सहकार्य करीत नव्हते. त्यामुळे त्यांना स्वतःलाच अशी जाणीव झाली की, जरी हे जग विशाल असले तरी त्यांच्यासाठी ती तुरुंगातील एक खोली आहे.

हे त्यांच्याच बाबतीत फक्त घडलेले नव्हते. तथापि आज किंवा कोणत्याही काळात कोणत्याही व्यक्तिंसाठी जर ईश्वराने

असहकाराचे फर्मान जारी केले तर जगातील कोणतीही व्यक्ति त्यांना मदत करत नाही व ज्यांच्याबाबतीत परमेश्वर हा सहकार्य आणि यशाचा हुकूम काढतो, त्यांना जगातील प्रत्येकजण हा मदत करण्यास प्रवृत्त होतो.

म्हणून आपण सतत सकारात्मक विचार केला पाहिजे व ज्यामुळे ईश्वराचा संताप आणि राग ह्यांना आमंत्रण दिले जाईल अशी पापे वा वाईट कृत्ये करण्यापासून आपण दूर राहिले पाहिजे.

• जेव्हा नकारात्मक विचार हे उज्ज्वल भवितव्यासाठी हानिकारक असतात तर ते आपण कसे टाळू शकतो? त्याचा अभ्यास आपण पुढील प्रकरणात करू या.

### *प्रकरण क्र. १६*

# नकारात्मक विचार कसे टाळावेत ?

## (How to Avoid Negative Thoughts)

- तुमचे सैतानाबाबतचे मत काय आहे? मूर्ख आहे? अशिक्षित आहे? अज्ञानी?

चूक.

तो सैतान झाला कारण त्याच्या मगरुरीमुळे ! अन्यथा तो या पृथ्वीवरील सर्वात हुषार असा प्राणीमात्र होता. कुठलीही शारीरिक शक्ति व जोर यांचा उपयोग न करता फक्त मनावर व विचारावर नियंत्रण करून तो मनुष्यप्राण्यांना जिंकून घेतो, व त्यांना योग्य मार्गावरून बाजूला खेचून नेतो.

- नकारात्मक विचार हेच अपयशाचे मूळ कारण आहेत. म्हणून सैतान हा नेहमी नकारात्मक विचार विकसित होण्यावर जास्त लक्ष केंद्रित करतो. सर्वज्ञानी ईश्वर असे सांगतो,

*शैतान तुम्हाला दारिद्र्याचे भय दाखवितो व लज्जास्पद कार्यपद्धतीचे अवलंब करण्यास प्रोत्साहन देतो, परंतु ईश्वर तुम्हाला आपली क्षमा आणि कृपेची आशा देतो.*

(पवित्र कुराण : २ : २६८)

म्हणून नीट ध्यानात ठेवा की, बरबादी ही नकारात्मक विचारांनी सुरू होते. विचार हे वाऱ्याप्रमाणे काही कारणाशिवाय तुमच्याकडे येतात व पुढे निघून जातात असे नाही. ही एक गोष्ट आहे जी तुमच्या मनात भरवली जाते किंवा इच्छाशक्तिने बाहेर काढली जाऊ शकते. माणसाला त्याच्या विचारावर नियंत्रण करण्याची ताकद दिलेली आहे. त्यामुळे काय विचार करावा व काय विचार न करावा, ह्याचा निर्णय आपण करू शकतो. विचार हे मानवाच्या नियंत्रणाखाली असल्यामुळे प्रलयाच्या दिवशी ईश्वर आपल्या विचारांचाही हिशेब घेईल.

ईश्वर सांगतो,

*'जे स्वर्गात आणि पृथ्वीवर आहे ते सर्व काही ईश्वराचे आहे. तुमच्या मनात जे आहे ते तुम्ही प्रगट कराल किंवा लपवून ठेवाल तरी ईश्वर तुम्हाला त्याचा हिशेब देण्यासाठी बोलावून घेईल.* (पवित्र कुराण २:२८४)

विचार म्हणजे काय ह्याचा, आणि मनात योग्य विचार कसे विकसित करायचे व त्यांच्यावर नियंत्रण कसे ठेवायचे? ह्यांचा अभ्यास करू.

## विचार म्हणजे काय?

• स्वप्न म्हणजे काय? मानसरोग चिकित्सक असे सांगतील की, दिवसाच्या वेळी आपल्या मनात जे विचार असतात त्याचे आपणास रात्री दृश्यस्वरुपात स्वप्न म्हणून दर्शन घडते.

एका ठराविक मर्यादेपर्यंत मानसरोगचिकित्सकाचे म्हणणे बरोबर आहे पण १०० टक्के नाही. ईश्वराला घाबरणाऱ्या सद्‌गृहस्थांची स्वप्ने ही त्यांच्या भविष्यकाळाची भाकिते व त्याच्या प्रश्नांची उत्तरे असतात, पण त्यांची भाषा सांकेतिक असते. स्वप्नांचा उलगडा करणे हे एक शास्त्र आहे. ह्याविषयावर पुष्कळ पुस्तके लिहिली गेली आहेत. पैगंबर युसूफ (अलैह सलाम) हे स्वप्नांचा संकेत अर्थ उलगडण्यात कुशल होते. आपल्या मनात जे विचार हळूवारपणे येतात व ते त्यांचे अस्तित्व वारंवार नियमितपणे दाखवून देतात, हे सुद्धा स्वप्नांसारखेच

आहेत व ते कित्येक कारणांवर अवलंबून असतात.

- साधारणपणे आपल्या मनावर परिणाम करणारे १० घटक व कारणे आहेत.

१) दैनंदिन अनुभवाचे विचार (Thoughts of daily experience)

२) विचारांचा संसर्ग (Thought Infection)

३) सैतानाचे जाळे (Ditch of Evil)

४) दृष्ट लागणे (Evil Eye)

५) नफ्स (नकारात्मक वृत्ति) (Nafs)

६) आशीर्वाद (Blessing)

७) परीक्षा (Examination)

८) इशारा (Warning)

९) शाप (Curse)

१०) सैतानाला सहज बळी पडणारे भक्ष्य
(Being easy prey for Devil)

## १) दैनंदिन अनुभवाचे विचार ( ):

आपण जे पाहातो, ऐकतो व वाचतो ते आपले जागृत व अर्धजागृत मन लक्षात ठेवते, व त्याचे आपल्या मनात घुसळण करीत ठेवते. नंतर काही सृजनशील कल्पना ह्यांची वाढ किंवा वजावट होऊन, आपण त्या परिस्थितीत आपल्या स्वतःची गुंतवणूक ह्यावर विचार करीत बसतो, किंवा काही वेळा हे काम आपण जास्त सफलतेने करीत आहोत अशी कल्पना करीत असतो.

म्हणून जी माहिती नकारात्मक आहे अशा प्रत्येक बातमीसाठी तुमच्या मनाचा दरवाजा पूर्ण बंद करा. कारण त्याचा तुम्हाला तुमच्या यशाच्या धडपडीत काही उपयोग होणार नाही. तसेच सामान्य ज्ञानासाठी सुद्धा नकारात्मक गोष्टीवर बोलू नका, ऐकू नका वा त्या पाहू नका. ईश्वराने पवित्र कुराणात असे म्हटले आहे,

*'हे पैगंबर(सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) श्रद्धावंत पुरूषांना सांगा की त्यांनी आपल्या दृष्टींची जपनूक करावी. आणि आपल्या लज्जास्थानांचे रक्षण करावे, ही त्यांच्यासाठी अधिक पवित्र पद्धत आहे. जे काही ते करतात ईश्वर त्याची खबर राखणारा आहे.* (पवित्र कुराण २४ :३०)

आणि पवित्र ऋग्वेदात ईश्वर सांगतो,

*'ईश्वराने तुम्हाला स्त्रिया बनविले आहे, म्हणून कुठे बघणे ह्याबाबतीत योग्य ती काळजी घ्या, आणि तुमची दृष्टी खाली ठेवा, आणि तुमचे दोन्ही पाय एकत्र ठेवा, व तुमचे शरीर दिसु नये असे कपडे वापरा.'* (ऋग्वेद १९-३३-८)

ईश्वराचे हे दोन्ही आदेश विचार आणि मन स्वच्छ असण्यासाठी आहेत.

तुमच्या हातातील कामावर लक्ष केंद्रित करा. तुमच्या आजूबाजूला व जगामध्ये काय घडत आहे ह्याची माहिती असू द्या. हे अत्यंत महत्त्वाचे असून तुम्ही केलेच पाहिजे. तथापि जगातील बातम्या व त्यावरील प्रतिक्रिया यांमध्ये जास्त गुंतून जाऊ नका. न्यूज़ इंडस्ट्री किंवा मीडिया हे पैसा कमवणारे उद्योगधंदे आहेत. बऱ्याच वेळा बातम्या ह्या तयार केल्या जातात व व्यावसायिक रीतीने बघणाऱ्याचे लक्ष वेधून घेण्यासाठी मोठ्या थरारक रीतीने सादर केल्या जातात. शांत व सकारात्मक मन राहाण्यासाठी त्या बातम्या गंभीरपणे विचारात घेऊ नका. तुमचा वेळ हा बलात्कार, खून, दरोडे, सिनेतारकांच्या गप्पागोष्टी, तसेच राजकारणी लोकांनी सतत बातमीमध्ये राहण्यासाठी केलेल्या बातम्या तसेच त्यांच्या राजकारणासाठी एक केलेला खेळ अशा गोष्टी वाचण्यापासून दूर राहा.

## २) विचाराची लागण : (Thought Infection)

आपण लहरी (Vibration) व शक्ति (Energy) ह्या सभोवतालच्या वातावरणातून शोषून घेतो. जर आपण सकारात्मक वृत्ति असलेल्या यशस्वी आणि वैभवशाली लोकांच्या सहवासात राहिलो,

तर आपले मन पण भरभराटीचे विचार खेचून घेईल. जर आपण जातीयवादी, गुन्हेगारी, अपयशी, निराशावादी लोकांच्या सहवासात राहिलो, तर आपले मन त्यांची नकारात्मक शक्ति शोषून घेईल, व आपण पण तसाच विचार करावयास लागू. तसेच जर आपण आपला वेळ हा मद्यगृहे (Bearbar), कॅसिनो, नाईट क्लब व ब्रॉथेल ह्यांच्यामध्ये घालविला तर आपले मन झटपट पैसा, दारू व बायका ह्यांच्यापलीकडे विचार करू शकणार नाही. जर आपण आपला वेळ औद्योगिक प्रदर्शने, कार्यशाळा व स्वयंविकास कोर्सेस व धंदेवाईक मनोवृत्तिच्या लोकांच्या सहवासात घालविला तर आपले मन निश्चितपणे धंद्याचा विकास व पैसा मिळविण्याचे मार्ग ह्या दृष्टीने सकारात्मक विचार करू लागेल. म्हणून विचार संसर्ग टाळण्यासाठी नकारात्मक वृत्तीचे लोक व समाज ह्यांच्यापासून दूर राहा.

### ३) सैतानाचे जाळे (Ditch of the Evil)

- नकारात्मक भावना म्हणजे अयोग्य राग येणे. भव्य यश, सुख, आर्थिक लाभ किंवा अन्य कुठलीही भरभराट मिळण्यापूर्वी तुम्हाला विचित्र तऱ्हेने राग येईल किंवा एखाद्या व्यक्तिच्या विरुद्ध तिरस्कार वाटेल जी तुमच्या भरभराटीचे कारण किंवा भरभराटीमध्ये गुंतली गेलेली असते.

सैतानाची ही एक प्रकारची चाल असून तुमच्याकडून तुमचा स्वतःचा राग आणी वाईट वागणूक ह्यांच्यामार्फत तुमचे वैभव दूर पळवून नेण्याची युक्ति आहे. जर तुम्हाला या खड्ड्यात पडावयाचे नसेल तर नेहमी शांत राहा. तुमची पत्नी (कुटुंब), कामगार, पुरवठादार आणि गिऱ्हाईक ह्यांच्यावर भडिमार करण्यासाठी चटकन रागावू नका. नेहमी विचारपूर्वक परिस्थितीचे परीक्षण करा व त्यानंतर कृति करा. कोणताही तात्काळ निर्णय हा रागाने घेऊ नका जर तुम्ही वरील चारही वर्गाच्या लोकांसाठी काही निर्णय घ्यायचे असेल, तर कमीत कमी २४ तास वाट पाहा व नंतर निर्णय घ्या. तुम्ही वरील परिस्थिती माझ्या खालील उदाहरणावरून समजून घ्याल.

- एका मोठ्या कंपनीने मला लहान हायड्रोलिक सिलिंडर पुरवठा करण्यासाठी बोलाविले. मी त्यांच्या कार्यालयात गेलो. त्यांच्या खरेदी अधिकाऱ्याने मला थांबण्यास सांगितले व तो नंतर जवळजवळ दीड तास कामात मग्न होता. माझी खूप निराशा झाली. या लोकांशी भविष्यामध्ये काहीही व्यवहार करावयाचा नाही असा मी निश्चय केला. मी त्यांच्या ऑफिसमधून बाहेर पडलो. व त्यांच्या फॅक्टरीच्या आवाराबाहेर पाऊल टाकणार इतक्यात त्या कार्यालयाच्या शिपायाने मला मागून हाक मारली. मी अशा रागामध्ये होतो की त्याच्या हाकेकडे दुर्लक्ष करण्याचे ठरविले व पुढे जाऊ लागलो. पण मी एक क्षणभर विचार केला व परत मागे फिरलो.

त्या कंपनीकडून त्या कमी महत्त्वाच्या ऑर्डरबरोबर मला पुढ्च्या वर्षी खूप मोठ्या ऑर्डर्स मिळाल्या.

जेथे मी ग्राहकांना भेटण्यासाठी आठ तास प्रवास करतो तेथे दीड तास थांबण्यामध्ये काहीच हरकत नव्हती. पण मला अयोग्य राग आला. जर मी रागाच्या भरात बाहेर पडलो असतो, तर मला मोठ्या फायद्यांना मुकावे लागले असते.

- माझा सर्वात वरिष्ठ फिटर हा अत्यंत पद्धतशीरपणे काम करतो पण अत्यंत हळूहळू करतो. बरेचवेळा मला असे आढळून आले की, जेव्हा कामाचे ओझे नसायचे तेव्हा काही छोटे, कमी महत्त्वाचे काम किंवा साफसफाई न करता तो आराम करणे पसंत करीत होता. त्याच्या या आरामशीर शरीर ठेवणीमुळे संताप येऊन मी त्याला कामावरून काढून टाकण्याचा निर्णय घेतला. पण तो निर्णय मी तात्काळ घेतला नाही व त्याकडे दुर्लक्ष केले. त्या प्रसंगानंतर मला एक खूप मोठी ऑर्डर मिळाली, जी मी त्या फिटरशिवाय पुर्ण करू शकलो नसतो.

त्या वरिष्ठ फिटरची आरामशीर देहबोली (Relax posture) ही गोष्ट मला नवीन नव्हती. माझे कामगार माझ्यासमोर व माझ्यामागे काय करतात ह्याची पूर्ण माहिती मला असते. पण ह्या

अयोग्य रागाचा उद्रेक इतका भयानक होता की त्या माणसाला कामावरून काढून टाकण्याचा निर्णय मी घेणार होतो. माझ्या व्यवसायात मला मोठ्या व आणीबाणीच्या ऑर्डर्स मिळण्यापूर्वी असा अयोग्य व असाधारण राग खूप वेळा आला आहे.

- माझ्या व्यवसायाच्या सुरुवातीच्या ७ वर्षांच्या कारकीर्दीत मला बरेचदा असे वाटले की मला खूप मोठी रक्कम मिळाली व जरी ही मी गोष्ट गुप्त ठेवली व कोणालाही ती माहिती पडली नाही, तरीसुद्धा माझ्या मित्रांचा व कुटुंबियांचा माझ्याशी वागण्याच्या पद्धतीत खूप बदल झाला. मला त्यांच्याकडून काहीसे मतभेद वा त्रास झाल्यासारखे वाटले.

- मी माझ्या अशीलाच्या (Client) कार्यालयातून रागाने बाहेर पडू शकलो असतो. मी कदाचित माझ्या वरिष्ठ फिटरला कामावरुन काढले असते. रागाच्या भरात मी माझी पत्नी व मित्र ह्यांच्याशी वाद घातला असता. पण अशा स्थितीमध्ये कोणाची मनःशांति व फायदा ह्यांचे नुकसान झाले असते? माझ्याशिवाय अन्य कोणाचेही नाही. ईश्वराने मला धैर्य संयम राखण्याची बुद्धी दिली. म्हणून मी सैतानाचे भक्ष्य झालो नाही व सुरक्षित राहिलो. तुमच्या मार्गाचा विचार करा. सैतानाच्या जाळ्यात सापडू नका. शांत राहण्याची सवय करा. अन्यथा नशीब चटकन दूर निघून जाईल सैतान हा मोठा कावेबाज आहे. तुमच्या रागावर त्याचे नियंत्रण झाले तर तो तुम्हाला कधीही यशस्वी होऊ देणार नाही.

- अशा प्रकारचा अयोग्य राग जास्तकरून मोठ्या फायद्यापुर्वी येतो. म्हणून जेव्हा तुम्हाला रागाची नकारात्मक भावना वाटते तेव्हा धीर धरा, शांत मनाने विचार करा व एक व दोन दिवसानंतर योग्य तो निर्णय घ्या.

- अयोग्य राग हा सुद्धा अगदी स्वच्छ राहून व रागाच्या वेळी १९ नंबराचा श्लोक तोंडपाठ म्हणून नियंत्रित केला जाऊ शकतो. (श्लोक क्र. १९ साठी प्रकरण ३३ पाहा)

## ४) दृष्ट लागणे (Evil Eye)

• मनुष्य आणि जिन (आत्मा) यांच्या डोळ्यामध्ये एक प्रकारचे विष असते. जेव्हा एखादा आपल्याकडे कौतुकाच्या किंवा मत्सरी नजरेने पाहातो तेव्हा आपल्या मनाला किंवा शरीराला ती विषारी नजर लागते. त्यामुळे आपण आजारी पडतो. किंवा आपली तर्कशुद्ध बुद्धि गमावून बसतो. व पटकन रागावतो. काही दिवसांच्या काळानंतर ह्या विषारी नजरेचा परिणाम हळूहळू कमी होतो. अशातऱ्हेच्या प्रश्नावर उपाय म्हणजे धीर धरणे व प्रार्थना करणे. सहनशील राहाण्याची सवय करा व तात्काळ आराम मिळण्यासाठी 'आध्यात्मिक अडचणींवर कशी मात करावी?' ह्या प्रकरणातील श्लोक क्र. ६ व ७ पाठ करा.

ईश्वराने पवित्र कुराणात असे म्हटले आहे की:

*"सर्व मानवजात नुकसानीत आहे, तथापि खालील लोकांना सोडून जे ,*

- *ईश्वरावर विश्वास ठेवतात*
- *सत्कर्मे करतात*
- *एकमेकांना सत्याचा उपदेश देतात*
- *व सहनशील राहतात."* (पवित्र कुराण,१०३)

म्हणून सहनशीलता (धैर्य-संयम) हा उज्ज्वल भविष्य बनविण्यासाठी एक महत्त्वाचा घटक आहे. तो नीट समजून घ्या व त्याचा तुमच्या नकारात्मक विचारांवर विजय मिळविण्यासाठी वापर करा.

## ५) नकारात्मक वृत्ति : (नफ्स) (Nafs)

प्रत्येक माणसामध्ये नकारात्मक व सकारात्मक या दोन्ही प्रवृत्ति असतात. नकारात्मक वृत्तिला नफ्स असे म्हणतात. या नफ्सच्या प्रभावाखाली लोक पाप करण्याचा प्रयत्न करतात, ईश्वराच्या विरूद्ध

बंड करतात, सोपे व आरामशीर जीवन जगण्याचा प्रयत्न करतात, व कष्ट करण्याचे टाळतात. या नफ्सच्या अंमलाखाली माणसाला वाईट गोष्टीचा विचार व त्या करणे ह्यात समाधान वाटते. जसा जसा माणूस हा नफ्सच्या चक्रात अडकतो, तशी त्याची नकारात्मक वृत्ति ही प्रामुख्याने वाढत जाते व सकारात्मक वृत्ति क्षीण होत जाते. अशा व्यक्तिला विचार करून सकारात्मक वृत्तिने काम करणे कठिण होऊन जाते.

सहज व आरामशीर जीवन ही नफ्सचे दोन मुख्य स्फुर्तीस्थाने आहेत. म्हणून साधू व ऋषीमुनी लोक हे उपवास करतात व त्यांची सकारात्मक वृत्ति बळकट व जागृत राहाण्यासाठी साधे व खडतर जीवन जगतात. म्हणून बळकट सकारात्मक वृत्ति, जबर इच्छाशक्ति व नकारात्मक विचारांवर कडक नियंत्रण राखण्यासाठी भरभराटीच्या काळातसुद्धा एखाद्या सैनिकाप्रमाणे कठोर जीवन जगण्यास शिका. सोप्या व आरामशीर जीवनशैलीसाठी उतावीळ होऊ नका. योग्य ती सकारात्मक वृत्ति व कष्ट करण्याची सवय यामुळे आपण कष्टप्रद व लांबचा योग्यमार्ग आक्रमत असताना घाबरणार नाही, किंवा चुकीच्या झटपट मार्गाने भरभराट प्राप्त करण्याचा विचार देखील आपल्या मनात येणार नाही, व आपले मन हे आपोआपच नकारात्मक विचारांना रस्ता कायमचा बंद करील.

नफ्सवर नियंत्रण ठेवण्यासाठी एक साधा सरळ उपाय म्हणजे आपल्या समाधानाच्या पातळीपेक्षा कमी बोलणे, खाणे व झोप घेणे.

### ६) आशीर्वाद (            )

विचाराचा सहावा प्रकार म्हणजे ईश्वराकडून आशीर्वाद हा आहे. जेव्हा आपण आपली कर्तव्ये पुरी करतो व एकाग्रतेने ईश्वराची प्रार्थना करतो, तेव्हा एका विशिष्ट प्रकारच्या शांत शक्तिचा आपल्याला आभास होतो. त्याला 'सकीनत' असे म्हणतात.

जेव्हा 'सकीनत' आपल्यामध्ये येते तेव्हा आपल्याला एक

अद्वितीय सुख प्राप्त होते, ज्याचे शब्दांत स्पष्टीकरण दिले जाऊ शकणार नाही. 'सकीनत' मध्ये आपल्या मनात व आत्म्यात आपणास एक प्रकारचा भुरळ पाडणारा निळा आणि पांढरा प्रकाश आल्यासारखा वाटतो. एक सुखदायक थंड संवेदना, एक सुखद आनंदाची भावना, व किंचितशी गुंगी आणणारी स्थिती प्राप्त होते. वरील सुखद आनंदाची क्रिया पुढील उदा. स्पष्ट होईल. समजा, तुम्हाला लघवी करावीशी वाटते पण तुम्हाला ती करण्यास खूप तास संधि मिळत नाही. पण जेव्हा प्रदीर्घ काळाने तुम्ही लघवी करता, तेव्हा तुम्हाला खूप सुख व समाधान वाटते. असेच ते अद्भूत सुख आहे ज्याचे आपण वर्णन करू शकत नाही.

'सकीनत' मध्ये तुम्हाला वरील स्थितीपेक्षा जास्त सुख मिळते व या 'सकीनत'च्या सुखामुळे संताना भुकेच्या वेदनेची, घोर तपस्या, प्रार्थना व खडतर जीवनाची जाणीव होत नाही.

- म्हणून 'सकीनत' अवस्था मिळण्यासाठी तुम्ही तुमचे आईवडील, कुटुंब, समाज व देश ह्यांच्यासंबंधीच्या सर्व कर्तव्यांचे पालन केले पाहिजे. तसेच तुम्ही तुमच्या हृदयाच्या तळापासून व संपूर्ण लक्ष केंद्रित करून ईश्वराची प्रार्थना केली पाहिजे.

काही वेळा आपणाला सामुदायिक प्रार्थनामध्ये अल्प प्रमाणात 'सकीनत'ची जाणीव होते. ती म्हणजे आकाशातून काही उदारवृत्तिच्या माणसांसाठी खाली येणारी स्वर्गीय शक्ति असते. पण आपण त्यांच्या सहवासात जवळ असल्यामुळे आपणावरही त्याचा परिणाम होतो, तेव्हा आपल्याला शांत व गुंगी आल्यासारखे वाटते. मी त्याला गुंगी आली असे म्हणतो कारण अशा अवस्थेत आपण तणावांपासून संपूर्णपणे मोकळे होतो व एखाद्या थकलेल्या माणसाप्रमाणे आपण निद्रिस्त होऊ लागतो.

- ह्या सहाव्या प्रकारच्या आशीर्वाद विचारात (सकीनत) स्फूर्ति, मार्गदर्शन, उच्च विचार जे आपले मन हे सृष्टीमातेकडून मिळविते ह्यांचापण समावेश आहे. असे विचार हे नेहमीच विधायक स्वरुपाचे असतात.

## ७) परीक्षा (Examination)

- सातवा, आठवा आणि नववा विचारांचे प्रकार हे नकारात्मक विचार असून, ते एकतर परीक्षा किंवा मार्गदर्शन (सूचना) किंवा शाप म्हणून आपणासाठी असतात. आपण त्यांना इच्छाशक्तीच्या बळावर टाळू शकत नाही व ते वारंवार आपल्या मनात येत असतात.

- परीक्षा प्रकारच्या विचारात आपणास जीवाच्या, प्रियजन, मालमत्ता व भरभराट ह्यांच्या नाशाची खूप भिती वाटते. आणि ईश्वर हा आपली वृत्ति अशावेळी कशी आहे हे बघत असतो. पुष्कळ वेळा लोक हे भरभराटीच्या काळात ईश्वराची प्रार्थना करतात व त्याचे आभार मानतात. परंतु कठीण प्रसंगात त्याच्याविरूद्ध तक्रार करतात व ईश्वराला विसरून जाऊन आपल्या समस्या सोडविण्यासाठी अन्य दुसऱ्या मार्गाकडे वळतात. अशा व्यक्ति ह्या परीक्षेत नापास होतात जे सहनशील राहातात तेच फक्त यशस्वी होतात व ईश्वराकडे मदतीसाठी विनंती करतात. ईश्वर सांगतो,

*'आम्ही खचितच तुम्हाला भय-भुख, जीवित व वित्त हानी आणि तुमच्या प्राप्तीमध्ये घट करून तुमची परीक्षा घेऊ. ह्या परीस्थितीत जे लोक संयमपुर्वक आचरण करतील. आणि जेव्हा जेव्हा आपत्ती येईल तेव्हा म्हणतील कि आम्ही ईश्वराचे आहोत, आणि ईश्वराकडेच आम्हाला परत जायचे आहे. त्यांना शुभसंदेश द्या. त्यांच्यावर त्यांच्या पालनकर्त्याकडुन मोठी कृपा होईल. आणि त्यांच्यावर द्येचे छत्र असेल आणि असेच लोक सन्मार्गी असतील'.*

(पवित्र कुराण २:१५५)

## ८) इशारा (Warning)

- आठव्या प्रकाराचे नकारात्मक विचार म्हणजे सृष्टीमातेकडून गूढभाषेत आपणास आपल्या चुकांबद्दल ईशारा देणारे, आपणास अपघातापासून वाचविणारे तसेच दुर्घटना व पाप यांचा ईशारा देणारे संदेश आहेत. पण हे विचार हे गूढभाषेत असतात व स्पष्ट नसतात. म्हणून तुम्हाला त्यांचा अर्थ समजून घेण्यासाठी पूर्णपणे लक्ष केंद्रित

करावे लागते. उदा. २००१ साली माझा व्यवसाय बंद करण्याचे व विदेशात दुसऱ्या कंपनीमध्ये नोकरी मिळविण्याचे विचार वारंवार माझ्या मनात येत होते. मला माझे नकारात्मक विचार समजले नाहीत. काही महिन्यानंतर माझे असंतुष्ट कामगार हे कामगार संघटनेत प्रवेश करते झाले. मी त्या सर्वांना कामावरून काढून टाकले, माझा व्यवसाय जवळजवळ बंद केला व नंतर पुन्हा चालू केला.

जर मला माझे विचार समजले असते तर मी त्या कामगारांचे पगार वाढविले असते किंवा माझ्या समस्याबद्दल त्यांचे मन वळविले असते व एक दुर्घटना टळली असती. पण मी माझ्या विचारांना समजुन घेण्यात अयशस्वी ठरलो व त्यामुळे मला मोठे नुकसान भोगावे लागले.

काही वेळा विचारांच्या प्रभावाखाली आपण अशा गोष्टींची कल्पना करतो ज्या करावयाच्या नसतात, किंवा ज्या गोष्टी आपण खूप नुकसान झाल्यानंतर करावयास सुरुवात करतो. उदाहरण, मी माझ्या एका ग्राहकाला भेटण्यासाठी माझ्या कार्यालयातून मोठ्या उत्साहाने व शांत मनाने लोकल ट्रेनच्या प्रवासाला सुरुवात केली. गाडीतून प्रवास करताना माझ्या विचारांची दिशा बदलली. मी अशी कल्पना केली की, मी १८ व्या शतकात असून मी बोटीने प्रवास करीत असून व्यवसाय करण्यासाठी जात होतो व मध्येच माझी बोट बुडली. मी कसातरी बचावलो व शत्रूपक्षाच्या किनाऱ्यावर पोहोचलो. माझी ओळख पटून मी मारला जाऊ नये ह्यासाठी मी भिकाऱ्याचा पोशाख केला. व काही करून मी माझ्या देशात जाण्याचा प्रयत्न करीत होतो.

मी असा का विचार करीत होतो ह्याचे मला नवल वाटले. गाडीत खूप गर्दी असल्यामुळे मी बराच काळ उभा आहे हे माझ्या ध्यानात आले. सुरूवातीला मी माझी ब्रिफकेस जमिनीवर दोन पायांच्या मध्ये ठेवली. जेव्हा मी थकलो तेव्हा त्यावर बसलो. या ब्रिफकेसमध्ये पैसे व माझ्या कामाच्या कागदपत्रांबरोबर धार्मिक विषयांची पुस्तके होती.

धार्मिक पुस्तकांचा व संपत्तिचा अपमान करणाऱ्याला वैभवास मुकावे लागते. अनावधानाने मी त्यांचा अपमान करीत होतो म्हणून कमनशीबाची पहिली पायरी म्हणजेच नकारात्मक विचार माझ्या मनात येण्यास सुरुवात झाली होती. मी ताबडतोब ब्रिफकेसवरून उठून उभा राहिलो, ईश्वराची त्याबद्दल माफी मागितली आणि नकारात्मक विचार तात्काळ नष्ट झाले.

जेव्हा आपण नाखुषीने नकारात्मक विचार करण्यास सुरुवात करतो, तेव्हा आपण आपल्या परिस्थितीचे परीक्षण केले पाहिजे, गुढ भाषेचा इशारा समजण्याचा प्रयत्न केला पाहिजे. आपल्या क्रिया सुधारल्या पाहिजेत, आपली कर्तव्ये पार पाडली पाहिजेत व असे केल्यावर हे विचार आपोआपच नष्ट होतात.

**) शाप (Curse)**

- परमेश्वराकडून शाप हा नववा नकारात्मक विचार आहे. परीक्षा व इशारा या प्रकारच्या विचारात आपल्या मनात नकारार्थी विचार येतात. पण त्यावेळी आपला स्वतःच्या मनावर व शरीरावर पूर्ण ताबा असतो. आणि आपण शहाणपणाने व तर्कशुद्धरीत्या वागतो. परंतु जेव्हा शाप प्रकारांचे विचार आपल्या मनात उतरण्यास सुरुवात होते, तेव्हा आपण आपली तर्कशुद्ध बुद्धि गमावून बसतो, व आपल्या स्वतःच्याच चुकीच्या निर्णयामुळे आपली अधोगति आणि विनाश सुरु होतो.

हिंदू धार्मिक पुस्तक सांगते, ''विनाशकाले विपरीत बुद्धी'' म्हणजे विनाशाच्या आधी बुद्धि भ्रष्ट होते. मनाच्या ह्या नकारात्मक अवस्थेत मन आपल्या ताब्यात राहत नाही व चुकीचे निर्णय घेतले जातात. असे नकारात्मक विचार टाळण्याचा एकमेव मार्ग म्हणजे ईश्वराची अवकृपा न होऊ देणे.

## १०) सैतानाचे सहज भक्ष्य म्हणून बळी पडणे.

**(Being easy prey for the Devil)**

आपण आपले पाहाणे व बोलणे ह्याबद्दल जेव्हा बेफिकीर राहातो, किंवा आपण नकारात्मक विचारांच्या व्यक्तिंच्या सहवासात राहून आरामशीर जीवनशैली जगून स्वतः पापी बनतो, त्यावेळी आपण सैतानाचे सहज भक्ष्य म्हणून बळी पडतो. या प्रभावाखाली आपणांस असुरक्षित, मृत्यूची भिती, आप्तजनांचा विरह, गरिबी व अशाच इतर नकारात्मक भावना आपल्या मनात उचंबळून येतात. सैतानाचा हा प्रभाव मानवजातीसाठी दुर्दैवी व कठीण आहे. सुखशांति व वैभवाच्या नाशाची सुरुवात आपल्या स्वतःच्याच कर्मांनी होते व सैतानाच्या प्रभावामुळे त्या गोष्टी वाढतच जातात. सैतानाने ईश्वरा समोर असे आव्हान केले होते की,

*'तुझ्या प्रतिष्ठेची शपथ, मी या सर्व लोकांना बहकावून सोडीन, त्या तुझ्या दासाखेरीज ज्यांना तू प्रामाणिक केले आहेस.'*

(पवित्र कुराण ३८:८३)

म्हणून जे भक्तिभावाने ईश्वरावर विश्वास ठेवतात व ईश्वरी आज्ञापालन करण्यासाठी धडपड करतात, ते सर्वप्रकारच्या भिती व नकारात्मक विचार व सैतानाचा अधिक नकारात्मक प्रभाव यांपासून मुक्त राहातात.

## नकारात्मक विचार ताब्यात ठेवण्याचे धार्मिक मार्ग :-

**(Religious way of managing Negative thoughts)**

नकारात्मक विचार आणि भिती ह्यांच्याशी समर्थपणाने लढा देण्यासाठी प्रत्येकाने ईश्वरावर श्रद्धा ठेवून योग्य रीतीने काम केले पाहिजे.

- कुराण असे सांगते,

*१) जो कोणी ईश्वराच्या प्रकोपाला भिऊन काम करील, ईश्वर त्याच्यासाठी अडचणीतुन निघण्याचा मार्ग निर्माण करून देईल.*

*२) ईश्वर त्याच्यावर श्रद्धा ठेवणाऱ्यांना अशा ठिकाणांहून मदत करतो की कोणीही त्याची कल्पनाच करू शकणार नाही.*

*३) ईश्वरावर विश्वास असणाऱ्यांच्या सर्व गरजा तो पूर्ण करतो.*

*) ईश्वर आपले कार्य सिद्ध करूनच राहतो.*

*५) ईश्वराने प्रत्येक वस्तुसाठी एक प्रमाण नियोजीत करून ठेवले आहे.*
(पवित्र कुराण सुरह-६५, आयात २-३)

तुम्ही जर खरोखर वरील पाच स्वर्गीय विधाने समजून घेतली व त्यांवर विश्वास ठेवलात तर तुम्ही तुमच्या आयुष्यात कधीही नकारात्मक विचार करणार नाही. जास्त चांगल्या तऱ्हेने समजून घेण्यासाठी मी थोडक्यात त्याचे खालीलप्रमाणे स्पष्टीकरण करीन.

**स्पष्टीकरण क्र. १**

तुमच्या अवतीभवती हजारो पक्षी असतात. पण तुम्ही त्यांच्याबद्दल कधीही काळजी करीत नाही. तुम्ही त्यापैकी एखाद्याला पकडून पिंजऱ्यात कोंडून ठेवलेत तर नक्कीच त्याला रात्रंदिवस खाऊपिऊ घालाल, त्याच्या सुखाकडे लक्ष द्याल.

याचप्रकारे जेव्हा तुम्ही ईश्वराच्या आज्ञांचे पालन करीत नाही, तेव्हा ईश्वरसुद्धा तुम्ही व तुमच्या सामाजिक दर्जा जीवनातील समस्या, तुमची मिळकत, आजारपण, तुमच्या अपेक्षा व तुमची भावी आयुष्याची गोड स्वप्ने इत्यादींची काळजी घेत नाही. पण जेव्हा तुम्ही ईश्वराच्या आदेशांच्या व सूचनांच्या मर्यादेतच वागाल. तर ईश्वर तुमच्याकडे विशेष ध्यान देतो. तो तुम्हाला प्रत्येक संकटातून वाचवतो तो तुमच्या सर्व गरजा पूर्ण करतो. तुमच्या आरामासाठी इश्वराने निश्चित केलेले सुख कुठल्याही साधनांच्या मार्गे ते सुख तुमच्यापर्यंत पोहोचते व तुमच्या वागणुकी प्रमाणे तो तुमचे भाग्य निश्चित करतो.

**स्पष्टीकरण २**

जास्त चांगल्या तऱ्हेने समजून घेण्यासाठी मी थोडक्यात त्याचे खालीलप्रमाणे पुन्हा स्पष्टीकरण करतो.

- *'जो कोणी ईश्वराच्या प्रकोपाला भिऊन काम करील, ईश्वर त्याच्यासाठी अडचणीतुन निघण्याचा मार्ग निर्माण करुन देईल..'*

तुमचे काम चांगल्यारीतीने करा व बाकी सर्व ईश्वरावर सोडून द्या. कठीण काळात जे जे म्हणून चांगले करणे शक्य आहे ते करीत राहा. प्रार्थना करा व ईश्वराची मदत मागा. ईश्वर तुम्हाला कधीही निराश करणार नाही. तो तुमची संकटे दूर करेल व जर काही वाईट घडले तर तो दुसऱ्या उपायाने वा अन्य चांगल्या तऱ्हेने ती नुकसानभरपाई भरून काढील. ईश्वर सांगतो,

> *'ईश्वरावर विश्वास ठेवणाऱ्यावर व त्याच्या आज्ञाधारक सेवकाला मदत करणे हे ईश्वराकरीता आवश्यक आहे.'*(पवित्र कुराण ३०:४७)

- *ईश्वर त्याच्यावर श्रद्धा ठेवणाऱ्यांना अशा ठिकाणांहून मदत करतो की कोणीही त्याची कल्पनाच करु शकणार नाही.*

तुमच्या इच्छेनुसार तुम्ही योजना बनवा व ती पूर्ण करण्याच्या दृष्टीने पुढे पाऊल टाका. जर तुम्ही प्रामाणिक, कष्ट करणारे व ह्या पुस्तकांत वर्णन केलेले यशाचे नियम ह्यांचे अनुकरण करत असाल तर तुम्हाला पैसा कधीही कमी पडणार नाही. तुम्हाला अशा ठिकाणाहून मदत मिळेल ज्याची तुम्ही मनात कधीही कल्पनासुद्धा केली नसेल.

- *ईश्वरावर विश्वास असणाऱ्यांच्या सर्व गरजा तो पूर्ण करतो.*

ईश्वर तुमच्या सर्व योग्य गरजा उदाहरण. कुटुंब, घर, वाहन, आरोग्य व संपत्ति इत्यादि पुऱ्या करेल. जर तुमचा त्याच्यावर विश्वास असेल तर ईश्वर तुमच्या सर्व योग्य गरजा पुर्ण करेल.

- *ईश्वर आपले कार्य सिद्ध करुनच राहतो.*

अशा पुष्कळ गोष्टी आहेत ज्या माणसाच्या आवाक्याबाहेर असतात. उदा. तुमच्या शत्रूने तुमचे यश थांबविण्यासाठी काही काळा जादूटोणा केला. पण जर तुम्ही ईश्वरावर श्रद्धा ठेवून तुमचे काम सकारात्मक वृत्तीने चालू ठेवलेत, यशाच्या नियमांप्रमाणे वाटचाल करत राहिलात तर तुम्हाला यशस्वी होण्यापासून कोणीही रोखू शकणार नाही. तुम्हाला इजा करू इच्छिणाऱ्या शत्रूपेक्षा परमेश्वर हा नक्कीच बलवान आहे. म्हणून तुमची प्रार्थना व प्रयत्न ह्यानुसार जर ईश्वराला वैभव द्यावयाचे असेल तर तुम्हाला समृद्ध होण्यापासून कुठलीही करणी थांबवू शकणार नाही.

- *ईश्वराने प्रत्येक वस्तुसाठी एक प्रमाण नियोजीत करून ठेवले आहे.*

ईश्वराने प्रत्येक माणसाचे विधिलिखित हे निश्चित करून लिहून ठेवले आहे. घटना त्यानुसार घडत राहातील. प्रत्येकाने त्यांच्याशी यशस्वीपणाने सामना करण्यास शिकले पाहिजे. उदा. मृत्यू, रोगराई, अपघात इत्यादि हे मानवजातीच्या नियंत्रणापलीकडील असतात. म्हणून तुमचे विधिलिखित जे तुम्ही बदलू शकत नाही त्याचा प्रत्येकाने स्विकार केला पाहिजे.

## काळजी (किंवा भितीला) कसे तोंड द्यावे?
## (How to fight fear?)

जर तुम्हाला धार्मिक शिकवणीबद्दल आस्था नसेल तर तुमच्या आयुष्यातील नुकसान, दर्जा, पैसा इत्यादी गोष्टीबाबत अत्यंत काळजीच्या वेळी पुढील मार्गांचा अवलंब करा.

- अशी कल्पना करा की, तुमची भिती खरी ठरली आहे, व ती मानसिकरीत्या स्वीकारण्यासाठी मनाची तयारी करा. त्यामुळे तुमच्या मनात ताण निर्माण करणारी शक्ती निघून जाईल.

- तुमचं मन एकाग्र करा व तुमच्या समस्यांवर असलेल्या उपायांची योग्य यादी बनवा.

- निरनिराळ्या उपाययोजनांचे परीक्षण करा व त्यामधील

सर्वोत्कृष्ट उपाय निवडा.

- ताबडतोब त्या उपायाचे अनुकरण करा. अन्य सर्व उपाय नाकारून टाका व मागे वळून पाहू नका. तुमचा सर्वोत्कृष्ट उपाय हा चुकीचा ठरेपर्यंत अन्य कोणत्याही उपायांचा विचार करू नका.

**नकारात्मक भावना टाळण्याचे आणखी काही उपाय :**
**(Few more tips to avoid negative feeling)**

- जशी मनात भावना असेल तशीच क्रिया होते, ह्या विधानाचा उलट अर्थसुद्धा खरा आहे. उदाहरण. जशी माणसाची क्रिया असते तशीच मनात भावना निर्माण होते. म्हणून शूर, आशावादी, यशस्वी माणसाप्रमाणे वागा त्यामुळे त्याचतऱ्हेची भावना तुमच्या मनात आपोआपच निर्माण होईल. नेहमी नीटनेटके, चांगला पोशाख सुगंधित स्प्रे शरीरावर मारलेला असे राहा, व शूर, आशावादी, यशस्वी माणसाप्रमाणे वागा.

- काल घडलेल्या गोष्टीबद्दल पश्चात्ताप करू नका. तसेच उद्याचे गुलाबी स्वप्न पाहण्यात वेळ वाया घालवु नका. फक्त तुमच्या आजवर (वर्तमानकाळावर) लक्ष केंद्रीत करा. जर तुम्ही आजचे काम चांगल्या पद्धतीने केलेत तर तुमचा भविष्यकाळ (उद्या) हा चांगला असलाच पाहिजे, आपण आज जे करतो त्याचा निकाल हा दुसऱ्या दिवशी मिळतो (किंवा पुढे कधीतरी वा भविष्यकाळी) म्हणून फक्त आजचेच काम चांगल्यारीतीने करण्यावर मन केंद्रित करा.

- जो विचार आपण मनात सतत करत असतो, मन त्या विचारांना सत्य म्हणून स्वीकार करते, म्हणून तुमच्या मनाला खालील संदेश सतत प्रसारण करीत राहा,'प्रत्येक दिवशी','प्रत्येक मार्गाने', 'ईश्वराच्या कृपेने माझी प्रगती होत आहे.

हे वाक्य एका लहान कागदाच्या तुकड्यावर लिहा व जेथे तुमचे ध्यान जाईल अशा जागी चिकटवा व रोज तो कागद वाचा. तुम्ही भरभराटीच्या मार्गाने जात आहात असे मनावर बिंबवा, त्यासाठी

मनाला तयार करा. त्यामुळे फक्त भरभराटीचेच सकारात्मक विचार तुमच्या मनात शिल्लक राहातील.

- नेहमी व्यायाम करा. त्यामुळे शरीर व आरोग्य चांगले राहते. सुदृढ शरीराचेच मन सशक्त असते. आजारी शरीराचे मनही आज़ारी असते. आजारी मन हे सुदृढ मनापेक्षा जास्त नकारात्मक विचारांकडे आकर्षित होते.

व्यायामामुळे काळजी व चिंता ह्याचा दुष्परिणाम शरीरावर कमी होतो, आणि मानसिक आजाराचा धोकापण कमी होतो.

- नेहमी वैद्यकीय मदत घ्या. काही तऱ्हेच्या विटामिनच्या अभावामुळे मानसिक रोग निर्माण होतो. ह्या आजारात माणुस जास्तीत जास्त नकारात्मक विचारांकडे आकर्षित होतो. दररोज सकाळी रिकाम्या पोटी चार ग्लास पाणी प्या व त्यानंतर सुमारे पाऊणतासाने न्याहारी करा. नेहमी कमीतकमी ३ चमचे शुद्ध मध, एक सफरचंद व एक केळे ह्यांचे सेवन करा. हे सुदृढ मनासाठी अति आवश्यक आहे. नेहमी पूर्णपणे स्वच्छ राहा. पूर्णपणे म्हणजे संपूर्णपणे. ह्याबाबतीत कुठलीही तडजोड करू नका.

- तुमचे मन, तुमचे अन्न, तुमची मिळकत, तुमची राहाण्याची जागा व कामाची जागा ह्या नेहमी स्वच्छ राहिल्या पाहिजेत व तेथे चांगली मोकळी हवा (व्हेंटिलेशन) व पुरेसा सूर्यप्रकाश असला पाहिजे. घाणेरड़ी जागा किंवा माणूस, व काळोख हे सैतानासाठी स्वर्गाप्रमाणे आहेत. म्हणून त्यांना पूर्णपणे टाळा.

- धार्मिकरीत्या पवित्र राहाण्यासाठी दर पंधरा दिवसांनी तुमच्या काखा व लज्जा स्थानावरील केस कापून टाका.

- संडासात असताना सर्व शौच व मूत्र तुमच्या शरीरापासून स्वच्छ धुण्याची काळजी घ्या. तुमचे अंतःर्वस्त्र हा लघवीचा एकही थेंब शोषून घेता कामा नये.

- प्रत्येक दिवशी गरीब व्यक्तिंना काही दान करा.

- तुमच्या घरात, कार्यालयात किंवा जेथे तुम्ही बराच वेळ राहाणार आहात अशा जागी अंधार, रिकामी व बंद जागा ठेवू नका. बंद अंधारमय व मोकळ्या जागा कदाचित तुमच्या डबलबेड, सोफा कम डबलबेड, रिकामे कपाट किंवा कृत्रिम छतांमध्ये (False Ceiling) असू शकतील. त्या मोकळ्या जागा संपूर्णपणे भरून टाका किंवा त्या दोन बाजूंनी खुल्या ठेवा.

- तुमच्या सध्याच्या नोकरीवर पूर्णपणे लक्ष ठेवा. जर तुम्ही सेवानिवृत्त झाला असाल व तुम्हाला कोणतेही विशिष्ट काम नसेल तर एखादे चांगले पुस्तक वाचा. तुमचे चांगले अनुभव लिहून काढा. तुमच्या अनुभवाचे ज्ञान व प्राविण्य हे अन्य गरजूंना शिकवा. काही चांगले काम सुरू करा. लोकांना आमंत्रित करून तुमच्या चांगल्या कार्यामध्ये मदतीचा हात देण्यास सांगा.

- इतिहास, थोर पुरुषांची आत्मचरित्रे ह्याचा अभ्यास करा. जी तुम्हाला तुमच्या संकट काळात स्फूर्ति व नैतिक बळ देतील. यामुळे मोठे, चांगले व कठिण कार्य पार पाडण्यासाठी तुमच्यातील चेतनाशक्ति जागृत होईल. इतिहासाचा अभ्यास केल्याने तुमच्या भ्रामक कल्पना व शांतताप्रिय जगाच्या अपेक्षा समाप्त होतील.

एकदा पैगंबर मूसा (अलैह सलाम) यांनी आश्चर्य वाटून ईश्वराला प्रश्न केला,

*'तुम्ही भिंतीवरील पालीला का निर्माण केले?'*

ईश्वराने उत्तर दिले, 'तू हा प्रश्न फक्त एकदाच विचारला आहेस पण या भिंतीवरील पालीने मला तीन वेळा विचारले की, मी या क्षुद्र मानवप्राण्याची निर्मीती का केली?

इतिहासाचा अभ्यास करताना तुम्हाला पण आश्चर्य वाटेल की ईश्वराने हे क्षुद्र वृत्तीचे प्राणी का निर्माण केले आहेत? इतिहास हा कत्तली, वंशहत्या, दंगली, आक्रमणे, युद्ध, विश्वासघातकी कृत्ये, अन्याय आणि पिळवणूक ह्या गोष्टीनी भरलेला आहे.

सुरक्षित आणि सुखदायी जीवन जे आज आपण जगतो, हे पूर्वी मनुष्याच्या इतिहासात शक्य नव्हते. सुखी जीवन व सुखसोयी ज्या आपण आज उपभोगत आहोत त्या पूर्वीच्या काळातील राजांनाही कधीही उपलब्ध नव्हत्या. जी उणीव आज आपल्या दैनंदिन जीवनात आहे. इतिहासाचा अभ्यास केल्याने तुमची सध्याच्या जीवनातील सुरक्षितता व सुख ह्या बाबतीतील उदासीनता कमी होईल.

इतिहासाचा अभ्यास केल्याने राजकारणी व जगातील राज्यकर्ते ह्यांच्याबद्दलच्या तुमच्या अपेक्षाही कमी होतील. कारण की इतिहास वाचताना तुम्हालाही कळेल, हा क्षुद्र वृत्तीचा प्राणी काळाप्रमाणे बदलत नाही. कत्तली, वंशहत्या, दंगली, आक्रमणे, युद्धे, विश्वासघातकी कृत्ये, अन्याय आणि पिळवणूक हे जे काही त्यांनी भुतकाळात केले तेच वर्तमान आणि भविष्यकाळातही करत राहील, व सर्वसामान्य माणसांच्या जीवनात त्रास उत्पन्न करत राहील.

**आध्यात्मिक रोग निवारण उपाय (Spritual Healing)**:

जर कोणत्याही गोष्टीने तुमची भिती व नकारात्मक विचार कमी झाले नाही, तर खालील आध्यात्मिक निवारण उपायांनी प्रयत्न करून बघा.

- स्वच्छतेच्या प्रकरणात वर्णन केल्याप्रमाणे वझू करा. (पहा, पान नं. २५३)
- तुमचा उजवा तळहात हृदयावर ठेवा.
- 'आध्यात्मिक अडथळे कसे दूर करावेत' या प्रकरणात वर्णन केल्याप्रमाणे श्लोक नं. १ एकदा मोठ्याने म्हणा.
- श्लोक नं. २ एकदा म्हणा.
- श्लोक नं. १३ (दरुद) एकवेळा म्हणा.
- श्लोक नं. १४ कमीत कमी शंभर किंवा जास्त वेळा म्हणा.

• अखेरीला श्लोक नं. १३ पुन्हा एकदा म्हणा. तुमच्या हातावर फुंकर मारा, तो हात तुमच्या छाती, चेहरा व डोळे ह्यांवर फ़िरवा.

जर हे तुम्ही नियमितपणे केलेत तर तुम्हाला तत्काळ मनःशांती मिळेल.

तसेच 'अध्यात्मिक अडथळे कसे दूर करावेत?' ह्या प्रकरणांत वर्णन केल्याप्रमाणे श्लोक क्र. ५ हा सुद्धा जितके वेळा शक्य होईल तेवढे वेळा म्हणा. हे श्लोक एखाद्या अद्‌भूत चमत्कारांप्रमाणे काम करतील. ह्या श्लोकांत आपण फक्त ईश्वराच्या आशीर्वादांची मदत घेतो, म्हणून सर्व धर्माचे लोक हे श्लोक त्यांच्या विश्वासाची सत्यता नाकारल्याशिवाय किंवा त्यांच्या विश्वासाला तडा न जाता म्हणू शकतात.

**धार्मिक मनुष्य होण्याचे फायदे :**
**(Advantages of being a religious person)**

समजा तुम्ही ट्रेनमधून तुमच्या मुलासमवेत प्रवास करीत आहात व गाडी ही पूर्ण वेगाने जात असून, तुमचा मुलगा हा चांदीचे नाणे व त्याची पिगी बँक (गल्ला) ह्यांच्याशी खेळत आहे.

मुलगा हा नाणे उडवितो व चुकीने ते नाणे धावत्या ट्रेनच्या खिडकीतून बाहेर फेकले जाते. मुलगा हा रडू लागेल व तुम्ही उदास व्हाल, कारण तुमची खात्री आहे की हे नाणे कायमचे दूर गेले आहे. कारण सामान्य माणसाला धावत्या गाडीतून बाहेर फेकले गेलेले नाणे हे शोधणे ही अशक्यप्राय गोष्ट आहे.

तथापि जर तेच नाणे चुकीने पिगी बँकेत पडले व त्यात ते जमा केले गेले. आता मुलाकड़े ते नाणे नाही. कारण तुम्ही ती पिगी बँक तोडून वा कापल्याशिवाय ते नाणे बाहेर काढू शकणार नाही. हातात नाणे नसतांनाही तुम्ही किंवा तुमचा मुलगा उदास होणार नाही, कारण की तुम्हाला खात्री आहे कि तुमचे नाणे हरवलेले नाही. आज ना उद्या ते तुम्हाला परत मिळेलच. हाच फरक ईश्वराला घाबरणारा मनुष्य व उदारमताचा *(Liberalism)* अधार्मिक माणूस

ह्यांच्यामध्ये आहे. ईश्वराला घाबरणाऱ्यास खात्री आहे की, जर एखादा मेला किंवा काही नुकसान झाले किंवा काही दुर्दैवी घटना घडली तरी हे कायमस्वरुपी नुकसान नाही. मृत व्यक्ति ही या ना त्या रुपात परमेश्वराजवळ आहे. उद्या आपणही मरणार व त्याला परत भेटणार. उलटपक्षी, उदारमतवादी असा विचार करतो की, मृत व्यक्ति ही कायमची नाहिशी झाली आहे व पुन्हा कधीही भेटणार नाही.

ईश्वराला घाबरणाऱ्या माणसाला ठाऊक असते की, तोटा वा नफा हा ईश्वराकडून आहे. आज जरी त्याला नुकसान झाले तरी उद्या ईश्वरच त्याची चांगल्या तऱ्हेने भरपाई करेल. या उलट उदारमतवादी *(Liberalism)* असा विचार करील की, जर काही नुकसान झाले तर त्यालाच पुन्हा खूप कष्ट करून काम करावे लागेल, व होणारे नुकसान भरुन काढावे लागेल, कदाचित काम करणे शक्य नाही व तिच गोष्ट परत मिळविता येणार नाही.

म्हणून उदारमतवादी हा प्रत्येक रोग, मृत्यू किंवा दुर्घटना ह्यांना भयंकर घाबरतो. त्याचवेळी ईश्वराला घाबरणारा मानव हा त्याच्या अखेरच्या श्वासापर्यंत शांत राहातो.

म्हणून ईश्वराला आपला पालनकर्ता म्हणून ओळखा ज्याने एका जोडप्यातून आपली निर्मिती केली. ईश्वरावर विश्वास ठेवा, व जर भितीपासून मुक्त असे सकारात्मक आयुष्य हवे असल्यास, ईश्वरावर गाढ श्रद्धा ठेवा.

प्रकरण १७

# प्राचीन तत्त्वज्ञान

## (Ancient Philosophy)



- माणसाचे मन व आत्मा हे एखाद्या विहिरीप्रमाणे आहे. पाच संवेदना ह्या ५ मार्गासारख्या असून त्या विहीरीकडे जातात. जेव्हा आपण आपल्या बघण्याची, ऐकण्याची, खाण्याची काळजी घेत नाही, तेव्हा स्वच्छ पाण्यात घाणेरडे पाणी वाहाते व विहीरीतील पाणी दूषित करते. आणि ते आध्यात्मिक जगाकडे जाणारा तळाचा ६ वा मार्ग बंद करते.

- हा सहावा मार्ग खुला करण्यासाठी प्रथम आपल्याला घाणेरड्या पाण्याचा प्रवाह विहीरीत येण्याचा थांबविला पाहिजे. नंतर चिखल व घाण ही त्यांतून काढून विहीर रिकामी केली पाहिजे. त्यानंतरच ६ व्या मार्गातून पाणी विहीरीत वाहू लागेल. जर आपण तो मार्ग योग्य तऱ्हेने बरोबर स्वच्छ केला, तर एवढया मोठ्या प्रमाणात पाणी हे आत येईल की विहीर तुडूंब भरून वाहू लागेल, अशा परिस्थीतीत ५ ही मार्गातून अस्वच्छ पाणी अजिबात विहीरीत येणार नाही.

- आध्यात्मिक जगाशी संपर्क करण्यासाठी पहिल्या प्रथम आपण आपल्या पाच संवेदनाचा गैरवापर टाळला पाहिजे, व ईश्वराने ज्या तऱ्हेने आदेश दिला आहे त्याच रितीने संवेदना वापरल्या पाहिजेत.

आपल्या विरुद्ध लिंगाच्या व्यक्तिकडे टक लावून व वाईट भावनेने बघण्याचे टाळा. दुसऱ्या व्यक्तिंच्या चुका व त्यांचा कमीपणा, गुप्त गोष्टी ऐकण्याचे व बोलण्याचे टाळा. अश्लील भाषा बोलू नका व ऐकू नका. वाईट वागू नका. ईश्वराने ज्या गोष्टी वर्ज्य केल्या आहेत, उदा, फसवणूक करून मिळालेला पैसा व व्याजाची रक्कम, दारु, डुकराचे मांस, धार्मिक पद्धतीने हलाल न केलेले मटन, वगैरे खाऊ व पिऊ नका. चुकीच्या संवेदना, प्रेम व संभोग ह्या गोष्टीची मजा तुमची पत्नी सोडून अन्य स्त्रीबरोबर घेऊ नका. जर तुम्ही ह्या सर्व गोष्टींपासून दूर राहिलात तरच तुमच्या आत्मारुपी विहीरीत घाणेरडे पाणी येणे बंद होईल.

सहावा मार्ग हा स्वर्गलोकाशी संपर्क करणारा मार्ग आहे.

ईश्वर सांगतो,

*'आम्ही त्यांना ज्ञान दिले.'* (पवित्र कुराण, सूरह काहफ़ : १८-६५)
हाच तो मार्ग आहे जेथून ज्ञान हे प्रेषित व संत ह्यांच्याकडे येते. मानवजातीची सेवा करण्याची स्फूर्ति सामान्य माणसाला ह्याच मार्गातून मिळते. तसेच स्वतःच्या बांधवांसाठी चांगले काम करण्याची प्रेरणाही मिळते.

जीवनात यशस्वी होण्यासाठी व प्रचंड संपत्ति गोळा करण्याचे मार्ग शोधण्यासाठी व्यावसायिक व उद्योजक ह्यांनी कल्पना व योजना ह्यांचा शोध ह्याच मार्गाने घेतला पाहिजे.
(हे लेखकाचे वैयक्तिक मत आहे.)

- मन रिकामे करण्यासाठी तुम्ही ईश्वराने करावयास सांगितलेल्या मार्गाने ईश्वराची प्रार्थना करा. तुमचे डोळे बंद करून पाचही संवेदनांचा वापर करणे बंद करा, व आपण कोण आहोत ह्यावर लक्ष केंद्रित करा, ह्यालाच ध्यान (किंवा चिंतन) असे म्हणतात.

- बघण्यासाठी डोळे, ऐकण्यासाठी कान व चव घेण्यासाठी जीभ ह्यांची निर्मिती झालेली आहे. तुम्ही तुमच्या कानाने भोजनाचा किंवा जीभेने संगीताचा आनंद घेऊ शकत नाही. जर तुम्ही आवाजासाठी कान, बघण्यासाठी डोळे व रूचकर अन्नाची चव घेण्यासाठी जीभ ह्यांचा वापर केलात तरच तुम्हाला आनंद वाटेल.

त्याचप्रमाणे ईश्वराने मनुष्यप्राणी (मानवांचे आत्मे) आणि जिन्न ह्यांची निर्मिती ही ईश्वराच्या प्रार्थनेसाठी केली आहे. जेव्हा तो (मनुष्यप्राणी) ईश्वराची प्रार्थना करील. तेव्हा त्याला जीवनात खरे सुख मिळविता येईल व त्याचा आत्माही शांत व सुखी होईल. कान हा भोजनाचा आनंद घेऊ शकत नाही, त्याचप्रमाणे आत्मा हा भौतिक जगातील खळबळजनक घटना व धनदौलत ह्यांमधून शांती व सुखाचा आनंदही घेऊ शकत नाही.

- आपण दूरचे अंतर जाण्यासाठी वाहनाचा वापर करतो. आपण कठिण गोष्टी साध्य करण्यासाठी निरनिराळी यंत्रे व उपकरणे वापरतो.

आत्म्याला खूप लांबच्या अंतराचा प्रवास करावयाचा असतो, व कठिण काम करावयाचे असते. शरीर हे त्याचे वाहन, तसेच यंत्रे व उपकरणे आहेत. ह्या यंत्राच्या मदतीने आत्म्याला त्याचा जगात काय हेतू आहे ह्याचा शोध घ्यावयाचा असतो, व ह्या वाहनाच्या साहाय्याने त्याला त्याचे अंतिम ठिकाण गाठावयाचे असते. एकदा माणसाने योग्य जीवनक्रम, योग्य प्रार्थना, चांगली कामे करून ईश्वराला खुश करण्याचे कार्य पूर्ण केले की, त्याला त्याची यंत्रे वा वाहन ह्यांची गरज लागत नाही. तो त्यामधून खाली उतरतो व स्वर्गात ईश्वराजवळ शांतपणे राहातो.

- ईश्वराने ह्या विश्वाचा ताबा हा देवदूतांच्या (Angels) नियंत्रणाखाली दिला आहे. ईश्वराच्या परवानगीने जेव्हा जरूर असेल तेव्हा देवदूत पाऊस पाडतात, ते आईच्या गर्भात असलेल्या शिशुमध्ये आत्मा घालतात, ते बिया सुपीक करतात व त्यांचे मोठ्या झाडात रुपांतर करतात.

त्याचप्रमाणे परमेश्वराने ह्या शरीराचा ताबा आत्म्याच्या नियंत्रणाखाली दिला आहे. खाण्यापूर्वी तो पाऊस सुरू करतो (लाळ गाळण्याची क्रिया), संभोगापूर्वी तो वारा चालू करतो, ज्यामुळे संभोगइंद्रिय भावना उद्दिपीत करतो. बोटे आणि अवयव हे आत्म्याच्या हुकूमानुसार हालचाल करतात.

- आत्म्याला स्वतःचे शरीर नियंत्रण करण्याची शक्ति आहे, त्याचबरोबर तो आजूबाजूच्या वातावरणावर पण परिणाम घडवितो. उदाहरण, जेव्हा एखादा संत हा आजारी माणसाकडे कृपादृष्टीने पाहातो तेव्हा ईश्वराच्या कृपेने तो त्याचा आजार बरा करतो.

- वरील सर्व तत्वज्ञाने ही हजारो वर्षे जुन्या पुस्तकांतून घेतली आहेत. हे पुस्तक इमाम गज़ाली यांनी लिहीले आहे व पुस्तकाचे नाव कीम्या-ए सआदत् असे आहे.

इमाम गझालीची तत्वज्ञाने असे सूचित करतात की,

- ईश्वर एक सर्वश्रेष्ठ शक्ति आहे.
- ह्या जगावर नियंत्रण करणारी देवदूतांची (Angels) एक यंत्रणा आहे.
- आत्मा हा असा आहे की त्याचे स्वतःच्या शरीरावर नियंत्रण असून त्याचा प्रभाव अन्य दुसऱ्यांवर पण आहे.
- आत्मा व आध्यात्मिक जग यांची एकमेकांशी साखळी आहे व त्यांचा संपर्क सहाव्या मार्गाशी आहे.
- आपल्याला धार्मिक व शास्त्रीय शिक्षण ह्यात समानता वाटते.

धार्मिक लोक हे ईश्वर, देवदूत व आत्मा ह्यांच्यावर विश्वास ठेवतात. अधार्मिक लोकांचा ईश्वर, देवदूत आणि आत्मा ह्यांच्यावर विश्वास नसतो. परंतु या जगात एक सर्वश्रेष्ठ शक्ति आहे, जिला अधार्मिक लोक अमर्यादित बुद्धिमत्ता (Infinite intelligence) असे म्हणतात. हिचे अस्तित्व आहे हे अधार्मिक लोक पण मान्य करतात. ते देवदूत नाकारतात पण निसर्ग ह्या जगाचे पद्धतशीर व्यवस्थापन करतो ह्यावर सहमत आहेत. ते आत्म्याचे अस्तित्व झिडकारतात, पण अर्धजागृत मनाचे अस्तित्व व त्याचे आपल्या स्वतःच्या जीवनावर व इतरांच्या जीवनात होणारे जादूमय परिणाम हे मान्य करतात.

आपण शास्त्र आणि धर्म ह्यांच्यामधील ह्या वादविवादांना महत्त्व न देता, ईश्वर देवदूत आणि आत्मा किंवा अमर्यादित बुद्धिमत्ता आणि निसर्गमाता व अर्धजागृत मन ह्यांचा उपयोग करून कसे यशस्वी होता येईल ह्यावर जास्त लक्ष केंद्रित करु या !

## प्रकरण १८

# चिकाटी

## (Persistence)

**चिकाटीचे महत्व (Importance of Persistence):**

शुद्ध स्वरुपात लोखंड हे मऊ (Soft) आणि ठिसूळ (Ductile) असते व शुद्ध स्वरुपात त्याचा क्वचितच वापर केला जातो. जेव्हा फक्त ०.१% कार्बन त्यात मिसळला तर लोखंडाचा मजबूती व कठीणपणा हा थोड्या फार प्रमाणात वाढतो. अशा तऱ्हेच्या लोखंडाचा वापर भांडी बनवण्यासाठी होतो. जेव्हा आणखी ०.१% ते ०.२% कार्बन हा स्टीलमध्ये मिसळला असता त्याची मजबुती (Strength) व कठोरपणा (Hardness) हा एका माफक मर्यादेपर्यंत वाढतो. हेच स्टील आपल्या रोजच्या दैनंदिन व्यवहारात वापरले जाते. त्या स्टीलमध्ये ०.२ ते ०.३ कार्बन असतो. आणखी ०.१% कार्बन मिसळला तर स्टीलची तंतुभवशीलता (Ductile) कमी होऊन मजबूतपणा (Strength) आणखी वाढतो. अशा प्रकारच्या स्टीलचा वापर हा दाबजन्य घटकवस्तू उदा. बोल्ट, रेल्वेचे (Axle shaft) इत्यादि तयार करण्यासाठी होतो. आणखी पुढे ०.१% कार्बन स्टीलमध्ये समाविष्ट केला तर, बनणाऱ्या स्टीलला साधे कार्बन मिश्रधातू स्टील असे म्हणतात. व त्याचा वापर आवश्यक असेल त्या ठिकाणीच करतात. त्याचा उपयोग सर्वसामान्य वापरासाठी करीत नाहीत.

लहान प्रमाणातील कार्बनचे मिश्रण हे स्टीलच्या गुणधर्मावर जादूप्रमाणे परिणाम करते. ते त्याला उपयोगी किंवा निरूपयोगी (Useless) बनविते.

चिकाटीचा असाच जादूई परिणाम मानवाच्या यशामध्ये आहे. ती माणसाला पण उपयोगी वा निरुपयोगी बनविते. चिकाटीशिवाय एखाद्यास यश मिळत नाही.

आपण सर्वांनी ससा आणि कासवाची गोष्ट वाचली आहे. अशी शर्यत इतिहासामध्ये खरोखर झालीच नव्हती. तथापि सर्व जगात प्रत्येक भाषा व संस्कृतिमध्ये ही गोष्ट शिकविली जाते. त्यामागे आपल्या मनावर चिकाटीचे (किंवा दीर्घोद्योग) महत्त्व बिंबवण्याचा हा एक मार्ग आहे.

- एका राजाचे राजाधिकार एका बंडामुळे नष्ट झाले. त्याचा धीर खचला व त्याने सर्व आशा सोडून दिल्या. त्याने एका गुहेमध्ये आश्रय घेतला. तेथे त्याने एक मुंगी ही भिंतीवर चढून जाण्याचा प्रयत्न करताना पाहिली. बऱ्याच अयशस्वी प्रयत्नानंतर अखेर शेवटी ती मुंगी भिंतीवर चढण्यात यशस्वी झाली. राजाने त्या मुंगीच्या उदाहरणापासून योग्य तो बोध घेतला व वारंवार गनिमी काव्याने हल्ले चढवून त्याने त्याच्या बंडखोरांचा पराभव केला व आपले राज्य सिंहासन परत मिळविले.

- अशा गोष्टी खऱ्या असतील किंवा खोट्या पण असू शकतील. पण त्या आपल्याला नेहमी यशासाठी चिकाटी ही आवश्यक आहे अशी शिकवण देतात.

## परीक्षा

- जेव्हा तुम्ही स्वयंप्रेरणेनुसार तुमच्या कार्य योजना अंमलात आणता, तेव्हा तुम्ही पहिल्या प्रयत्नांत यशस्वी होणार नाही. दुसऱ्या किंवा तिसऱ्या प्रयत्नामध्ये पण यशस्वी होणार नाही. यश मिळविण्यासाठी खूप वेळ लागतो. पण प्रत्येक अपयशानंतर तुम्ही त्या अपयशाच्या

कारणाचे निरीक्षण केले पाहिजे. तुमची कार्यपद्धति बरोबर केली पाहिजे व वारंवार प्रयत्न केले पाहिजेत. प्रत्येक अपयशानंतर तुमची कार्ययोजना जास्त परिपूर्ण होईल.

- पदवीधर होण्यासाठी तुम्हाला दोन ते तीन वर्षांत २० पेक्षा जास्त पेपरात पास व्हावे लागते. निसर्गमाता सुद्धा तुम्ही यशस्वी व श्रीमंत व्यक्ति होण्यापूर्वी परीक्षा घेत असते व तुम्हाला खूप पेपरात पास व्हावे लागते. आवश्यक ते ज्ञान असल्याशिवाय तुम्हाला पदवीचे प्रमाणपत्र मिळत नाही, त्याचप्रमाणे जरुर ती कौशल्ये असल्याशिवाय तुम्ही यशस्वी किंवा लखपतिही बनणार नाही.

निसर्गमातेचे काही परीक्षांचे पेपर्स म्हणजे तीव्र इच्छा, स्पष्ट ध्येय, विश्वास (आत्मविश्वास), कल्पनाशक्ति (कल्पना किंवा स्वप्ने) निर्णयक्षमता व चिकाटी वगैरे आहेत.

**कमी चिकाटीची कारणे (Cause of poor persistence):**

- चिकाटीला चालना देणारी शक्ति म्हणजे इच्छाशक्ति. इच्छाशक्तिला चालना देणारी शक्ति म्हणजे तीव्र इच्छा. तीव्र इच्छा किंवा ज्वलंत इच्छा यांना चालना देणारी शक्ति म्हणजे यशावरील पुर्ण श्रद्धा.

- जेव्हा माणसांत चिकाटीची उणीव असते, त्याला काही कारणे असतात. तसेच काही गोष्टी असतात. ज्या ज्वलंत इच्छेला इंधन पुरवठा बंद करतात. कमी चिकाटीच्या अभावाची काही कारणे आता आपण पाहू या.

- जी कारणे ज्यांमुळे लोकांचे मानसिक धैर्य खचते व चिकाटी नष्ट होते ती पुढीलप्रमाणे आहेत.

१) टीका (Criticism)

२) नकारात्मक प्रभाव (Negative influence)

३) तडजोड करणारा स्वभाव (Compromising nature)

४) प्रेरणा देणाऱ्या गोष्टीची अनुपस्थिति
(Absence of motivating factor)

## १) टीका

- टीकेच्या भितीमुळे लोक हे सावधपणे पावले टाकतात, धोका पत्करत नाहीत. ते पुर्ण प्रयत्न करत नाहीत व अपयशाच्या बाबतीत पलायनाचा सुरक्षित मार्ग मोकळा ठेवतात. त्यामुळे त्यांच्याकडून जास्तीत जास्त प्रयत्न केले जात नाहीत. ते यशासाठी फक्त नाउमेदीने प्रयत्न करतात व अपयशाच्या पहिल्याच संकेतावर ते माघार घेतात.

- टीकेच्या भीतीमुळे लोक त्यांच्या स्वतःच्या आयुष्याबद्दल धाडसी निर्णय घेऊ शकत नाहीत. उदा. विवाह, घटस्फोट, एकत्र कुटुंबातून वेगळे होणे, भागीदारीची वाटणी इत्यादि. त्यांना अशी भिती वाटते की, लोक त्यांना स्वार्थी, अहंकारी, चक्रम वगैरे म्हणतील. ह्या सर्व भयांमुळे ते तडजोडीचे जीवन जगण्याचा प्रयत्न करतात. फक्त खंबीर आणि योग्य निर्णयच यश आणतो, असाहाय्य तडजोडयुक्त जीवनशैली नाही.

- टीकेच्या भितीमुळे व्यक्ति महाविद्यालय किंवा रात्रीच्या शाळेत किंवा व्यावसायिक क्लासेसमध्ये एका ठराविक वयानंतर जात नाहीत. खास तऱ्हेच्या ज्ञानामुळे ते जीवनात यशवंत ठरले असते, पण टीकेच्या भितीपोटी ते विशिष्ट ज्ञान घेत नाहीत व अपयशीच राहातात.

- टीकेच्या भितीमुळे लोक हे मोठे ध्येय ठेवत नाहीत. त्यांना अशी भिती वाटते की, समाज त्यांना अतिमहत्त्वाकांक्षी, जास्त हुषार वगैरे म्हणतील त्यांना ह्याची पण भिती वाटते की, जर ते अपयशी ठरले तर लोक त्यांना हसतील व त्यांची टिंगल करतील. म्हणून ते मोठे ध्येय ठेवीत नाहीत किंवा जास्त यश मिळविण्यासाठी प्रयत्न करीत नाहीत. जर एखाद्याने उत्तम यश मिळविण्यासाठी प्रयत्नच केले नाहीत तर त्यांना यश कसे मिळेल?

- इच्छाशक्तिला चालना देणारी शक्ति ही ज्वलंत इच्छा असल्याने टीकेच्या भयापोटी लोकांच्या अंतःकरणात इच्छा ही पेटूनच येत नाही त्यामुळे इच्छाशक्ति दुबळी राहाते. कमजोर इच्छाशक्तिचा परिणाम हा कमकुवत चिकाटीमध्ये होतो. व कमी चिकाटीचा निकाल म्हणजे अपयश हा होय.

- खालील काही उपाय हे टीकेच्या भितीचे निराकरण करतील.

- खालील आकृति व गोष्टी यावर विश्वास ठेवा, लक्षात ठेवा व टीकेच्या भयावर मात करा.

- तुमचे मित्र, कुटुंब व समाज ह्यांच्या नजरेत तुमच्याबद्दलचा आदर हा तुमची चांगली कामे व तुमचे चारित्र्य ह्यावर अवलंबून असतो. आदर हा हृदयातून निर्माण होतो. व हृदय व मन ह्यांचे नियंत्रण ईश्वर करतो. जोपर्यंत तुमचे चारित्र्य हे उच्च आहे, तोपर्यंत ईश्वर तुमचे मित्र, कुटुंब व समाज ह्यांच्या नजरेत तुमच्याबद्दलचा आदर हा तुमची स्थिति व तुमच्या योजनांचे यश किंवा अपयश ह्या गोष्टी लक्षात न घेता कमी होऊ देणार नाही. संपत्तिचे प्रदर्शन, श्रीमंति, फॅशनेबल कपडे, सजविलेली घरे व आरामशीर वाहने ह्यांच्यामुळे लोकांच्या हृदयात तुमच्याबद्दल आदर निर्माण होणार नाही किंवा वर वर्णन केलेल्या गोष्टी नष्ट झाल्यामुळे तुमचा आदर कमीही होणार नाही.

- उदा. एखादा पोलिस अधिकारी हा तुमच्या घरी उत्कृष्ट सूट व महागड्या गाडीतून येतो. तुम्ही ताबडतोब त्याचे स्वागत करता व त्याला मान देण्यासाठी तुमचे उत्कृष्ट प्रयत्न करता.

तो पोलिस अधिकारी निघून गेल्यानंतर तुमचे गरीब शिक्षक तुमच्या घरी येतात. तुम्ही पोलिस अधिकाऱ्यासाठी जे शिष्टाचार संमत केलेत ते चांगले शिष्टाचार पालन तुम्ही गरीब शिक्षकासाठी कदाचित करणार नाही. तुमचे शिक्षक घरांतून बाहेर निघून गेल्यानंतर तुमच्या अंतःकरणावर लक्ष केंद्रित करा व तुम्ही कोणाला मनापासून

मान देता ह्यांचे निरीक्षण करा. तो विशिष्ट पोलिस अधिकारी हा बेकायदेशीर व्यवसाय तसेच ब्ल्यू फिल्म दाखविणाऱ्या विडिओ पार्लरमधून लाच घेतो. ह्याचे तुम्हाला ज्ञान असले, तरी तुम्ही त्याचे राजेशाही स्वागत केले, पण तुमच्या अंतःकरणात तुम्ही त्यांचा तिरस्कार करता. व तुमच्या सभ्य शिक्षकाचे जरी तुम्ही चांगले स्वागत केले नाही तरी तुम्ही त्यांच्यावर खऱ्या अंतःकरणाने प्रेम करता.

- अशी घटना तुमच्या बाबतीतही घडू शकते. कोणीतरी तुम्हाला तशीच राजेशाही थाटाची वागणूक देत नाही, जो त्या एखाद्या पापी माणसाला देतो. परंतु तुम्ही सज्जन असाल व तुमची कृत्ये ही चांगली असतील तर लोक तुमच्यावर अंतःकरणापासून प्रेम करतील. प्रत्यक्षात तुम्हाला जेवढी स्वतःविषयी माहिती असते त्यापेक्षा लोकांना तुमच्याबद्दल जास्त ठाऊक असते, ते संपत्तीचे प्रदर्शन व शैली, ह्यांनी फसविले जात नाहीत व तुमच्या चारित्र्यानुसारच ते तुम्हाला मान देतात.

- पवित्र कुराण असे सांगते,

*'हे ईश्वर समस्त राज्याचा स्वामी! तु हवे त्याला राज्य देतोस व हवे त्याकडुन हिरावुन घंतोस. हवे त्याला प्रतिष्ठा प्रदान करतोस व हवे त्याला अपमानित करतोस. कल्याण तुझ्याच अखत्यारित आहे.*

(पवित्र कुराण ३:२६)

म्हणून टीकेमुळे घाबरून जाऊ नका. कारण तुमचा सन्मान हा यशासाठी केलेल्या प्रयत्नात अपयश आल्याने कमी होणार नाही, पण जर तुम्ही स्वतःची नैतिक मूल्ये कमी केलीत तरच तुमचा मान कमी होईल.

- डेल कार्नेग हा त्याच्या (How to stop worrying and start living)'काळजी करणे कसे थांबवावे व जीवन जगण्यास सुरूवात कशी करावी? 'या सुप्रसिद्ध पुस्तकांत सांगतो, 'तुमच्या अंतःकरणात तुम्हाला जे योग्य वाटते तेच करा. कारण तुमच्यावर कोणत्याही

तऱ्हेने टीका केली जाईल. तुम्ही काही केलेत तरी त्याची निंदा होईल व तुम्ही काहीही केले नाहीत तरी त्याची पण निंदा केली जाईल. म्हणून टीकेबद्दल मुळीच काळजी करू नका.

- अब्राहम लिंकन यांनी मूळच्या आफ्रिकन असलेल्या लोकांची गुलामगिरीपासून मुक्तता करण्याचा धाडसी व धोकेदायक निर्णय घेतला. त्याच्यावर पुष्कळ टीकेची झोड उठली व त्यांचे मित्र तसेच शत्रू ह्यांनी त्याचा तीव्र धिक्कार केला. डेल कार्नेगने अब्राहम लिंकनचे टीकेवरील तत्त्वज्ञान खालील शब्दांत सांगितले आहे. अब्राहम लिंकन सांगतात 'जर मी टीका असलेली सर्व पत्रे वाचण्याचा प्रयत्न केला, ज्यापैकी जवळजवळ सर्वांची उत्तरे द्यावयाची नाहीत, तर हे कार्यालय मला बंद करावे लागेल. मी माझ्या क्षमतेनुसार जास्तीत जास्त चांगले करण्याचा मी प्रयत्न करतो. व अखेरपर्यंत मी चांगलेच करत राहाणार हा माझा शब्द आहे. जर ह्या सर्वांचा शेवट मला चांगला मिळाला तर माझ्याविरूद्ध काय सांगितले गेले ह्याला महत्त्व नाही. जर माझा शेवट चुकीचा असला तर जरी देवदूतांनी शपथेवर सांगितले की, मी बरोबर होतो तरी काही फरक पडणार नाही.'

शेवटी डेल कार्नेग असे सांगतो,

(Do the very best you can do and then put up your old umbrella and keep the rain of criticism from running down the back of your neck)

'तुम्हाला जे चांगले करणे शक्य आहे ते करा आणि लोकांच्या टिकेवर लक्ष देऊ नका.' टीकेमुळे घाबरून जाऊ नका व तुमच्या प्रयत्नांत चिकाटी धरून वागा.

## २) नकारात्मक प्रभाव (Negative Influence):

मानवी शरीर हे इतके गुंतागुंतीच्या गुणधर्माचे आहे की, शेवटच्या शतकापासून त्याचा अभ्यास व परिक्षणाखाली आहे. तरीसुद्धा आपण ही गुंतागुंती पूर्णपणे समजू शकलेलो नाही. मन आणि आत्मा हे शरीरापेक्षा जास्त गुंतागुंतीचे आहेत. कारण त्यात फक्त भौतिक

पदार्थच नाही तर काही प्रकारची शक्तिही (Energy) सामील आहे.

निरीक्षण व अनुभव ह्यांच्यावरून तत्वज्ञानी, मनोविकार चिकित्सक व डॉक्टर्स हे त्याबद्दल काही आकडे व सत्यता सांगु शकतात त्यापैकी काही खाली दिले आहेत.

- विचार ही शक्ति वा स्पंदनांची एक लाट आहे. प्रत्येक प्रकारच्या विचाराला निरनिराळे स्पंदन वा तरंगलहरी असते. प्रत्येक मनुष्य हा त्याच्या मनातील विचारानुसार स्पंदन किंवा ऊर्जा बाहेर सोडत असतो. तसेच तो त्या दुसऱ्यांकडून पण स्वीकारतो.

- सकारात्मक वृत्ति, उमदे विचार व जबर महत्त्वाकांक्षा असलेली व्यक्ति ही त्याला भेटणाऱ्या प्रत्येक व्यक्तिमध्ये तशाच प्रकारचे विचार व महत्त्वाकांक्षा निर्माण करते.

- नकारात्मक वृत्ति, संहारात्मक विचार, उदासपणा, नैराश्य व गुन्हेगारी प्रवृत्ति असलेली व्यक्ति ही त्याला भेटणाऱ्या प्रत्येकामध्ये त्याच प्रकारचे विचार व वृत्ति उत्पन्न करते.

कुठल्याही तऱ्हेचा नकारात्मक विचार हा ताबडतोब उत्पादनशील कल्पनेचा बळी घेतो. नकारार्थी विचाराने नकारात्मक व्यक्तिमत्व विकसित होते आणि अशा व्यक्तिंचा लोक तिरस्कार करतात. तसेच नकारात्मक विचार हा त्या व्यक्तिच्या अर्धजागृत मनात खोल रुतून बसतो.

- कंदीलामध्ये ज्योतीचे संरक्षण करण्यासाठी काच आहे तोपर्यंत ज्योत ही सोसाट्याच्या वाऱ्यात पण जळत राहाते. तथापि ही काच काढल्यावर एक लहानशा फुंकर मारण्याने पण ही ज्योत विझून जाईल. ज्वलंत इच्छा ही जळणाऱ्या ज्योतिप्रमाणे आहे, तिचे इंधन विश्वास हे आहे व संरक्षण करणारी काच म्हणजे न संपणारी व दृढ सकारात्मक वृत्ति ही आहे. त्या दृढ सकारात्मक वृत्तीनेच ह्या ज्योतीचे विझण्यापासून संरक्षण केले गेले पाहिजे. नकारार्थी विचार करणारे, निराशावादी, उणीवा काढणारे, गुन्हेगारी प्रवृत्तिची माणसे व ज्यांनी

आयुष्यात तडजोड करून गरिबीचा स्विकार केला आहे व जे भरभराटीसाठी धडपड करीत नाहीत अशा व्यक्ति ह्या जळत्या ज्योतीला विझविणारी साधने आहेत.

- जोपर्यंत तुमचा स्वयंसुचनेचा (Auto-suggestion) अभ्यास परीपुर्ण नाही व तुमची इच्छाशक्तिही कमकुवत आहे. तोपर्यंत अशा लोकांपासून नेहमी दूर राहाण्याची काळजी घ्या.

- जर तुम्ही तंदुरूस्त असाल तर तुम्हाला सर्दी, खोकला व इतर संसर्गजन्य रोग पटकन होणार नाहीत. तरीसुद्धा तुम्ही सर्दी व खोकला तसेच सर्व तऱ्हेच्या संसर्गजन्य रोगांपासून बचावाची काळजी घेता. नकारात्मक विचार करणारे व तशाच तऱ्हेचा समूह हे बौद्धिक संसर्गजन्य (Intellectual infection) रोगाचे उगमस्थान आहे. जर तुम्हाला ज्वलंत इच्छेची ज्योत सतत पेटती राहावी व तुमची चिकाटी कायम राहावी असे वाटत असेल तर अशा लोकांपासून दूर राहा.

- एक प्रसिद्ध म्हण आहे,(A man is known by the company he keeps) 'मानव ज्यांच्या सहवासात राहातो त्यावरून ओळखला जातो.' ही खरोखरच सत्य वस्तुस्थिती आहे. नेहमी सकारात्मक वा यशस्वी व्यक्तिंच्या सहवासात राहा किंवा एकटे राहा पण कधीही बौद्धिक संसर्गजन्य रोगाने पछाडलेल्या समुहात राहू नका.

### ३) तडजोडीचा स्वभाव (Compromising Nature)

- लोकांची चिकाटी व विश्वास कमी होतो, कारण ते जीवनात मानखंडना व गरिबीला स्वीकारतात व ते स्वतःला दुर्दैवी असे समजतात. तथापि खालील श्लोक लक्षात ठेवले तर तुमचे जीवनच बदलून जाईल व तुम्हाला चिकाटी व विश्वास प्राप्त होईल.

- पवित्र कुराण असे सांगते,

*'ईश्वर कोणत्याही व्यक्तिवर त्याच्या शक्तिपेक्षा जास्त जबाबदारीचे ओझे टाकीत नसतो. प्रत्येक व्यक्तीने जे पुण्य कमविले आहे, त्याचे फळ*

*त्याच्यासाठीच आहे आणि जे पाप गोळा केले आहे त्याचा दृष्परिणाम त्याच्यावरच होणार आहे'* (पवित्र कुराण २:२८६)

*'आणि असे की मानवासाठी काहीच नाही परंतु ते ज्यासाठी त्याने प्रयत्न केला आहे.'* (पवित्र कुराण ५३ :३९)

- ईश्वर पवित्र बायबलमध्ये असे सांगतो,

  *'मला हाक मारा आणि मी त्याला प्रतिसाद देईन'* (Jer.३३.३)

- 'चांगल्या कार्यांचे महत्त्व' ह्या प्रकरणात उतारा चौथा (विधिलिखित सुधारले) ह्यामध्ये आपण एका इस्त्रायली जोडप्याची ज्यांच्या नशीबांत मुले नव्हती परंतु ती त्यांना मिळाली, ही कथा आहे तिचा अभ्यास करू. ह्या गोष्टीचे तात्पर्य असे होते की, जर आपली इच्छा असली व त्यासाठी मार्ग शोधला तर आपले विधिलिखित नक्कीच बदलू शकते.

- अंतिम प्रेषीत यांनी असे सांगितले,

  *'प्रार्थनेमुळे मृत्यूसुद्धा पुढे ढकलला जाऊ शकतो,'*(हदीस

- आणि असेही पुढे सांगितले,

*ईश्वर म्हणतो, माझ्याकडून लोकांच्या जशा अपेक्षा असतात त्याप्रमाणे मी त्यांना वागणूक देतो.'*(हदिस

- तुमच्या मनात वरील श्लोक खंबीरपणे रुतून ठेवा आणि लक्षात ठेवा की, ईश्वर कुणालाही कधी गरीब बनवित नाही. जरी तुम्हाला दारिद्र्याचा शाप असला व तुमच्या पूर्वजांच्या व तुमच्या स्वतःच्या पूर्वकर्मामुळे त्रास भोगत असाल तरी परिस्थितीशी तडजोड करू नका. कारण तुमच्या कष्टांमुळे, तुमच्या प्रार्थनेमुळे तसेच तुमची चांगली कृत्ये व संतजनांकडून व पवित्र व्यक्तिंकडून आशीर्वाद ह्यांच्यामुळे तुमचे भाग्य बदलले जाऊ शकते. नेहमी सकारात्मक वृत्ति ठेवा व ईश्वराकडून चांगल्या गोष्टींचीच अपेक्षा करा. जर तुम्ही

असे केलेत तर तुमची परिस्थिति नक्कीच सुधारेल.

- प्रत्येक संकट हे आपल्याबरोबर समान किंवा जास्त यशाच्या संधि आणते. त्या ओळखा व त्यांच्यापासून लाभ उठवा.

- जेव्हा तुम्ही तडजोड करता व तुमच्या नशीबाचा स्वीकार करता, त्यावेळी तुमचा प्रयत्नांतील जोर आणि जिवंतपणा नष्ट होतो. तुमचा संघर्ष हा अर्धवट होतो. तुमची इच्छाशक्ति कमजोर होते व तुमची चिकाटीही कमी होते.

नेहमी मरेपर्यंत झुंज द्या. कधीही प्रयत्न सोडू नका आणि ईश्वराला अशीच धैर्यवान माणसे आवडतात. पवित्र बायबलमध्ये परमेश्वर सांगतो,

*'कणखर व्हा आणि धैर्यशील राहा.'* (पवित्र बायबल, . :

४) **प्रेरणादायक गोष्टींचा अभाव (Absence motivation factor):**

एक आणि एक म्हणजे दोन नाही तर अकरा आहे. जर एकाच बॅटरीने विजेरीचा (टॉर्चचा) प्रकाश दहाफूट जात असेल तर दोन बॅटऱ्यांनी तो २० फूट नाही तर चाळीस फूटांपर्यंत जाईल. समूहाचा पराक्रम, ताकद, क्षमता आणि सुरक्षितता ही व्यक्तिशः जास्त असते. म्हणून यशाचा मार्ग एकट्याने चालत जाऊ नका, तर तुमच्याचप्रमाणे धडपड करणाऱ्या लोकांशी मैत्री करा. ह्यांच्याशी भागीदारी करा असा माझ्या म्हणण्याचा अर्थ नाही. मला असे म्हणावयाचे आहे की यशाचा मार्गावर काफिल्याप्रमाणे चालत राहा.

खूप पूर्वी, लोक समुदाय करून एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी प्रवास करीत असत. त्यामुळे त्यांना सुरक्षितता, संरक्षण, मदत व मार्गदर्शन ह्यांची खात्री वाटत असे. अशा समुदायाला कारवॉ असे उर्दूमध्ये म्हटले जाते. आजच्या आधुनिक जगात पण तुम्ही यशप्राप्तिसाठी लांबचा व खडतर प्रवास करणार असाल तर तांड्याचा (कारवॉ) शोध घ्या. सकारात्मक वृत्ति, चांगली कामे करणारे, चांगले चारित्र्य, उत्साही, पैशाची जाणीव असलेले व दुसऱ्याचा

हेवा न वाटणाऱ्या किंवा स्वार्थी नसणाऱ्या अशा लोकांशी संपर्क साधा व मैत्री करा. जर तुम्ही अशा लोकांच्या सहवासात राहिलात तर तुमचे मन हे सतत शक्ति, स्पंदने आणि उत्साह ह्या गोष्टी मिळवू लागेल. तुमची इच्छा सतत ज्वलंत राहिल, तुम्हाला नवीन उपक्रमाच्या, विधायक आणि संभाव्य कल्पना ह्यांचा लाभ होईल.

अंतिम प्रेषित (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) यांनी असे सांगितले,

*'सल्लामसलतीमध्येच भरभराटीचे मूळतत्व आहे (हदिस)'*

योग्य त्या व्यक्तिंशी तुमच्या कल्पना व योजना ह्यांची सल्लामसलत मार्गदर्शन व चर्चा करा. त्यांच्या सूचना व दृष्टीकोन हे नीट ऐका व त्यानंतर तुमचा स्वतःचा निर्णय घ्या. परंतु लोकांची निवड करताना अतिशय काळजी घ्या नाहीतर तुमच्या अर्धजागृत मनाच्या पातळीवर लबाडीने कब्जा करून ते तुमच्या कल्पना आणि योजना चोरून नेतील व तुमचे मानसिक धैर्य नष्ट करतील. म्हणून सतत प्रेरणादायक राहाण्यासाठी सकारात्मक विचार करणाऱ्या समुहात सामील व्हा. जरी तुम्ही त्यांच्याशी मैत्री केली नाहीत तरी त्यांच्या जवळपास राहाण्याचा प्रयत्न करा. त्यामुळे तुमच्या हृदयाला त्यांच्यापासून भरभराटीची चांगली शक्ति, उष्णता व स्पंदने मिळतील व चिकाटीने राहाण्याची इच्छाशक्ति मिळेल.

- जेव्हा तुम्ही तुमचा व्यवसाय चालू करता, तेव्हा ८० टक्के मिळकत ही मुख्य अशा २० टक्के गिऱ्हाईकांकडून व उरलेली २० टक्के मिळकत ही ८० टक्के लहानलहान गिऱ्हाईकांकडून तुम्हाला मिळत असेल. ही ८० टक्के लहान लहान गिऱ्हाईके तुमची नेहमीच डोकेदुखी ठरेल. तुमचे अंतःकरण व आत्मा खुला व संवेदनशील ठेवा. जर एखादे गिऱ्हाईक तुम्हाला असमाधानकारक व तुम्हाला मानसिकरित्या शांत व सकारात्मक विचाराकडून दूर नेऊन आणि राग. चिंता, तणाव इत्यादि निर्माण करणारे वाटले तर त्याच्याशी विनम्रपणे बोलून स्वतः व्यवहार करण्याचे टाळा. जर तुम्ही गुणवत्ता, सेवा आणि जाहीरात ह्यामध्ये तुमचे उत्तमात उत्तम प्रयत्न कराल

तर ईश्वर तुम्हाला रिकामे बसू देणार नाही. तुम्ही नेहमी कामाच्या भाराखाली व्यस्त राहाल.

ईश्वर सांगतो,

*'सदाचारी व प्रामाणिक लोकांची भरभराट नेहमी ताडाच्या झाडाप्रमाणे वाढत राहील'* (पवित्र बायबल, : )

- तुमच्या अंतःकरणातील जळणारी ज्योत आणि तुमची मनःशांति ह्यांचे रक्षण करण्याची काळजी घ्या. उगाच भरकटत जाऊ नका. राग, काळज्या व फालतू गोष्टी ह्या तुम्हाला चिकाटीपासून दूर नेतील. तुमचा दरवाजा सर्वांसाठी खुला ठेवू नका. जो तुमच्या यशाच्या चिकाटीच्या प्रयत्नांत उपयोगी ठरू शकेल अशाच गिऱ्हाईकांची फक्त निवड करा.

## चिकाटी कशामुळे वाढते?

खालील उल्लेख केलेल्या गोष्टींच्या अनुपस्थितीत चिकाटी ही वाढते. उदा.

- टीका करणाऱ्या लोकांची उपस्थिती व टीकेचे भय.
- नकारात्मक मनोवृत्ति आणि गरिबीची भावना असणाऱ्या लोकांचा सहवास.
- पराभव, गरीबी आणि दुःखे हे जीवनाचा एक भाग म्हणून स्वीकार करणारी मनस्थिति व त्यावर विजय मिळविण्यासाठी धडपड न करणे.
- प्रेरणादायक, स्फूर्तिशाली, उत्साही व पैशाची जाणीव असणाऱ्या लोकांशी संपर्क न येणे.
- चिकाटी वाढविणारे आणखी काही मार्ग खाली दिलेले आहेत.

**१)** ज्वलंत इच्छा हा प्रेरणाशक्तिचा मूलभूत पाया आहे. ज्वलंत इच्छा विकसित होण्यासाठी स्वयंसूचनेचा (Auto-suggestion) अवलंब करा.

**२)** मी माझ्यासाठी यश मिळवून श्रीमंत होऊ शकतो हा दृढ विश्वास आणि परमेश्वर हा माझ्या वैभव मिळविण्याच्या धडपडीसाठी मदत करेल ही गाढ श्रद्धा ह्यामुळे चिकाटी वाढते. तसेच स्वयंसूचनेमुळे (Auto-suggestion) मनात श्रदधा आणि विश्वास निर्माण होतो.

**३)** सतत ईश्वराची मदतीसाठी व भरभराटीच्या कृपेसाठी प्रार्थना करा. ज्यामुळे तुमचा स्वभावच बदलून जाईल व स्वभावामुळे तुम्ही पैशासाठी संवेदनशील, सकारात्मक विचार करणारे आणि वैभव व यश प्राप्त करण्याच्या प्रयत्नांत दीर्घोद्योगी बनता. ईश्वर हा भेट कुपनांच्या स्वरुपात पैसे पाठवीत नाही. पण तो तुमचे व्यक्तिमत्त्व आणि स्वभाव बदलून टाकतो, ज्यामुळे वैभव आणि यश तुम्हाला प्राप्त होते.

**४)** नेहमी प्रेरणा देणाऱ्या साधनांच्या संपर्कात रहा, ज्यामध्ये प्रेरणादायक पुस्तकांचे वाचन, स्वयंसूचना पुन्हा पुन्हा लक्षात घेऊन स्वत:च्या यशावर विश्वास ठेवने, व प्रेरणादायक व्यक्तिंचा सहवास ह्या गोष्टींचा समावेश आहे. स्फुर्तिदायक लोकांचा सहवास हा एक यश व वैभव मिळविण्यासाठी महत्त्वपूर्ण घटक आहे.

पवित्र कुराणामध्ये ईश्वर बऱ्याच ठिकाणी असे सांगतो,

*'हे श्रद्धावंतानो ईश्वराच्या कोपाचे भय बाळगा आणि सत्यवादी लोकांच्या सोबत राहा.'* (पवित्र कुराण ९:११९)

*नमाज कायम करा, जकात अदा करा आणि जे माझ्यापुढे झुकत आहेत त्यांच्यासोबत तुम्हीही झुका.* (पवित्र कुराण २:४३)

*'हे पैगंबर जेव्हा तुम्ही पाहाल की लोक आमच्या संकेतवचनांवर टीका करीत आहेत तर त्यांच्यापासुन दूर व्हा'.* (पवित्र कुराण ६:६८)

अशातऱ्हेचे पुष्कळ श्लोक आहेत. कारण मनुष्यप्राण्यावर सभोवतालच्या वातावरणांचा प्रभाव पडतो. जर एखादा धार्मिक वृत्तिच्या लोकांच्या संगतीत राहिल्यास तो निश्चितपणे त्यात गुंगून जातो व धार्मिक वृत्तिचा बनतो. जर एखादा पैशाची जाणीव व वैभवशाली लोकांच्या सहवासात आला तर त्याच्यामध्ये पैशाची जाण व भरभराटीसाठी आवश्यक ते गुण हे निर्माण होतील. म्हणून तुम्ही कोणाशी बोलता भेटता व दोस्ती करता याबद्दल अगदी काळजीपूर्वक राहा.

असे मानले जाते की, काही जमातींच्या लोकांच्या रक्तामध्येच व्यवसाय भिनलेला असतो. उदा. मारवाडी, गुजराथी व ज्यू (इस्त्राईल) इत्यादि. पण असे नाही. कोणीही हा रक्तांत व्यवसाय भिनून जन्माला आलेला नाही. वस्तुस्थिती अशी आहे कि त्यांचे कौटुंबिक वातावरण, त्यांचा समाज व संस्कृति ह्यांमध्ये संपत्तिची जाणीव असते. म्हणुन अशा व्यक्ति वातावरण व संस्कृति ह्यांच्या संपर्कात आल्यावर आपोआप पैशाची जाणीव व महत्व जाणणारी बनते.

- समय हे जखमेला भरून काढणारे औषध आहे. समय हा एक उत्कृष्ट जखम भरून काढणाराच नव्हे, तर उत्कृष्ट विझविणाराही आहे. तो सर्व उत्साह, प्रचंड महत्त्वाकांक्षा व ज्वलंत इच्छा वगैरे ह्यांना हळुहळु विझवून टाकतो. ही ज्योत नेहमी जळत राहावी म्हणून प्रेरणादायक व उत्साही व्यक्ति हे त्यासाठी एक उत्कृष्ट साधन आहेत. पण ते दुकानात सहजासहजी मिळत नाहीत. साधारणतः असे लोक हे नेहमी कामात गुंतलेले असतात व नवीन धडपड करण्यासाठी त्यांच्याकडे वेळ नसतो. अशावेळी स्वयंसुचना देणारी पुस्तकेच हे एक साधन आहे. म्हणून नेहमी चांगली पुस्तके वाचण्याची सवय लावून घ्या. स्वतःचे एक ग्रंथालय निर्माण करा. दरमहा काही चांगली पुस्तके खरेदी करून शांतपणे वाचा. तुमचे आवडीचे श्लोक व उतारे ह्यांच्यावर खुणा करा व पुस्तके जपून ठेवा.

काही काळानंतर नुसती पाने उघडा व खुणा केलेल्या व ठळक गोष्टी नीट वाचा व तुम्ही ज्या गोष्टी वाचल्या होत्या त्याची

तुम्हाला लगेच आठवण होईल. अशा रीतीने तुम्ही महत्त्वाचे ज्ञान हे दीर्घकाळापर्यंत जतन करू शकाल.

जेव्हा मी माझी कारकीर्द चालू केली त्यावेळी पुस्तके हेच माझे मित्र व शिक्षक होते. मला त्यांच्यापासून इतका फायदा झाला की, त्यांचे महत्त्व वर्णन करण्यास माझ्याकडे शब्दच नाहीत. मला मिळालेले धार्मिक व व्यवसायिक ज्ञान हे, मी फक्त पुस्तके वाचूनच मिळविले.

जी पुस्तके अवश्य वाचलीच पाहिजेच यांची यादी 'विद्वान लोकांकडून काहीतरी शिका' या प्रकरणात दिलेली आहे.

## सहनशीलता (Patience)

सहनशीलता आणि चिकाटी ह्या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. यशप्राप्तीच्या धडपडीमध्ये उतावीळ होऊ नका. कारण यशाच्या मार्गाकडे जाण्यासाठी व उच्च स्थानावर पोहोचण्यासाठी खूप वेळ लागतो. संत कबीरांनी म्हटले आहे,

'धीरे धीरे रे मना। धीरे सबकुछ होए।।

माली सिंचे सौ घडा। ऋतु आये फल होए।।

ह्याचा अर्थ असा आहे की,

जरी माळ्याने कितीही पाणी घातले तरी तो फळांच्या निर्मितीचा हंगाम पुढे करू शकत नाही. नैसर्गिक हंगामातच झाडांना फळे येतात.

त्याचप्रमाणे मानवाच्या प्रगतिला एका नैसर्गिक वाढीची वेळ आहे. त्यांचा प्रयत्न व कष्ट करणे ह्यांच्यानुसार प्रगतीत व्यक्ति व्यक्तिप्रमाणे फरक असु शकतो. पण सर्व मानवप्राणी व आपण हे एका रात्रीमध्ये लक्षाधीश बनत नाही. ह्यासाठी निश्चित काही काळ जावा लागेल.

आपण निसर्गाच्या हळूवार कृपादृष्टीची प्रक्रिया समजून घेतली पाहिजे, तिला आपण सहकार्य केले पाहिजे व सहनशील राहून आपला यशाचा मार्ग सहनशीलपणाने चालू ठेवला पाहिजे

या विश्वाचा ईश्वर असे सांगतो,

*'हे श्रद्धावंतानो, संयम आणि नमाजाचे सहाय्य घ्या. ईश्वर संयमी लोकांच्या सोबत आहे.* (पवित्र कुराण २ :१५३)

**जगाच्या भरभराटीसाठी प्रार्थना**
**(Prayer for universal prosperity):**

माझा व्यवसाय हा अत्यंत नाविण्यपुर्ण आणि तांत्रिकी आहे. काहीवेळा कामाच्या भारामुळे किंवा अन्य समस्यामुळे मी अत्यंत निराश होतो व त्या व्यवसायाच्या मार्गातील आवड नष्ट होते व मी अशातऱ्हेच्या व्यवसाय व जीवनशैली ह्यांच्यापासून दूर जाण्याचे मार्ग शोधू लागलो.

माझा एक मित्र दिलावर अब्बास चौगुले ह्याने मला माझ्या स्वतःच्या रोजच्या प्रार्थनेमध्ये एक प्रार्थना समावीष्ट करण्याचा सल्ला दिला. जी सर्व मानवजातीसाठी आहे. जेव्हा मानव हा दुसऱ्यांच्या भरभराट व कल्याणासाठी ईश्वराकडे प्रार्थना करतो, तेव्हा देवदूत (Angels) प्रार्थना करणाऱ्या व्यक्तीला भरभराट प्राप्त होवो व त्यांचे कल्याण होवो अशी प्रार्थना करतात. (हदिस)

म्हणून झटपट वैभव (वा भरभराट) मिळविण्याचा मार्ग म्हणजे मानवजातीच्या कल्याणासाठी व भरभराटीसाठी प्रार्थना करणे हा आहे. आपण स्वतःच्या भरभराटीसाठी केलेली प्रार्थना एखादेवेळी रद्द होऊ शकते, पण जेव्हा देवदूत प्रार्थना करणाऱ्यांच्या भरभराटीसाठी प्रार्थना करतात तेव्हा ती ईश्वराकडे नक्कीच स्विकारली जाते.

त्या दिवसापासून मी अशी प्रार्थना नियमितपणे म्हणतो व मला व्यक्तिशः असे आढळून आले की, ईश्वराकडे विश्वाची भरभराट मागीतल्यानंतर मला अशक्य आणि कठीण कामे करण्यासाठी शक्ति,

शांती व धैर्य मिळतात, व मी नवचैतन्य आणि उत्साहाने माझ्या रोजच्या दैनंदिन जीवनातील कठिण समस्यांना सामोरा जातो.

पुष्कळवेळा मी जेव्हा माणवतेच्या भरभराटीसाठी ईश्वराकडे प्रार्थना करतो तेव्हा मला चिकाटीने काम करण्याची इच्छाशक्ति मिळते. म्हणून तुम्ही सुद्धा तुमच्या प्रार्थनेत वर दिलेल्या प्रार्थनेचा समावेश करा व चिकाटीने काम करण्याची अलौकिक शक्ति मिळवा असा माझा तुम्हाला सल्ला आहे.

पवित्र बायबलमध्ये ईश्वर सांगतो,

*'मनुष्याने फक्त भाकरीसाठीच जीवंत राहू नये'.* (त्याने समाजाच्या कल्याणासाठीही प्रयत्न केले पाहिजेत) (Matt.४:४)

*'जसे मी तुमच्यावर प्रेम करतो तसे एकमेकांवर प्रेम करा'*
(John.१५:१२)

*'एकमेकाबद्दल कृपा व प्रेमभाव बाळगा* (Rom.१२:१०)

जर शारीरिकरीत्या आपण मानवजातीच्या कल्याणासाठी वा भरभराटीसाठी काही सहभाग देऊ शकलो नाही तर कमीत कमी त्यासाठी शुभेच्छा व प्रार्थना तरी करुया.

## चिकाटीची अत्यंत सुप्रसिद्ध उदाहरणे :

नेपोलियन हिल यांच्या सुप्रसिद्ध Think and grow rich या पुस्तकातील उदाहरण :-

हजरत मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) (ई.सन ५७०-६३२) यांचा जन्म मक्का येथील अतिशय मान्यवर अशा कुरेश कुटुंबात झाला. वयाच्या २५ व्या वर्षी त्यांनी हजरत खतिजा (रजि अल्लाह अनहा) ह्या माननीय विधवेबरोबर भागीदारीत उद्योगधंदा सुरू केला. हजरत मुहम्मद (स) हे व्यवसायासाठी सौदी अरेबिया व सिरिया यादरम्यान प्रवास करीत असत. त्यांचा उद्योगधंदा हा आजच्या जमान्यातील आयात निर्यात ह्यासारख्याच होता. त्यांचा प्रामाणिकपणा, त्यांची हुषारी, त्यांचा धार्मिक स्वभाव व सभ्य रीतीरिवाज ह्यामुळे

हजरत खातिजा (रजि अल्लाह अनहा) ही इतकी प्रभावित झाली की तिने हजरत मुहम्मद (स) यांना मागणी घातली व नंतर दोघांचा विवाह झाला. हजरत मुहम्मद (स) हे वयाच्या ३७ वर्षापर्यंत हे एक यशस्वी व्यावसायिक, प्रेमळ बाप व नवरा म्हणून राहिले. जेव्हा त्यांच्या आयुष्यात सर्व गोष्टी होत्या म्हणजेच संपत्ति, समाजात मान, चांगले कौटुंबिक जीवन इत्यादि. तेव्हा त्यांच्या धार्मिक मनाला असे आढळून आले की, सर्वसाधारण जगाची जीवनशैली ही जंगली वृत्तिची आहे. हा जीवन जगण्याचा योग्य मार्ग नाही. तेथे ज्ञान व मार्गदर्शन ह्यांचे काही साधन नव्हते. म्हणून हजरत मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) पर्वताच्या माथ्यावर जात असत व हिरा नावाने ओळखल्या जाणाऱ्या गुहेत पुष्कळ दिवस शांति व ध्यानसाधना ह्यासाठी मुक्काम करीत होते. वयाच्या ४० व्या वर्षी एक दिवशी महान देवदूत जिब्रील (अलैहि सलाम) हे प्रकट झाले व हजरत मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) यांना ईश्वराचे आदेश व ज्ञान दिले.

ईश्वराचा संदेश सर्व मानवजातीमध्ये पसरविण्याच्या जबाबदारीमुळे हजरत मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) यांनी आपल्या सर्वस्वाचा त्याग केला. सतत १३ वर्षे त्यांनी अविश्रांतपणे अरबांना उपदेश केला. पण समाजातील प्रभावशाली व्यक्तिच्या तीव्र विरोधामुळे फक्त अंदाजे ८० लोकांनीच इस्लाम धर्माचा स्वीकार केला. ह्या काळात त्यांचे अनुयायी मारले गेले, त्यांना यातना दिल्या गेल्या, सर्व त्या शक्य मार्गांनी त्यांचे हाल केले गेले, हजरत मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) यांनी आपल्या अनुयायांना दुसऱ्या जागी स्थलांतर करण्यास परवानगी दिली. ते स्वतः मक्का येथे सर्व दुःख व हालअपेष्टा सहन करीत, पण ते त्यांचे कार्य पूर्ण करण्याच्या निश्चयाने तेथे राहिले.

जेव्हा मक्केतील प्रभावशाली व्यक्तिंनी त्यांना अखेरीस ठार मारण्याची योजना आखली. तेव्हा ते (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) जवळच्या मदिना या शहरात स्थलांतर करून गेले, पण त्यांचा धीर कधीही खचला नाही व मोठ्या कणखर निश्चयाने ते (सल्लल्लाहु

अलैहि व सल्लम) आपले अलौकिक काम करीत राहिले. त्याचा परिणाम असा झाला की, पुढील १० वर्षात संपूर्ण अरेबियाची खात्री पटली व त्यांनी ईश्वराच्या संदेशाचा स्वीकार केला.

आपण मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) यांच्या जीवनात लक्षणीय निश्चय, चिकाटी व सहनशीलता पाहातो. जे व्यावसायिक व उद्योजक हे अजूनही त्यांच्या ध्येय, योजना व आयुष्य यामध्ये यशस्वी झालेले नाहीत, त्यांच्यासाठी यात एक तेजस्वी व प्रेरणादायी धडा आहे.

### *प्रकरण क्र. १९*

# व्यवसायाचे व्यवस्थापन

## (Business Administration)

**परिचय**

- हजारो मैलांचा प्रवास हा एका पाऊलाने चालू होतो. पण जर हे एकच पाऊल चुकीच्या दिशेने गेले तर काय होईल? त्यामुळे २००० मैल प्रवास करूनसुद्धा इच्छित ठिकाणी जाता येणार नाही. तसेच एखादी व्यक्ति ही चुकीच्या व्यवस्थापन धोरणामुळे प्रचंड साम्राज्य किंवा संघटना उभारू शकत नाही. अंतिम ठिकाण नुसते माहित असून चालत नाही तर खूप उशीर होण्यापूर्वी त्या ठिकाणी पोहोचण्याचा योग्य मार्ग माहिती असणे पण महत्त्वाचे आहे.

- व्यक्तिला खूप मर्यादा असतात. एखादी संस्था किंवा मोठी स्थिर व नफा देणारी कंपनी ही एका माणसाच्या खांद्यावर उभी राहात नाही. सांघिक काम हे त्यासाठी आवश्यक आहे. म्हणून एखाद्यास खूप नफा मिळवावयाचा असेल तर त्याला संघटन कसे बनवायचे व त्याचे नेतृत्व कसे करावयाचे ह्या गोष्टी पण ठाऊक असल्या पाहिजेत.

- खूप उच्चशिक्षित, बुद्धिमान व कर्तबगार माणसे व्यवस्थापन कौशल्याच्या त्रुटींमुळे त्यांच्या क्षमतेचा पूर्णपणे वापर करू शकत

नाहीत. ते आयुष्यभर एकट्यानेच धडपड करीत राहातात व त्यांना जेवढी संपत्ति मिळाली पाहीजे, त्याच्यापेक्षा खूप कमी संपत्ति मिळवतात. जर त्यांनी लोकांना नोकरीवर ठेवून तसेच जास्त लोकांच्या साहाय्याने त्यांचा धंदा मोठ्या प्रमाणावर वाढविला असता तर त्यांना खूप यश मिळाले असते.

- व्यवसाय हा एक खूप पैसे मिळविण्याचा चांगला पर्याय आहे. एखादा नोकरीमध्ये चांगली मिळकत कमावतो पण त्यावर नेहमी मर्यादा असते. तथापि व्यवसायामध्ये प्रगतिला हा शेवट नसतो, व ती निवृत्ति किंवा मृत्यू ह्यांच्यानंतर पण थांबत नाही.

- जर उद्योगधंदा पद्धतशीरपणे ज्ञान, काळजी तत्व वापरून व धंदेवाईक वृत्ति आणि धार्मिकवृत्ति अशा रीतीने केला तरच एखाद्यास त्याच्या प्रयत्नांची गोड फळे मिळतात. याऊलट जर एखाद्याने व्यवसायात निष्काळजीपणा केला, तर तो आईवडिलांकडून मिळालेली संपत्ति गमावुन बसतो किंवा तो ताण व चिंतेमुळे तरुणवयातच मरण पावतो.

- व्यावसायिक कारभार आणि व्यवस्थापन हा मोठा विषय आहे. तो नीट समजून घेण्यासाठी ३ वर्षाच्या कोर्सची आवश्यकता आहे. जसे एम.एम.एस. किंवा एम. बी.ए. त्याचे वर्णन हे थोड्या पानात करणे हे अशक्य आहे. तरीसुद्धा आपण त्याच्या काही मूलभूत महत्त्वाच्या गोष्टींची उजळणी करू या. सोप्यारितीने समजण्यासाठी आपण ह्या विषयाचे ३ विभागात विभाजन करू.

- पहिल्या विभागात आपण संघटनेची (वा संस्थेची) सर्वसाधारण तत्वे यावर चर्चा करू.

- दुसऱ्या विभागात आपण व्यवस्थापन कौशल्ये जी उद्योजक वा व्यवस्थापकाने त्याच्या हाताखालच्या लोकांशी व्यवहार करताना वापरली पाहिजेत, ह्याची चर्चा करणार आहोत.

- तिसऱ्या विभागात व्यक्तिने चांगला नेता किंवा लायक प्रशासक बनण्यासाठी कुठल्या गुणांचा विकास केला पाहिजे ह्यांवर चर्चा करणार आहोत.

*प्रकरण क्र. २०*

# संघटनेची तत्वे

## (Principle of Organisation)

- 'स्वयंसूचना' या प्रकरणात आपण अशी चर्चा केली आहे की, यशप्राप्ति किंवा खूप संपत्ति मिळविण्यासाठी एखादे स्पष्ट उद्दिष्ट हे आवश्यक आहे. जे व्यक्तिगत पातळीवर खरे आहे ते संघटना पातळीवरपण लागू आहे. संघटनेला (वा संस्थेला) जे काय ध्येय गाठावयाचे असते ते स्पष्टपणे व ठराविक रीतीनेच स्पष्ट केले असले पाहिजे व संघटनेच्या प्रत्येक व्यक्तिला त्याची माहिती पाहिजे. त्यामुळेच जास्त वेळ व पैसा वाया न घालविता ते ध्येय गाठु शकतात.

- स्पष्ट उद्दिष्टाचे हे महत्त्व आहे पण प्रत्येकाने कुठले ध्येय समोर ठेवावे हा एक कठिण प्रश्न आहे. या प्रश्नाला ठराविक उत्तर देण्यापेक्षा काही मोठ्या संघटनांनी काय उद्दिष्ट व तत्व निवडले आहे. ज्यामुळे ते त्यांच्या क्षेत्रात अग्रगण्य प्रमुख कसे झाले, ह्या गोष्टीचा अभ्यास करू या. ह्यासाठी आपण आय.बी.एम.(I.B.M) ह्या प्रचंड कॉम्प्युटर व कॉम्प्युटर सॉफ्टवेअर (Software) बनविणाऱ्या कंपनीचे उदाहरण अभ्यासासाठी समोर घेऊ.

### I.B.M.ची कार्यपद्धती (The I.B.M Way)

- सर थॉमस जे वॉटसन यांनी १९१४ मध्ये आयबीएमची स्थापना

केली. सुरूवातीला ते फक्त बुचर स्केल्स व टाईम क्लॉक्स बनवित होते व ती 'कॉम्प्युटिंग टॅब्यूलेटिंग ॲन्ड रेकॉर्डिंग कंपनी' ह्या नावाने प्रसिद्ध होती. त्यावेळी त्यांच्याकडे जेमतेम १०० कर्मचारी होते. आज ती कॉम्प्युटर बनविणारी एक अग्रणी कंपनी असून तिच्यामध्ये ४ लाखाहुन जास्त कर्मचारी काम करीत आहेत व तिची उलाढाल (Turnover) ही ५० बिलियन डॉलर्सपेक्षा जास्त असून जगाच्या प्रत्येक देशात आयबीएमचे ऑफिस आहे.

आयबीएमच्या या महान यशाचे रहस्य त्यांच्या खालील तीन तत्वांमध्ये दडलेले आहे.

- कंपनीमधल्या प्रत्येक माणसाला मान दिला गेला पाहिजे.
  Every individual of the company must be respected.
- प्रत्येक ग्राहकाला उत्कृष्ट सेवा दिली गेली पाहिजे.
  Every customer must be given the best possible service.
- श्रेष्ठता आणि उत्तम कार्य यामुळे काम तडीस नेण्याचे उद्दिष्ट चालू ठेवले पाहिजे.
  Excellence and superior performance must be pursued.

## पहिले तत्व

कर्मचारी हे संघटनेची मौल्यवान संपत्ति असतात. वरिष्ठांकडून कर्मचाऱ्यांचा होणारा अपमान याची पैशाने नुकसानभरपाई करता येत नाही. म्हणून चांगले कर्मचारी निर्माण करणे व त्यांना धरून ठेवणे ह्यासाठी कंपनीचे धोरण हे मानवतावादी व सन्मान देणारे असले पाहिजे.

आयबीएम ही महाविद्यालयातून व विद्यापीठातून चांगल्या विद्यार्थ्यांची निवड करते, तसेच त्यांची व्यवसायांबद्दलची तत्वे फक्त वर्गामध्येच शिकविली जात नाहीत, तर त्यांच्या कारखान्याच्या प्रत्येक व्यक्तिकडून त्यांचे व्यवहारात आचरण केले जाते. त्यांच्याकडे वरिष्ठ अधिकाऱ्यांसाठी खास जेवणाची टेबले, टॉयलेटस् व गाडी वाहानतळ

नाहीत. प्रत्येक माणूस हा एकसारखा व मानाने वागविला जातो.

## दुसरे तत्व

उत्तम सेवा धोरण हे आयबीएमच्या यशाचे मुख्य रहस्य आहे. ह्या धोरणामुळे आयबीएमला प्रचंड यश मिळाले आहे. रोजच्या दैनंदिन व्यवहारात तांत्रिक दृष्टीने निकृष्ट दर्जाची उत्पादन बनविणाऱ्या पुष्कळ कंपन्या त्यांच्यापेक्षा उत्कृष्ट दर्जाच्या वस्तू बनविणाऱ्या प्रतिस्पर्ध्यापेक्षा जास्त धंदा करतात ह्यामागे त्यांची उत्कृष्ट सेवा हे एक कारण आहे.

सन २००४ साली भारतामध्ये १२ मोटारगाड्या बनविणाऱ्या कंपन्या होत्या. त्यांच्यातील बहुतेक कंपन्याचे सुप्रसिद्ध ब्रँड असलेल्या विदेशी कंपन्यांशी सहकार्य आहे. परंतु ११ कंपन्यांची विक्री ही एकत्रित केली, तरी ते प्रमाण १२व्या कंपनीच्या एकट्याचाच विक्रीपेक्षा ४० टक्के सुद्धा नाही. ती १२वी कंपनी म्हणजे मारुतीउद्योग. कारण मारुती उद्योग समूहाचे सर्विस सेंटर देशातील कानाकोपऱ्यात पसरले आहेत.

हल्ली मोबाईल फोन हे सर्वसामान्य गरजेची वस्तू झालेली आहे. एवढेच काय तर हातगाडीवाले व रिक्षाचालक ह्यांच्याकडेही मोबाईल आहेत. परंतु बहुतेक लोक नोकियाचे हॅन्डसेट वापरतात. कारण पॅनासॉनिक, सिमेन्स, सॅमसंग, सोनी एरिस्कॉन इत्यादी कंपन्यापेक्षा नोकियाच्या वस्तूंचे सुटे भाग देखील रस्त्याच्या प्रत्येक कडेला सहज उपलब्ध आहेत.

म्हणून उत्कृष्ट सेवा धोरण हे कोणत्याही व्यवसायाच्या यशाचे मुख्य रहस्य आहे.

## तिसरे तत्व

फक्त धडधाकटच जगू शकतात (Only the fittest Survive). हा नियम फक्त जंगलातील प्राण्यानाच लागु नाही तर सिमेंट क्राँक्रिटच्या जंगलालाही (शहराला) लागू आहे. जसा काळ जातो

तेव्हा फक्त त्याच कंपन्या टिकून राहातात व प्रगति करतात ज्या कंपन्या फक्त श्रेष्ठत्वासाठी धडपड करतात. त्यासाठी श्रेष्ठ दर्जा, उत्कृष्ट सेवा, कमी खर्चात व तांत्रिकदृष्ट्या श्रेष्ठ उत्पादन, विक्रीच्या वाढीसाठी उत्कृष्ट तंत्रे, इत्यादि आवश्यक आहे. ह्या श्रेष्ठपणाची सुरुवात ही कर्मचाऱ्यांची भरती, त्यांना प्रशिक्षण देणे व कंपनीचे वातावरण व संस्कृति अशा तऱ्हेने तयार करणे की त्यामुळे प्रत्येकाला समजून येते की, नोकरी ही त्यांच्या मालकीची नाही. आणि कंपनीमध्ये दिले जाणारे अधिकारी पद व मिळणारे वेतन यात होणारी प्रगती ही वरिष्ठपणावर अवलंबुन नसते तर ते कठीण परीक्षमाचे फळ असते. तसेच सर्वसाधारण नियमानुसार तुमच्यामध्ये नेहमी उत्कृष्ट राहण्याचा ध्यास असल्याशिवाय तुम्हाला व्यवसायात उल्लेखनीय यश मिळणार नाही.

**I.B.M** आणि अन्य शेकडो कंपन्यांनी प्रत्येक व्यक्तिचा सन्मान, श्रेष्ठत्व, ग्राहकांना उत्कृष्ट सेवा व ती पार पाडण्याचे उद्दिष्ट ह्या तीन तत्वांचा वापर केला आणि ते यशस्वी झाले. या तीन तत्वांचे तुम्ही अनुकरण केले तर तुम्हीसुद्धा प्रचंड यश मिळवु शकता.

For more knowledge read, **The I.B.M Way** by Buck Rodgers, published by USB publishers.

*प्रकरण क्र. २१*

# नेतृत्वाची पद्धत आणि प्रशासनाची तंत्रे

(Leadership style and administrative techniques)

## परिचय

- जे तरुण उद्योजक हे आपला व्यवसाय प्राथमिक अवस्थेतून करीत आहेत त्यांच्यासाठी हे पुस्तक लिहिलेले आहे. म्हणून दिलेल्या सल्ल्यांचा संबंध त्यांच्याशी निगडित आहे.

- ज्यांना व्यावसायिक प्रशासनाचे ज्ञान नाही ते मानवी संबंध प्रस्थापित करतांना व त्यांच्या कर्मचाऱ्यांशी व्यवहार करताना स्वतःच्या मूलभूत विचारांचा वापर करतात. काही वेळा ते सौम्यपणे वा काहीवेळा कडक वागतात. काहीवेळा ते त्यांच्या कर्मचाऱ्यांना प्रेरणा देतात व काहीवेळा त्यांची खरडपट्टी करतात. राजकारणी व्यक्तिप्रमाणे परिस्थिती असेल त्याप्रमाणे ते उद्योजक त्यांची वागणूक बदलत असतात.

**साधारणतः नवीन उद्योजक हे पुढील चुका करतात -**

- त्यांना प्रत्येकावर स्वतःचे पूर्ण नियंत्रण हवे असते.

- काही कामगारांवर ते अगदी बारकाईने देखरेख ठेवतात. तर काही कामगारांवर इतका विश्वास ठेवतात कि त्यांच्या कामाची दखलच घेत नाहीत.

- जे लक्ष्य वा ध्येय गाठावयाचे असते ते एकतर स्वतःशीच

ठेवतात किंवा, फक्त अगदी जवळच्या कर्मचाऱ्यांना त्याबद्दल माहिती असते.

- त्यांचे कामगारांच्या बाबतीत निर्णय हे एकतर्फी असतात. म्हणजेच जर त्यांना एखाद्याला आज्ञा करावयाची असेल तर ती ते देतात. जर त्यांना प्रतिनिधित्व करावयाचे असेल तर ते करतात. दुसरी व्यक्ति ही फक्त श्रोत्याची भूमिका निभावत असते व तिला साहेब आपल्याशी असे का वागत आहे हे कळत नाही.

- ते एखाद्याची कोणासमोरही खरडपट्टी करतात.

- जर एखाद्याने कार्यक्षमतेने काम केले तर ते त्याची स्तुति करीत नाहीत. आणि जरी केली तरी फार थोड्या प्रमाणात व गुपचुप करतात.

- निर्णय घेणे, लक्ष्य निश्चित करणे, चांगल्या गोष्टींचा आढावा घेणे, त्या चांगल्या गोष्टींसाठी रुपरेषा तयारी इत्यादी गोष्टीमध्ये कामगार व कर्मचारी ह्यांचा सहभाग नसतो. ह्या सर्व गोष्टी प्रमुख हा एकटाच करतो.

- पैशाच्या बाबतीत देतांना तो त्याचे कामगार व स्टाफ ह्यांच्यासाठी हात आखडून घेतो आणि स्वतःवर आणि स्वतःच्या कुटुंबियांवर मात्र वाटेल तसा पैसा उधळतो.

- तो नेहमी त्याच्या कामगारांना स्वत:पेक्षा हलक्या दर्जाचे समजतो.

वरील सर्व चुका व त्रुटी ह्यामुळे उद्योजकाला चांगला मॅनेजर व स्टाफ मिळणे ही एक नेहमीची समस्या असते. त्यामुळे त्याला स्वतःलाच बऱ्याचवेळी हलक्या दर्जाची कामे करावी लागतात व त्यामुळे चांगले उत्पादक कार्य करण्यास त्याला पुरेसा वेळ मिळत नाही.

- उद्योगधंद्यातील माझा २२ वर्षाचा अनुभव आणि पुस्तकांमधून मिळविलेले ज्ञान यातुन मला असे आढळून आले की, डॉ.केन्नेथ

ब्लँचर्डने (Dr. Kenneth Blanchard)सल्ला दिलेली प्रशासन तंत्रे ही जास्त परिणामकारक आहेत. त्यांच्या तंत्रांची संक्षिप्त माहिती व माझे विचार हे पुढीलप्रमाणे आहेत.

**प्रशासनाचे तंत्र (The Technique)**

- तुमच्या हाताखालच्या लोकांकडून सर्वोत्कृष्ट कामगिरी पार पाडण्याच्या दृष्टीने त्यांच्यावर तुम्ही नियंत्रण ठेवण्यासाठी कसे वागता ही एक नेतृत्वाची पद्धत आहे.

- नेतृत्व पद्धतीने वागण्याच्या दोन तऱ्हा आहेत. सत्ताधारी व लोकशाही. सत्ताधारी किंवा हुकुमशाही तऱ्हेमध्ये नेता हा लोकांनी काय करावे, कसे करावे, कुठे करावे, कधी करावे असे सांगतो व अगदी बारकाईने त्या पार पडत आहेत की नाही ह्यावर देखरेख ठेवतो. लोकशाही किंवा आधारभूत पद्धतिमध्ये नेता हा लोकांचे म्हणणे ऐकतो त्यांना मदत मार्गदर्शन, आधार देतो व त्यांच्या प्रयत्नांना चालना देतो व त्यांचे प्रश्न सोडविण्यास व निर्णय घेण्यास मदत करतो.

- डॉ. केन्नेथ ब्लँचर्ड यांनी (Dr. Kenneth Blanchard) चार तऱ्हेच्या नेतृत्वाच्या समर्थन केले आहे. ज्यामध्ये हुकुमशाही वृत्ति आणि लोकशाही वृत्ति ह्यांचे एकत्रीकरण आहे.

**चार तऱ्हेच्या नेतृत्वाच्या पद्धति पुढीलप्रमाणे आहेत.**

१) हुकूम करणारी पद्धत (Directing)

२) शिक्षण देणारी पद्धत (Coaching)

३) मदत देणारी पद्धत (Supporting)

४) अधिकार देणारी पद्धत (Delegating)

हुकूम करणारी नेतृत्व पद्धत ही हुकुमशाही नेतृत्व पद्धति सारखीच आहे.

शिक्षण नेतृत्व पद्धतिमध्ये नेता हा सहकाऱ्यांना काही ठराविक

मर्यादेपर्यंत हुकूम करतो पण तो स्वतःच्या निर्णयाचे तर्कशास्त्राने स्पष्टीकरण करतो. सहकाऱ्यांच्या सूचना विचारात घेतो व ते काम पूर्ण करण्यासाठी मदत करतो.

मदत देणारी पद्धत किंवा साहाय्यकारी नेतृत्व पद्धतित नेता हा हाताखालच्या लोकांचे काम पूर्ण करण्याच्या प्रयत्नांत साहाय्य करतो. तो त्यांना निर्णय घेण्याच्या प्रक्रियेत सामावून घेतो व त्यांच्याबरोबरीने जबाबदारीत सहभाग घेतो. थोडक्यात तो त्यांना स्वतंत्रपणे काम करण्यासाठी प्रशिक्षित करतो. नेता हा कमीतकमी सूचना देऊन शक्य असेल तेवढा आधार व मार्गदर्शन देतो.

शेवटच्या नेतृत्व पद्धतिला अधिकार (जबाबदारी) देणे असे नाव आहे. ह्या पद्धतिमध्ये नेता हा निर्णय घेण्याची व प्रश्नाचे निराकरण करण्याची जबाबदारी त्याच्या सहकाऱ्यांवर टाकून देऊन मोकळा होतो.

## कुठली नेतृत्वपदाची पद्धत ही केव्हा निवडावी?

कुठलीही एकच नेतृत्वपदाची पद्धत ही सर्व प्रसंगांना व सर्व लोकांसाठी योग्य नाही. व्यवस्थापकाने हाताखालच्या सहकाऱ्यांचे निदान व पृथक्करण करून कुठल्या व्यक्तिसाठी कुठली नेतृत्वपद्धतीची निवड करावयाची ह्याचा निर्णय घ्यावयाचा असतो. म्हणजे तोच व्यवस्थापक हा निरनिराळ्या व्यक्तिंसाठी, निरनिराळ्या प्रकारच्या नेतृत्वाच्या तऱ्हा त्यांच्या विकासाच्या पातळीप्रमाणे निवडू शकतो.

## सहकाऱ्याच्या विकासाची पातळी म्हणजे काय?

कारखान्यात आपण ठराविक व्यक्तिला ठराविक काम हे त्याची योग्यता (Competence) आणि निष्ठा (Commitment) हे दोन गुणविशेष पाहून देतो.

माणसाची योग्यता म्हणजे ते काम समाधानकारक करण्याची त्याची पुर्ण क्षमता होय. योग्यता ही ज्ञान, अनुभव, शिक्षण, प्रशिक्षण इत्यादीमुळे प्राप्त होते. निष्ठा म्हणजे एखादी व्यक्ति किती गंभीरपणाने

व प्रामाणिकपणे जबाबदारी पेलू शकते ही आहे. निष्ठा ही दोन गोष्टींवर अवलंबून असते, आत्मविश्वास आणि कार्यप्रवृत्ति.

ज्या व्यक्तिला एखादे काम समाधानकारकपणे पूर्ण करण्याचा आत्मविश्वास नाही, तो ते करावयाची टाळाटाळ करील ती व्यक्ति जबाबदारीतून पळ काढण्यासाठी कारणे देईल. कार्यप्रवृत्त (Motivate) न झालेली व्यक्ति ही फक्त वेळ घालवील व जेवढे आवश्यक ऐवढेच कमीतकमी काम करेल. त्यामुळे त्याला शब्दांचा भडिमार ऐकावा लागणार नाही. म्हणून माणसाची पारख आपण त्याची योग्यता आणि निष्ठा ह्यावरून करतो.

## कोणत्या योग्यता आणि निष्ठेच्या पातळीसाठी कोणती नेतृत्वपद्धत निवडावी ?

आपण कर्मचाऱ्यांचे चार वर्गात त्यांची योग्यता व निष्ठा यानुसार वर्गीकरण  करू या.

**१)** दर्जा एक - कमी योग्यता, उच्च निष्ठा

**२)** दर्जा दोन - थोडी योग्यता, थोडी निष्ठा

**३)** दर्जा तीन - उच्च योग्यता, अनिश्चीत निष्ठा

**४)** दर्जा चार - उच्च योग्यता, उच्च निष्ठा

कमी योग्यता आणि कमी निष्ठा ह्याबद्दल काय?

अशा तऱ्हेच्या माणसांना सरकारी संघटना सोडल्यास लोक नोकरी देत नाहीत. आपल्या धडपडीच्या सुरूवातीच्या काळात उद्योजकाने आपल्या खांद्यावर हा मृतवत भार का म्हणून घ्यावा?

- दर्जा एकचे लोक खूप उत्साहाने सुरूवात करणारे असतात. थोड्या अनुभवावर व कौशल्यावर कंपनीमध्ये नवीनच भरती झालेले लोक ह्यांना कंपनीच्या गरजा (Priorities) धोरणे आणि व धंदा करण्याचे मार्ग ह्यांची माहिती नसते. म्हणून सुरूवातीला हुकुमशाही पद्धतीची (Directing) नेतृत्वाची तऱ्हा ही त्यांच्यासाठी वापरली जाते.

- दर्जा दोनचे लोक हे अशा व्यक्ति होत जे थोडे काम केल्यावर व थोडे कौशल्य प्राप्त झाल्यावर भ्रमनिरास किंवा मानसिकरीत्या खचून जातात. अशी माणसे त्यांच्या कामाला उत्साहाने सुरुवात करतात. पण काही काळाने त्यांना समजून चुकते की, हे काम आत्मसात करणे कठिण आहे किंवा हे कळल्यानंतर कि त्या कठिण कामाचा मिळणारा परतावा (वा मोबदला) हा अपुरा आहे किंवा योग्य नाही. तेव्हा ते नाऊमेद होऊन जातात.

अशा तऱ्हेच्या लोकांसाठी शिक्षण देण्याची पद्धति ही उत्तम आहे. जी बऱ्याच प्रमाणात हुकुमशाही व अल्प प्रमाणात आधार (वा मदत) देणाऱ्या नेतृत्व पद्धतीच्या जवळपास आहे.

- तिसऱ्या दर्जाचे लोक म्हणजे जे पुरेसे कौशल्य, योग्यता आणि निष्ठा मिळवितात पण एकट्याने धोका पत्करणे वा निर्णय घेणे ह्याला घाबरतात. त्यांना वरिष्ठांकडून थोडासा आत्मविश्वास हवा असतो की, योग्य मार्गाने जात आहेत व त्यांनी पुढे जाण्यास काहीच हरकत नाही. अशा तऱ्हेच्या लोकांसाठी आधारभूत तऱ्हेची नेतृत्वपद्धती ही योग्य आहे.

- चौथ्या दर्जाचे लोक हे उच्च पातळीवर कार्य पार पाडणारे असतात. जे लोक योग्यता आणि निष्ठा असणारे असतात. अशा तऱ्हेच्या माणसांना जबाबदारी देणारी (Delegating) करणारी नेतृत्वाची तऱ्हा ही अत्यंत योग्य आहे.

- खालील दोन उदाहरणे दिल्यावर मला खात्री आहे की, मी तुम्हाला चार तऱ्हेच्या नेतृत्वाच्या पद्धतीचे आणि चार तऱ्हेच्या विकासाच्या पातळीचे चांगले स्पष्टीकरण देऊ शकेन.

## पहिले उदाहरण

**१)** जेव्हा एखादा उत्साही उमेदवार हा घोड्यावर बसणे शिकण्यास सुरुवात करतो. तेव्हा प्रशिक्षक (ट्रेनर) हा प्रत्येक हालचालीबद्दल त्याला हुकूम देतो. म्हणजे खोगीर कसे पकडणे, कशी उडी मारणे

त्याने काय करावे व काय करू नये. ह्यालाच हुकुमशाही (किंवा अधिकारशाही) पद्धतिची नेतृत्वाची (Directing) तऱ्हा असे म्हणतात. तेव्हा उमेदवार हा त्याच्या पहिल्या दर्जाच्या विकासाच्या पातळीवर असतो.

२) उमेदवार हा घोड्यावर बसण्याचे व घोडा धरण्याचे प्राथमिक कौशल्य शिकतो. त्याला समजून चुकले की, ही सोपी गोष्ट नाही. त्याचा उत्साह कमी होतो. त्याची भ्रामक कल्पना संपते. तेव्हा प्रशिक्षक (ट्रेनर) उमेदवाराला जास्त कौशल्य मिळविण्यासाठी शिक्षण देतो उदा. धावणे आणि उडी मारणे इत्यादि. तो उमेदवाराचा उत्साह आणि आत्मविश्वास उत्तेजित करतो. तो दुसऱ्या पायरीमध्ये फक्त मार्गदर्शनच करीत नाही तर उमेदवाराची स्तुतिही करतो, त्याच्या समस्या व विचार ऐकून घेतो आणि त्याला तंत्र स्पष्ट करून सांगतो. ह्या तऱ्हेमध्ये जास्त सूचना देणे आणि थोडेफार प्रमाणात आधारभूत (वा मदत) पद्धतिचा समावेश आहे व ह्यालाच शिक्षण देणारी (Coaching) नेतृत्व तऱ्हा असे म्हणतात व उमेदवार हा विकासाच्या दुसऱ्या पातळीवर असतो.

३) जेव्हा उमेदवार हा पुरेसे कौशल्य आत्मसात करतो, तेव्हा प्रशिक्षक हा आधारभूत नेतृत्वपद्धति तऱ्हेचा अवलंब करतो. उदा. जॅकपॉट शर्यत जिंकणे वा पोलोगेम ह्यासाठी उमेदवार व ट्रेनर आपापसात एक व्यूहरचना (Strategy) निश्चित करतात. ज्यामुळे उमेदवार हा त्याची योजना अंमलात आणील व प्रशिक्षक त्याला निर्णय घेण्यासाठी मदत करतो.

ह्या पद्धतिमध्ये ट्रेनर हा कमी हुकूम देणारा आहे व जास्त मदत करणारा आहे. तो उमेदवाराला निर्णय घेण्याच्यामध्ये गुंतवून घेतो. ह्या नेतृत्वपद्धतिला आधारभुत पद्धत (Supporting) तऱ्हा असे म्हणतात व उमेदवार हा त्याच्या विकासाच्या तिसऱ्या पातळीवर पोहोचतो.

४) जेव्हा उमेदवार हा पारंगत होतो त्यावेळी ट्रेनर हा त्याच्यावर

जबाबदारी सुपूर्त करतो. तो कदाचित असे सांगेल,'त्या जॅकपॉट ट्रॉफीकडे पाहा. मला ती माझ्या टेबलावर असावयाला पाहिजे. जा आणि मिळवून घेऊन ये.' ह्या नेतृत्वपद्धतिला जबाबदारी देणारी (अधिकार) (Delegating) पद्धत असे म्हणतात व उमेदवार हा त्याच्या विकासाच्या चौथ्या पातळीवर असतो.

## दुसरे उदाहरण

१) जेव्हा नवीन उत्साही उमेदवार क्रिकेट शिकण्यासाठी येतो तेव्हा प्रशिक्षक त्याला प्रत्येक गोष्टीत मार्गदर्शन करीत असतो. उदा. बॅट कशी पकडावी? बॉल कसा धरावा? विकेटच्या (स्टंम्पस्च्या) समोर क्रीझमध्ये कसे उभे रहावे? इत्यादि.

ह्या ठिकाणी प्रशिक्षक हा अधिकार पद्धतीच्या नेतृत्वाचा वापर करतो. तो सांगतो कसे करावे, काय करावे इत्यादि आणि उमेदवार हा विकासाच्या पहिल्या (Directing) पातळीवर असतो.

२) जेव्हा उमेदवार हा क्रिकेटची मूलभूत कौशल्ये शिकतो व त्याला कळते की, क्रिकेट ही एक कला व कठीण तंत्र आहे. तेव्हा त्याचा भ्रम दूर होतो. त्याचे नीतिधैर्य व उत्साह मावळतो. त्यावेळी ट्रेनर हा त्याला त्याचे नीतिधैर्य आणि आत्मविश्वास वाढविण्याचे शिक्षण देतो व उमेदवाराला क्रिकेटमधील सुरेख तंत्र शिकवितो उदा. जलदगतीने चेंडूफेक कशी करावी? तसेच स्पिन वा गुगली बॉलिंग कशी टाकावी? निरनिराळे फटके कसे मारावेत? धावा कशा काढाव्यात आणि अत्यंत महत्त्वाचे म्हणजे दुखापतींपासून स्वतःचा बचाव कसा करावा? इत्यादि. प्रशिक्षक हा विद्यार्थ्याच्या चांगल्या हालचालीचे कौतुक करून काही सूचना देतो,

त्याचे म्हणणे ऐकून घेतो तसेच बॅटिंग व बोलिंग करताना येणाऱ्या अडचणी ह्यांची चर्चा व स्पष्टीकरण करतो व उमेदवाराचे नीतिधैर्य व उत्साह वाढविण्याचा प्रयत्न करतो. यालाच शैक्षणिक प्रकारची नेतृत्वपद्धति म्हणतात. प्रशिक्षक हा जास्त अधिकारशाही व कमी आधारभूत नेतृत्वपद्धतिचा वापर करतो व उमेदवार हा

विकासाच्या दुसऱ्या (Coaching) पातळीवर असतो.

३) जेव्हा खेळाडू हा महाविद्यालय, विद्यापीठ, राष्ट्रीय किंवा आंतरराष्ट्रीय स्तरावर खेळण्यास योग्य ठरतो, तेव्हा प्रशिक्षक व विद्यार्थी आपापसात चर्चा करून पुढील योजना ठरवितात. ते प्रतिस्पर्धी संघाच्या योग्यतेचे पृथक्करण करतात. उदा. त्यांची बलस्थाने, त्यांच्या उणीवा, मैदानाची स्थिती, आपण प्रथम बॅटिंग करावी का क्षेत्ररक्षण इत्यादि. प्रशिक्षक हा खेळाडूला निर्णय घेण्यासंबंधी मदत करतो.

अशावेळी प्रशिक्षक कमी हुकुमशाही व जास्त मदत निर्णय घेताना करतो. ही आधारभूत तऱ्हेची (Supporting) नेतृत्वपद्धत वापरतो व खेळाडू हा त्याच्या विकासाच्या तिसऱ्या पातळीवर येऊन पोहोचतो.

४) जेव्हा खेळाडू हा सुनील गावस्कर प्रमाणे खेळू लागतो त्यावेळी प्रशिक्षक हा स्वतःचे पाय टेबलावर पसरवितो व सांगतो,'तो विश्वचषक मला माझ्या टेबलावर आलेला असला पाहिजे. जा आणि घेऊन ये.' तेव्हा यासाठी काय करावयाचे? ह्याचा निर्णय तू ठरव.' ह्या ठिकाणी प्रशिक्षक हा जबाबदारी देणारी (Delegating) नेतृत्वपद्धत वापरतो व खेळाडू हा त्याच्या विकासाच्या चौथ्या पातळीवर येऊन पोहोचतो.

## आपण नेतृत्वपद्धतिचा वापर कसा करावा?

• समजा, तुम्ही अत्यंत योग्य व उच्च निष्ठा असलेला माणूस तुमच्या कंपनीत भक्कम पगारावर नोकरीला ठेवला आहे. आपल्या उत्साही सुरूवात करणाऱ्या सिद्धांताप्रमाणे हुकुमशाही तऱ्हेच्या नेतृत्वपद्धतिचा वापर करावयास हवा. म्हणून तुम्ही त्याच्यावर जवळून अधिकार गाजविण्यास व लक्ष ठेवण्यास सुरुवात करता. यावर तो कर्मचारी उमेदवार काय विचार करील?

तो असा विचार करेल,'हा फालतू इसम माझ्यासारख्या हुषार आणि अनुभवी माणसाला लहान मुलाप्रमाणे वागवतो आहे. किती निराशाजनक बाब आहे ही !

तथापि अशा अत्यंत योग्य व उच्च निष्ठा असलेल्या व्यक्तिला जर तुम्ही जबाबदारी सोपवलीत व तुमच्या चौथ्या सिद्धांताप्रमाणे सोडून दिलेत तर त्याची काय प्रतिक्रिया होईल?

तो असा विचार करील,'हा नालायक माणूस मला टाळत आहे. त्याने मला इतक्या मोठ्या वेतनावर नोकरी दिली व तो माझ्या कामाची फिकीरहि करीत नाही. तो माझ्याकडे दुर्लक्ष करीत आहे.'

- म्हणून तुम्ही कोणत्याहि तऱ्हेच्या नेतृत्वपद्धतिचा वापर केलात तरी त्याचा उलटा परिणाम होतो. मग अशावेळी काय केले पाहीजे?

- तुम्ही तुमच्या हाताखालच्या सहकाऱ्यांशी संवाद साधून अशातऱ्हेच्या नेतृत्वपद्धतिचा करार केला पाहिजे की, ज्याचा तुम्ही उपयोग करणार आहात. त्याला परिस्थितीची माहिती असली पाहिजे.

- कर्मचाऱ्याला असे समजले पाहिजे की, तो कंपनीशी अपरिचित असल्यामुळे त्याला हुकुमशाही नेतृत्वपद्धतीने वागविण्यात येत आहे व जेव्हा त्याला ज्ञान मिळेल तेव्हा त्याच्यावर जबाबदारी टाकली जाईल.

म्हणून व्यवस्थापकाने मानसिकरित्या कोणतीहि नेतृत्व पद्धति वापरण्याबद्दल लवचिक असले पाहिजे. त्याने कर्मचाऱ्याच्या विकासाच्या पातळीचे निदान केले पाहिजे व त्यानुसार नेतृत्वपद्धतिची निवड केली पाहिजे. तसेच त्याने कर्मचाऱ्याबरोबर चर्चा सुसंवाद साधून तोंडी किंवा मानसिकरित्या अशा सहमतिवर आले पाहिजे की, त्याच्यासाठी कुठल्या तऱ्हेच्या नेतृत्वपद्धतिचा उपयोग केला जात आहे व का? दोघांनाही त्याची पूर्वकल्पना असली पाहिजे.

### एकाच व्यक्तिसाठी, निरनिराळ्या परिस्थितीत निरनिराळी नेतृत्वपद्धति

- पुन्हा एकदा क्रिकेटपटूचे उदाहरण विचारात घेऊ या. जर प्रशिक्षकाने सुनील गावस्करला चौथ्या विकासाच्या पातळीपर्यंत प्रशिक्षण दिले व प्रतिनिधित्व नेतृत्वपद्धतिचा वापर त्याच्याबरोबर करून त्याला

सामना जिंकण्यासाठी प्रवृत्त केले व म्हटले,'त्या ट्रॉफीकडे बघ. ती मला माझ्या टेबलावर पाहिजे जा आणि ती घेऊन ये.'

समजा, तोच खेळाडू (गावस्कर) ह्याला त्याच प्रशिक्षकाकडून मुष्टीयुद्ध (बॉक्सिंग) शिकावयाचे ठरवित असतो. त्यावेळी प्रशिक्षक हा सुरुवातीपासूनच त्या खेळाडूला मुष्टियुद्ध (बॉक्सिंग) सामना जिंकण्यासाठी त्याच नेतृत्वपद्धतिचा अवलंब करील काय?

तो (प्रशिक्षक) पुन्हा त्याचे पाय टेबलावर पसरून गावस्करला असे सांगेल,'त्या माईक टायसनकडे पाहा. मला त्याचा खालचा जबडा माझ्या टेबलावर दिसला पाहिजे जा व घेऊन ये.'

जर त्याने असे सांगितले तर मला खात्री आहे की, गावस्कर हा त्याचे दोन्ही जबडे टायसनकडे पाडून येईल. प्रशिक्षक हा त्याच तऱ्हेची नेतृत्वपद्धति ही त्याच खेळाडूसाठी निरनिराळ्या परिस्थितीत सुरूवातीपासून वापरू शकणार नाही.

- सुरूवातीला ट्रेनर हा गावस्करला सूचना देईल. नंतर शिक्षण देईल, नंतर त्याला मदत करील व जेव्हा गावस्कर हा बॉक्सिंगमध्ये प्रवीण होईल त्यावेळी प्रशिक्षक त्याला प्रतिनिधित्व करण्यास सांगेल.

- त्याचप्रमाणे व्यवस्थापकाला एकाच व्यक्तिशी निरनिराळ्या तऱ्हेच्या नेतृत्वपद्धति ह्या निरनिराळ्या कार्यासाठी त्या व्यक्तिची, ते काम करण्याची विकास पातळी ओळखून वापरायची असते.

**अंतिम वाक्य (Last ward)**

- साठ वर्षे वयाची अनुभवी व हुषार व्यक्तिही, मी जे वर्णन केले आहे त्याचप्रमाणे कोणाकडूनही न शिकता करून दाखवील. तर या पुस्तकात नवीन असे काय आहे?

- मूलभूतपणे हे पुस्तक तरुण उद्योजकांसाठी लिहिलेले आहे. परिणामकारक मानवी संबंध व मार्गदर्शन ह्यासाठी फक्त ही आठवण

करून देण्यासाठी आहे. वय वर्षे २० ते ४० च्या दरम्यान साधारणतः तरुण पिढीमध्ये 'ॲलेक्झांडर दी ग्रेट'चा आत्मविश्वास आणि धैर्य असते. त्यांना त्यांच्या स्वतःच्या कल्पना आणि तत्त्वज्ञान ह्यांच्या बळावर सर्व जग जिंकण्याचा फाजील आत्मविश्वास असतो. त्यामुळे असे करतांना ते काहीवेळा मानवी संबंधांच्या मर्यादांचे उल्लंघन करून इतके प्रचंड नुकसान व हानी करून घेतात की, असे नुकसान भरून काढणे अशक्य असते.

मी अशी काही उदाहरणे पाहिली आहेत ज्यामध्ये अनुभवी, उत्साही मुलांनी अति आत्मविश्वासामुळे त्यांच्या वाडवडिलांनी निर्माण केलेल्या नफा मिळवून देणाऱ्या औद्योगिक संघटनांचा नाश करुन टाकला.

म्हणून जर तुम्ही तरुण, महत्त्वाकांक्षी उद्योजक असाल तर तुमच्या पुढील आयुष्यातील यशासाठी माझ्या हार्दिक शुभेच्छा! तथापि तुम्ही ह्या पुस्तकांत वर्णन केलेल्या तत्त्वज्ञानांपासून जहालपणाने वेगळे असाल तर तुमच्या तत्वांवर पुर्नविचार करा. कारण ही तत्त्वज्ञाने ही काळानुरूप चाचणी केलेली आणि जगातील व्यावसायिक व्यवस्थापनांतील प्रमुख जाणकारांनी समर्थन केलेली आहेत.

*प्रकरण क्र. २२*

# यशस्वी नेता आपण कसा होऊ शकतो?

## (How to be a Successfull Leader)

- यशस्वी नेता बनण्यासाठी पुढील दोन गोष्टी महत्त्वाच्या आहेत.

१) लोकांनी तुमचे कौतुक केले पाहिजे.

२) लोकांनी तुमचे अनुकरण केले पाहिजे.

**तुमचे कौतुक लोकांकडून कसे होईल? (How to get admired?):**

तुम्ही लोकांचे आवडते बनण्यासाठी पुढील दोन गोष्टी जरुरी आहेत.

१) लोकांचे मन जाणून घेऊन त्याप्रमाणे कृती करा.

२) त्याप्रमाणे तुमचे चारित्र्य व स्वभाव बनवा.

**मानसशास्त्र (मनाचे शास्त्र) म्हणजे काय?**
**(What is human psychology?)**

योग्य पद्धतीने व्यवसाय करण्यासाठी आपणांस माणसाच्या मनाबद्दल काही गोष्टी समजल्या पाहिजेत. त्या पुढीलप्रमाणे आहेत.

१) या जगात प्रत्येक माणूस हा स्वतःला तो इतरांपेक्षा महत्त्वाचा आहे असे समजतो.

२) तो स्वतःला इतरांपेक्षा महान समजतो.

३) तो लोकांमध्ये आपले नाव पसरावे ह्यासाठी उतावीळ असतो.

४) माणुस हा मनाने अत्यंत कृतघ्न असतो.

- वरील दिलेल्या गोष्टी पुढे सविस्तरपणे स्पष्ट केल्या आहेत.

**स्वतःचे महत्त्व (Self Importance)**

मानव हा स्वतःलाच जास्त महत्त्व देतो. देशाच्या दुसऱ्या भागात मरत असलेल्या हजारो लोकांपेक्षा स्वतःचेच लहानसे दुःख हजारपटीने त्यांना जास्त वाटते.

जेव्हा टेलिफोन कंपनीने फोनवर झालेल्या भाषणाचा अभ्यास केला तेव्हा 'मी, माझे, मला हे शब्द जास्त वापरले गेलेले आढळून आले. प्रत्येकजण स्वतःबद्दल बोलण्यास आतूर असतो.

**श्रेष्ठपणा (Superiority)**

या जगात प्रत्येक व्यक्ति ही (तो किंवा ती) स्वतःला इतरांपेक्षा वरिष्ठ समजते. गोरी माणसे ही असा समज करून घेतात की, त्यांचा जन्म हा आफ्रिकन व आशियायी लोकांवर राज्य करण्यासाठी झालेला आहे. ह्या समजुतीनुसार युरोपियन लोकांनी प्रयत्न केले आणि त्यांनी जगावर काही काळ अंमल राखण्यात यश मिळविले. जपानी लोक हे स्वतःच्या भाषेला इंग्रजीपेक्षा श्रेष्ठ समजतात, म्हणुन जपानी लोक हे तांत्रिक साहित्य नेहमी त्यांच्या स्वतःच्या भाषेतच लिहितात, म्हणुन ते स्वतःला युरोपीयनपेक्षा महान समजतात आणि जर जपानी मुलीने युरोपियन माणसाबरोबर नाच केला तर त्यांना राग येतो. आपणच खरे 'खान' आहोत असे अफगाणी लोक समजतात व भारतीय खान हे नकली आहेत असे मानतात. खिश्चन लोक असे

समजतात की, कुराणची रचना ही बायबलपासून झालेली आहे. म्हणून त्यांचाच भाव आणि मार्ग हा खरा आहे. मुस्लिम लोक असा विचार करतात की, बाकी सर्व हे दिशाभूल झालेले आहेत.

सर्व मांसाहारी लोकांना हिंदू हे 'गलिच्छ' म्हणजे घाणेरडे लोक म्हणतात. ब्राह्मण हे स्वतःला इतरांपेक्षा श्रेष्ठ समजतात. व धार्मिक शिक्षण व ज्ञान ह्यावर आपल्याशिवाय कोणचाच हक्क नाही असे समजतात. चाळीस वर्षापूर्वी, उत्तरप्रदेशात माझ्या लहानपणी जर एखाद्या खालच्या जातीच्या माणसाने ब्राह्मण व्यक्तिची सावली जरी ओलांडली, तर ब्राह्मण लोक परत आंघोळ करीत होते.

याचप्रकारे ह्या जगात प्रत्येकजण स्वतःला श्रेष्ठ व इतरांपेक्षा जास्त भाविक मानतो.

ह्यामध्ये काहीही चूक नाही. हा माणसाचा स्वभाव आहे. आपण स्वतः हे लक्षात घेऊन त्यानुसार काम केले पाहिजे.

## प्रसिद्धीची तीव्र इच्छा (Craving for recognition)

गोपाळने हिऱ्याची अंगठी खरेदी केली व त्याच्या बोटांत त्याने घातली. त्याकडे सर्वांचे लक्ष जावे म्हणून बोलतांना तो हाताच्या बोटांनी जाणुनबुजून इशारा करीत होते. परंतु लोकांची नजर त्याच्या सुंदर अंगठीवर गेली नाही व कोणीही त्याची दखल घेतली नाही.

गोपाळ हा त्यामुळे इतका निराश झाला की, त्याने स्वतःच्याच घराला आग लावली. आग विझविण्यासाठी शेजारचे लोक पाण्याने भरलेल्या बालद्या घेऊन आले. गोपाळ त्यांच्यामध्ये उभा राहिला व त्याचे अंगठी घातलेले बोट नाचवित त्या शेजाऱ्यांना 'पाणी इकडे टाका, तिकडे टाका, आग अशी विझवा' अशा सूचना देऊ लागला.

दरम्यान एका शेजाऱ्याचे त्या अंगठीकडे सहज लक्ष गेले आणि तो सहजपणे म्हणाला,'गोपाळ तू घातलेली अंगठी फार सुरेख आहे.' त्यावर गोपाळ बोलला,'अरे मित्रा, तू जर हे मला आधी

सांगितले असते तर मी माझ्या स्वतःच्या घराला आग का लावली असती'?

हा एक विनोद (Joke) आहे. पण त्यामुळे माणसाचा स्वभाव योग्यप्रकारे स्पष्ट केला जातो.

मला अशा एका माणसाची माहिती आहे की, जो आपल्या कुटुंबाच्या गरजा जेमतेम पुऱ्या करू शकत होता. व तो एका ३५० sq.फूट भाड्याच्या घरात त्याच्या सहा मुलांसह राहात होता. काही दिवसांनी त्याचे उत्पन्न वाढले. कल्पना करा की, वाढलेल्या पैशांचे त्याने काय केले असेल? त्याच्या मुलांना चांगल्या शाळेत पाठविले असेल? की घर वा वर्कशॉप खरेदी केले असेल? नाही. त्याने एक सुंदर व मोठी मोटारगाडी खरेदी केली.

का खरेदी केली असेल? जरा थोडा विचार करा.

आपण स्तुतीसाठी उतावीळ झालेलो असतो. आपण मान मिळावा म्हणून व लोकांचे आपल्याकडे लक्ष जावे ह्यासाठी अतिशय पागल होतो. माणसे ही निरनिराळ्या आधुनिक फॅशनचे कपडे घालतात, त्यांची घरे सजवितात, तसेच बंगले सुशोभित करतात. मेजवान्यांवर पैसा उधळतात, महागड्या गाड्या खरेदी करतात आणि जुन्या वळणाच्या समाजात अतिशय आधुनिक राहणीचा अवलंब करतात. का? तर सर्वांचे आपल्याकडे लक्ष गेले पाहिजे.

लोकांना ओरडून असे सांगावेसे वाटते, कि 'माझ्याकडे पाहा. अत्यंत आधुनिक पुढारलेला, सुसंस्कृत व भरभराट झालेला माणूस म्हणून पाहा, 'तुम्हां सर्वांपेक्षा मी प्रत्येक बाबतीत वरचढ आहे.' पण त्यांना असे करावयास लाज वाटते म्हणुन ते हाच संदेश त्यांच्या मालकीच्या वस्तूंची दिमाखाने प्रदर्शन करून देतात.

जर अशा माणसाला तुमच्या कंपनीमध्ये नोकरीला ठेवलेत तर त्याच्याकडे लक्ष द्या व त्याचे कौतुक करा. नाहीतर तो तुमचे लक्ष वेधून घेण्यासाठी काहीतरी वस्तू जाळून टाकेल. मी विनोद करीत नाही, ह्यावर विश्वास ठेवा.

**कृतघ्नपणा (Ungratefulness):**

तुम्हाला ठाऊक आहे कां जगाचा निर्माता (ईश्वर) आपल्या निर्मितीबद्दल काय म्हणतो ते?

*'वस्तुस्थिती अशी आहे की मानव आपल्या पालनकर्त्याशी फार कृतघ्न आहे !'* (पवित्र कुराण १००:६)

ईश्वराशिवाय माणसाचा स्वभाव कोणाला ठाऊक आहे?

एकदा येशु ख्रिस्ताने दहा महारोग्यांना बरे केले. ते जेव्हा रोगमुक्त झाले तेव्हा त्यांनी आनंदाने उड्या मारल्या व पळून गेले. काही वेळानंतर त्यांच्यापैकी फक्त एकजण परत आला आणि त्याने ख्रिस्ताचे आभार मानले. बाकीच्या नऊजणांनी किंचितही कृतज्ञता ख्रिस्ताकडे व्यक्त केली नाही.

आपण येशू ख्रिस्त नाही किंवा आपण कोणचाही महारोग बरा करण्याइतके महान नाही. त्यामुळे दहाजणांपैकी एकजणही परत येऊन आपले आभार मानणार नाही. हा मनुष्याचा स्वभाव आहे. त्यामुळे आपण लोकांकडून कृतज्ञता किंवा कौतुकाची अपेक्षा करू नये.

- जेव्हा माणसाचा स्वभाव हा इतका चांगला नसतो तर त्याच्याबद्दल आपण काळजी कशाला करावयास हवी?
- ईश्वर असे सांगतो,

*'सव्दर्तनाचे आवाहन करणारा व चांगुलपणाचा आदेश देणारा, तसेच दुराचाराचा प्रतिबंध करणारा एक गट तुमच्यात अवश्य असला पाहीजे, अशा लोकांना साफल्य लाभेल.'* (पवित्र कुराण ३:१०४)

म्हणून माणसाच्या स्वभावात खूप दोष असले तरी दोन्ही जगात (भौतिक आणि परमार्थिक) यशस्वी होण्यासाठी आपण अशा लोकांच्या समूहात राहिले पाहिजे. जे लोक नेहमी दुसऱ्यांचे भले करतात, त्यांना चांगल्या गोष्टींसाठी उपदेश करतात व त्यांच्या चुकांपासून त्यांना सावध करतात.

- आपल्याला माणसाच्या स्वभावाबद्दल माहिती झालेली आहे व आपले मुख्य कार्य म्हणजे लोककल्याण. आता आपण अभ्यास करू कि आपण यशस्वी नेता कसे होऊ शकतो.

**लोकांवर प्रभाव कसा पाडावा? (How to Influence People?) :**

- **तर्कशुद्ध बोलने (Logical Talking)**

लोकांशी व्यवहार करतांना काही महत्वाच्या सूचना खाली दिलेल्या आहेत.

ईश्वर पवित्र कुराणात असे सांगतो,

*'हे मुहम्मद*! (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) *आपल्या पालनकर्त्याच्या मार्गाकडे आमंत्रीत करा अशा मुत्सद्देगीरीने व उत्तम उपदेशासहित, आणि लोकांशी विवाद करा अशा पद्धतीने जी उत्तम असेल.'*

(पवित्र कुराण,१६:१२५)

ईश्वर पवित्र बायबलमध्ये असे सांगतो,

*'तुमचे बोलणे हे नेहमीच नम्र असू द्या.'* (पवित्र बायबल,Col.४.६)

*'तुमचे संभाषण कोणत्याही लोभापासून मुक्त असू दे'*

(पवित्र बायबल, Heb. १३.५)

तर्कशुद्ध, शहाणपणा आणि आकर्षक पद्धतीने बोलणे ही लोकांचे कौतुक मिळविण्याची पहिली पायरी आहे.

- **कोणाची फजिती करू नका. (Never Condemn)**

जेव्हा तुम्ही कोणाचीही फजिती करता तेव्हा माणसाचे महत्त्व आणि श्रेष्ठत्व ह्यालाच आव्हान देता. आणि हे नकारात्मक कौतुक आहे. ते त्यांच्या मूळ स्वभावाच्या विरुद्ध आहे. म्हणून लोक तात्काळ प्रतिक्रिया दर्शवितात. ते जरी चूकीचे असले तरी त्यांच्याच भूमिकेचे समर्थन करीत बसतात. कारण त्यांच्या अहंकाराला आधार देणारा हाच एक मार्ग आहे. जरी तुम्ही त्यांच्या फायदा आणि सुधारणा

ह्यासाठी निषेध दर्शविलात तरी ते त्याचा दुसराच अर्थ काढतील. ते घायाळ, कडवट, प्रतिवादी व दुराग्रही बनतात. तो प्रसंग मनात ठेवुन भविष्यकाळात त्याचा सूड घेतात. जर तुम्हाला तिरस्कार करून घ्यावयाचा नसेल तर कोणाचीही फजिती करू नका.

- **प्रशंसा (Appreciation)**

लोकांच्या प्रत्येक पराक्रमाची आणि चांगल्या कामगिरीची प्रामाणिकपणे व मनापासून प्रशंसा करा. खुशामत (Flattery) आणि प्रशंसा (Appreciation) ह्या दोन्ही गोष्टींमध्ये फरक आहे. खुशामत (काही कारणाशिवाय केलेली प्रशंसा) केल्याने व्यक्तिंना राग येतो. उलटपक्षी योग्य स्तुती ही त्यांच्या सुखाची उंची वाढविते. जे एखाद्याच्या धडपडीची प्रशंसा करतात व किंमत करतात, ते लोकांना प्रिय होतात.

- **हसरा चेहरा (Smile)**

अशी चिनी म्हण आहे की,'हसरा चेहरा नसणाऱ्या माणसाने दुकान खोलू नये.'

जेव्हा तुम्ही हसऱ्या चेहऱ्याने एखाद्याला भेटता, तेव्हा तुम्ही अप्रत्यक्षपणे सांगता 'तू मला आवडतोस. 'तू मला आनंदी करतोस. तुला बघून मला आनंद वाटला.' इत्यादि.

दुसरी व्यक्ति ही तुमच्या कृतिने आनंदित होते व सकारात्मक रीतीने प्रतिक्रिया देते. ही संपूर्ण क्रिया मैत्रीचे वातावरण निर्माण करते.

कुत्रा हा अत्यंत कौतुक केला जाणारा पाळीव प्राणी आहे. पण का?

कारण त्यांच्या मालकाला भेटल्यावर तो त्याचा अतिशय आनंद व्यक्त करतो. म्हणून मालकसुद्धा त्यांच्यावर अन्य कुठल्याही प्राण्यापेक्षा जास्त प्रेम करतो.

म्हणून जेव्हा तुम्ही कोणालाही भेटता तेव्हा तुम्ही हसऱ्या चेहऱ्याने भेटा व तुमच्या चांगल्या भावना प्रगट करा. जर तुम्ही असे केलेत, तर मला असे म्हणावयाचे नाही की लोक तुमच्यावर पाळीव कुत्र्याप्रमाणे प्रेम करतील. माझ्या म्हणण्याचा अर्थ असा आहे की, तुम्ही लोकांना अन्य कोणत्याही हसरा चेहरा नसणाऱ्या माणसांपेक्षा जास्त प्रिय व्हाल.

हसरा चेहरा हे मधला दुरावा दूर करते. ते (हास्य) उत्साही आणि मैत्रीपूर्ण वातावरण निर्माण करते. म्हणून लोकांना साहजिकच ते आवडतात व ते अशा लोकांना सहकार्य करतात. म्हणून नेहमी लोकांचे हसऱ्या चेहऱ्याने स्वागत करा.

- **संभाषण (Conversation)** :

जर तुम्हाला संभाषणामध्ये कोणावर छाप पाडावयाची असेल, तर त्या माणसाला जगात जो विषय महत्त्वाचा वाटतो त्या विषयाची निवड करा. तो विषय तो स्वतःच आहे. त्या माणसाला स्वतःबद्दल बोलण्यास वाव द्या आणि त्याचे म्हणणे काळजीपूर्वक ऐका. तुमच्या शब्दकोशातून मी माझे, मला हे शब्द काढून टाका व त्याजागी तू, तुझे, तुझ्यासाठी हे शब्द पर्यायी ठेवा.

जर दुसरा माणूस हा तासनतास बोलत असेल तर तो त्याचे म्हणणे लक्षपूर्वक ऐकणाऱ्यावर प्रेम करील. कारण असे आहे की, बोलण्याने लोक हे स्वतःची मानसिकरित्या (Psychological) व्यक्त करण्याच्या गरजेचे समाधान करून घेतात व शांतपणे त्यांचे म्हणणे ऐकून घेतल्याने त्यांना आपण महत्त्वाची व्यक्ति आहोत ही जाणीव होते. ते असा विचार करतात की, या जगात कोणीतरी त्यांच्याकडे व त्यांच्या कामगिरीकडे लक्ष ठेवून आहे. आणि असे ऐकणारे लोक त्यांना जास्त आवडतात.

- **नावात काय आहे? (What's in Name?)** :

प्रत्येकाच्या कानात गोड आवाज करणारी गोष्ट म्हणजे त्यांचे

सुंदर नाव. जेव्हा तुम्ही कोणाला नावाने हाक मारता व त्या नावाचा उच्चार बरोबर करता, तेव्हा ती व्यक्ति सकारात्मक प्रतिसाद देते. म्हणून तुम्हाला कोणाच्यातरी ह्रदयात सहानुभूतीचा एक कोपरा ठेवावयाचा असल्यास त्या व्यक्तिचे गोड नाव लक्षात ठेवा व त्या नावाचा उच्चार अचूक करा.

- **उच्च चारित्र्य व नम्र स्वभाव ठेवणे.**
  **(To Have Noble Character and Soft Nature)**

तुम्ही एखाद्याला एकदा फसवू शकता पण प्रत्येकवेळी काही तुम्ही त्याला उल्लू बनवू शकणार नाही. नुसत्या नाटक करण्याने तुम्ही तुमचे मित्र आणि साथीदार ह्यांची निष्ठा फार जास्त काळापर्यंत टिकवू शकत नाही. शेवटी तुमच्या मुखवट्यामागचा खरा चेहरा लोकांना समजून येतो. जर तुम्हाला समाजात तुमचा स्वीकार आणि प्रशंसा हवी असेल तर खरेपणाने उच्च चारित्र्य व नम्र स्वभाव ह्यांचा स्वीकार करा.

ईश्वर सांगतो,

*'हे मुहम्मद!*(सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) , *'तुमचे चारित्र्य अत्यंत उदात्त आहे.'* (पवित्र कुराण ६८.४)

*'हे मुहम्मद* (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) , *तुमचा स्वभाव अत्यंत मृदू व गोड आहे म्हणून तुमचे साथीदार तुम्हाला सोडून जात नाहीत.'* (पवित्र कुराण ३.१५९)

- थोडक्यात नेतृत्वातील पहिला अडथळा म्हणजेच लोकांनी न स्वीकारणे व लोकांना न आवडणे. हा अडथळा खालील गोष्टीमुळे दूर होईल.

१) तर्कशुद्ध बोलने

२) कोणाचीही फजिती करू नये

३) योग्य प्रशंसा करणे

४) हसरा चेहरा ठेवणे

५) संभाषण (समोरच्या व्यक्तीला बोलण्यासाठी प्रोत्साहित करणे)

६) लोकांचे नाव लक्षात ठेवणे व त्या नावाचा योग्य उच्चार करणे

७) उच्च चारित्र्य व नम्र स्वभाव ठेवणे.

**लोक तुमचे अनुकरण कसे करतील? (How to get followed?):**

• जरी तुम्ही लोकांना आवडत असून ते तुमच्यावर प्रेम करीत असले, तरीसुद्धा ते कदाचित तुमच्या आज्ञांचे पालन करणार नाहीत किंवा तुमचे निर्णय मान्य करणार नाहीत. त्यांच्यावर नियंत्रण कसे ठेवावे आणि त्यांना तुमचे अनुकरण करण्यास कसे भाग पाडावे?

पुढे प्रभावी नेतृत्वासाठी काही सूचना दिलेल्या आहेत.-:

• तुम्ही महाविद्यालयात कष्ट करून अभ्यास का केला? किंवा तुम्ही तुमच्या कार्यालयात किंवा कारखान्यात धडपड करून काम का करता?

तुम्ही मेहनतपूर्वक अभ्यास केलात कारण तुम्हाला वरचढ होण्याची, व्यावसायिक अभ्यासक्रमासाठी प्रवेश मिळवण्याची इच्छा होती. तुम्ही कार्यालय किंवा वर्कशॉपमध्ये मेहनत करून काम करता कारण तुम्हाला प्रत्येक प्रतिस्पर्ध्याच्या पुढे जाण्याची इच्छा आहे.

तुमची इच्छा होती म्हणून तुम्ही मेहनत करण्यास कारणीभूत झालात. तुमची इच्छा हेच तुमच्या यशाचे रहस्य आहे.

जर तुम्ही एखाद्या माणसात उत्कट इच्छा जागृत केलीत. तर तो त्याला धक्का देऊन वा त्याची खुशामत केल्याशिवाय तुमच्या अपेक्षेच्या पलीकडेही जास्त मेहनत करील. जर तुम्हाला तुमच्या हाताखालची माणसे मेहनत करावयास हवी असल्यास तर त्यांच्यामध्ये उत्कट इच्छा निर्माण करा.

• जर तुम्हाला तुमच्या हाताखाली काम करणाऱ्यात कमी उत्पादकता, कमी कार्यक्षमता किंवा प्रेरणाशक्तीची अनुपस्थिती आढळून आली, तर त्यांच्यासमोर एक आव्हान उभे करा किंवा वरचढ होण्यासाठी त्यांच्यामध्ये चढाओढीचे वातावरण निर्माण करा. त्यांना स्वतःच मोठे लक्ष्य गाठण्यासाठी प्रेरित करा व ते पूर्ण करण्यासाठी त्यांना संधि द्या.

• जेव्हा कर्मचाऱ्यांच्या चांगल्या कामाकडे कोणीही ध्यान देत नाही तेव्हा त्यांचे नीतिधैर्य (उत्साह) कमी होतो. चांगल्या कामाची स्तुति वा कौतुक करा. जर त्यांच्याकडुन एखादी चूक घडून आली तर सर्वांच्या समोर त्यांचा पाणउतारा करु नका.

चांगल्या कामाकडे दुर्लक्ष करून कर्मचाऱ्याला सर्व लोकांच्या समोर जाब विचारणे किंवा त्याचा अपमान करणे ह्या सर्वात मोठया चुका आहेत, ज्या नेता करतो.

• आदर्श नेता हा त्याच्या हाताखालच्या लोकांची स्तुति करण्यासाठी सबबी शोधून काढतो, व त्यांनी चुका केल्या तर त्याच्या चुका सुधारण्यासाठी त्यांना नविन संधी देतो.

• चांगला नेता हा त्याच्या कर्मचाऱ्यांना त्याच्या केबिनमध्ये किंवा त्यांचे संभाषण कोणीही ऐकू शकणार नाही अशा ठिकाणी बोलावितो व नंतर अप्रत्यक्षपणे त्यांच्या चुकांकडे लक्ष वेधून देतो. दुसऱ्यावर टीका करण्यापूर्वी चांगला नेता हा आधी स्वतःच्या चुकांबद्दल बोलतो.

• आदर्श नेता हा थेट हुकूम देण्याऐवजी प्रश्न विचारतो. उदा. जर त्याचे पेन जमिनीवर पडले तर त्याने पेन उचलण्याची थेट आज्ञा अशीही देऊ शकतो कि 'तो पेन उचल! पण आदर्श नेता अशी आज्ञा न देता तो विचारेल,'तुम्ही माझे पेन उचलून देऊ शकता का?' त्याच कामासाठी पहिली गोष्ट ही सरळ आज्ञा होती. पण दुसरी बाब ही आज्ञाच पण विनंती वा मेहरबानीच्या स्वरूपातील

होती. कोणालाही थेट हुकूम पालन करणे नको असते व प्रत्येकाला मेहरबानी करावीशी वाटते कारण त्यामुळे त्यांचे महत्त्व वाढते.

- चांगला नेता हा त्याच्या चुका ताबडतोब किंवा लाज न वाटता मान्य करतो.

- चांगला नेता हा प्रेरणा देतो, प्रोत्साहन देतो आणि चुकांची दुरुस्ती सोपी करून टाकतो.

**काही असामान्य सल्ले (Some unconventional advices):**

- लाओ त्सू (Lao Tzu) हा ई.सन पुर्व ५००मध्ये चिनी तत्ववेत्ता (तत्त्वज्ञ) होता. त्याने चिनी राज्यकर्ते आणि राजकारणी ह्यांच्यासाठी 'ताओ टी चिंग'(Tao Te Ching) हे पुस्तक लिहिले. पुष्कळ लोकांनी त्याचे इंग्रजीत भाषांतर केले आहे. जॉन हईडर ह्यांने ते एकत्रित करून व त्यांचे संक्षिप्त रुपात साध्या व सुंदर पुस्तकांत रुपांतर केले. त्याचे शीर्षक टाओ ऑफ लिडरशिप (Tao of leadership) असे आहे. ताओ टी चिंग मधील काही तत्वज्ञानांची संक्षिप्त रुपांतरे पुढे खालीलप्रमाणे आहेत.

लाओ त्सू सांगतो,'नेत्याने दाई किंवा नर्स प्रमाणे काम केले पाहिजे.'

नर्स ही लहानमुलांच्या जन्माच्यावेळी मदत करते. ती प्रसुतिकळा कमी करण्याचे काम करते व लहान बालकाला सुरक्षितपणे बाहेर काढण्याचा प्रयत्न करते. नर्स ह्यांची भूमिका जरी अत्यंत महत्वपुर्ण असली तरी जेव्हा बालक जन्माला येते तेव्हा त्याची आई म्हणते,'मी हे केले, मी बालकाला जन्म दिला.' कोणीही नर्सचे नाव किंवा प्रयत्न ह्यांचा उल्लेखपण करीत नाहीत.

त्याचप्रमाणे नेत्याने पण अनुयायांच्या हृदयात एखादे कार्य करण्याची उत्कंट भावना जागवून त्यासाठी त्यांना प्रोत्साहन व मदत केली पाहिजे व जेव्हा काम पूर्ण होते, त्यावेळी नेत्याचे साथीदार व अनुयायी ह्यांना म्हणून दे कि 'हे काम आम्ही केले. त्यांना त्या

काम करण्याचे श्रेय घेऊ दे व त्याचे महत्त्व वाटू दे. नेत्याने फक्त स्वत:चं कामाचे श्रेय घ्यायचे नसते.

जेव्हा नेता हा चांगल्या कामाचे श्रेय घेत नाही व पैशाच्या व्यवहारात स्वच्छ व उदार राहातो, त्यावेळी सन्मान आणि भरभराट त्याच्याकडे आपोआप आकर्षित होऊन येते.

- 'नम्र, सेवाभावी, समजुतदार व स्विकार (ग्रहण) करणारा स्वभाव या गुणामुळेच नेत्याला मोठेपणा प्राप्त होतो'

'Greatness comes from knowing how to be lowely, empty, receptive and of service.'

धडाकेबाज, हुरळून जाणारी, नाटकी, उद्धट व नमते न घेणारी व्यक्ति ही खळबळजनक, भावनावश व माथेफिरू लोकांचे नेतृत्व कधीच करू शकत नाही. अशातऱ्हेच्या समुदायाचे नेतृत्व करण्यासाठी नेता हा सेवाभावी, नम्र, समजूतदार असावा लागतो. उदा. जेव्हा लहानशी नदी ही डोंगरावरून खाली वाहात येते तेव्हा ती खळबळाट व उसळून येणारी असते. परंतु जेव्हा ती नदी धीमा, स्वीकार करणाऱ्या शांत महासमुद्रात येऊन मिळते, तेव्हा तिचेही समुद्राच्या परिस्थितीप्रमाणे रुपांतर होते व ती शांत आणि धिमी बनते.

शहाणा नेता हा नेहमी सेवाभावी ग्रहणक्षम, नमते घेणारा व अनुकरण करणारा असतो. सुरूवातीला साथीदारांची स्पंदने अंमल करून नेतृत्व करतात व नेता त्यांचे ऐकतो, तथापि नंतर साथीदारांची विवेकबुद्धि ही नेत्याच्या विवेकबुद्धिप्रमाणे बदलून जाते.

जर नेत्याचे पाय जमिनीवर असून तो दरम्यानच्या रस्त्यावर चालणारा, नमते घेणारा, नेहमी सेवाभावी वृत्तिचा, समजून घेणारा व अनुकरणशील असेल तरच नेत्याची विवेकबुद्धि ही प्रत्येक अनुयायाच्या विवेकबुद्धिवर सत्ता गाजवू शकेल.

- जर आपण एखादी गोष्ट जास्तीत जास्त व वारंवार करीत

गेलो तर त्याच्या विरुद्ध किंवा विरुद्ध गुणधर्म दिसावयास लागतील.'

उदा. अतिशय सुंदर, दिसण्यासाठी खुप प्रयत्न केल्यास व्यक्ति ही कुरुप दिसु लागते. जीवनाचा अत्यंत मोह हा मरणाची भिती सूचित करतो. म्हणून आपली वृत्ति मर्यादेच्या आत ठेवावी. दरम्यानच्या रस्त्यावर चालण्याचा प्रयत्न केला पाहीजे आणि आपण अतिरेक टाळले पाहिजेत.

- नेता हा Centered आणि Grounded असावा, म्हणजेच तो मनाने स्थिर असावा व त्याच्याकडे खोटा अभिमान नसावा. तरच तो अनिश्चित लोकांच्याबरोबर परिणामकारक रीतीने व अत्यंत चिंताजनक प्रसंगात काम करू शकेल.

Grounded म्हणजे त्याचे पाय जमिनीवरच असले पाहिजेत. त्याने भावनेच्या प्रभावाखाली कृति करता कामा नये किंवा दुसऱ्या शब्दांत सांगावयाचे झाल्यास आपण काय करतो वा सांगतो ह्याची त्याला माहिती असली पाहिजे. आपली योग्यता काय व आपण कशासाठी योग्य आहोत हे त्याला माहित असले पाहिजे.

Centered (मनाने स्थिर) म्हणजे एखाद्याचे क्रिया (Action), सनसनाटी (Excitement) आणि भावना (Emotion) ह्यांच्यामध्ये तात्काळ मानसिक संतुलन ठेवण्याची पात्रता. जो नेता Centered व Grounded नाही तो नेता सनसनाटी, भावना आणि नेतृत्वाच्या दबावाखाली भरकटत जातो. तो निर्णय घेण्यात चुका करतो किंवा आजारीसुद्धा पडतो.

- शांत प्रतिक्षिप्त (Silent reflection) क्रियेसाठी नियमित आणि पुरेसा वेळ द्या. म्हणजे मनातील भावना निघुन जाऊन मनाला शांती प्राप्त व्हायला पाहिजे.

जास्त प्रमाणात हुकूम, सूचना, ढवळाढवळ व नाटकीपणा हे समुदायामध्ये (Group of worker) बुद्धिचा नाश करतात. तसेच तर्कशुद्ध विचार व संयुक्तिक समजूतदारपणा ह्यांच्यात अडथळा आणतात.

• जर तुम्हाला स्वतःचीच ओळख व स्वतःमध्ये सुधारणा करावयाची असेल, तर ध्यान (किंवा चिंतन) करा. साध्या शब्दांत सांगावयाचे झाले तर ध्यान म्हणजे कशाचाही विचार न करता, तसेच आपल्या पाचही इंद्रियांचा वापर न करता, आपल्या स्वतःच्या कपाळावर आरामदायक स्थितीत लक्ष केंद्रित करणे.

• रौन हॉलंड हा त्याच्या (Talk and Grow Rich) ह्या पुस्तकांत शांत राहाण्याची शिफारस करतो व दररोज ३० मिनिटे कुठल्याही गोष्टीचा विचार करावयाचा नाही असे सांगतो. त्यासाठी तो आवाजाला अभेद्य (Sound proof) अशा खोलीला पसंती देतो. अशा खोलीत आकड्यांत वेळ दाखविणारे इलेक्ट्रॉनिक घड्याळ घेऊन बसा. मन हे ३० मिनिटे विचारांशिवाय रिकामे ठेवणे हे अत्यंत अवघड काम आहे. म्हणून एका मिनिटासाठी काहीही विचार न करण्याचा प्रयत्न करा, नंतर आणखी एक मिनिट असे करत करत ३० मिनिटे पूर्ण करा. शांतपणे बसणे व काहीही विचार न करणे, यामुळे मनातील बडबड बंद होईल. आपण अर्धजागृत मनाने, सहावे इंद्रिय आणि ईश्वरी अंतःप्रेरणेने सादर केलेले विचार स्पष्टपणे ऐकू व समजू शकतो.

• ईश्वराकडे पूर्ण लक्ष केंद्रित करून केलेली प्रार्थना हा ध्यान साधनेचा व मन रिकामे करण्याचा आणखी एक प्रकार आहे. त्यामुळे मन आणि आत्मा ताजातवाना होतो. दररोज कमीत कमी अर्धा तास तरी प्रार्थना केल्याचा फायदा म्हणजे मन आणि शरीर दोन्ही तंदुरूस्त होईल.

• श्री. बी. के. पंत ह्या सद्गृहस्थाने १९५९ मध्ये स्वतःची कंपनी सुरू केली. त्याच्याकडे २५० पेक्षा जास्त कामगार होते आणि १९७५ पर्यंत त्याची कंपनी अत्यंत चांगली चालत होती. पुढील विस्तारासाठी त्याने १९७५ साली १५ लाख रुपये बँकेकडून कर्ज घेतले. अकस्मातपणे त्याच्या कंपनीत कामगारांच्या समस्या निर्माण झाल्या. त्यामुळे त्याचे खूप आर्थिक नुकसान झाले व त्याची कंपनी

आजारी म्हणून घोषित केली गेली. पुढील २५ वर्षे तो कर, पगार व सावकारांची देणी देऊ शकला नाही.

ज्या कामगारांनी त्याला दिवाळखोरीच्या अवस्थेला आणले होते ते त्याच्याकडे पगारवाढ, बोनस, पेमेंट इत्यादि वेळेवर देण्यासाठी नीचपणाने मागणी करू लागले.

जेव्हा मी त्याच्याच आवारात माझा धंदा सुरू केला, त्यावेळी माझे उत्पन्न एवढे कमी होते की मी त्याला काही मदत करू शकलो नाही. हताशपणे मी फक्त त्याला पाहात होतो व जीवनातील कडवट धडे शिकत होतो. तो सद्‌गृहस्थ त्याची समर्थ पत्नी मॅडम गीता पंत ह्यांनी शांतपणे मानसिक छळ सहन केला व हा न सोसणारा भार हा वीस वर्षापर्यंत उचलला. त्यांची मुलगी अनुपमा डॉक्टर झाल्यावर अमेरिकेत गेली. तेथून तिने पैशांची व्यवस्था करून बँकेचे कर्ज फेडले. कामगार व सरकार ह्याचे पगार व देणी दिली आणि आपल्या आईवडिलांची कालचक्राच्या गिरणीमध्ये चिरडून जाण्यापासून सुटका केली.

जेव्हा मी श्री पंत ह्यांच्या जीवनशैली आणि नेतृत्वपद्धतिचे पृथ्थकरण केले, तेव्हा मला लाओ त्सूने (Loa Tzu) समर्थन केलेली नेतृत्व पद्धति पटली. श्री पंत क्वचितच कडकपणे बोलतात व ते प्रत्येकाचे ऐकून घेतात पण ते कधीही उन्मळुन जात नाहीत. ते त्यांच्या तत्वाशी तडजोड न करता निश्चयपूर्वक परिस्थितीशी सामना करीत असतात.

काही वेळा आयुष्यामध्ये आपण कुटुंबातील सदस्य, समाज आणि कामगार ह्यांच्याशी सामना करताना असाहाय्य होतो. अधिकाराचा वापर, जबरदस्ती किंवा डोक्यावर डोके आपटल्याने परिस्थिती आणखीन बिघडून जाते. लाओ त्सूने (Loa Tzu) यांचे तत्वज्ञान हेच अशा परिस्थितीला तोंड देण्याचा एक मार्ग आहे.

- अशी खूप तत्त्वज्ञाने, सिद्धांत आणि व्यवस्थापनाची तत्त्वे आहेत, ह्यापैकी जास्त परिणामकारक कोणते? आपण कुठल्या तत्वाचा

अवलंब केला पाहिजे? हा प्रश्न आपण आपल्या ईश्वराला विचारूया. तो काय म्हणतो ते पाहूया.

तो (ईश्वर) सांगतो,

*'वैभल्यग्रस्त होऊ नका, दु:खी होऊ नका, तुम्हीच प्रभावी ठराल जर तुम्ही श्रद्धावंत असाल.'* (पवित्र कुराण ३:१३९)

दुसऱ्या ठिकाणी ईश्वर असे सांगतो,

*'जो कोणी ईश्वराच्या प्रकोपाला भिऊन काम करील, ईश्वर त्यांच्यासाठी अडचणीतून निघण्याचा एखादा मार्ग निर्माण करुन देईल आणि त्याला अशा मार्गाने उपजीवीका देईल जी त्याच्या कल्पनेतदेखील नसेल. जो ईश्वरावर भिस्त ठेवील त्याच्यासाठी तो पुरेसा आहे'*

(पवित्र कुराण ६५:२-३)

- अखिल विश्वाचा पालनकर्ता सांगतो,

*'काळाची शपथ, सर्व मानवप्राणी हे नुकसान भोगतील मात्र त्याखेरीज, जे माझ्यावर विश्वास ठेवतात, चांगली कार्ये करतात, योग्य मार्गाचा अवलंब करण्याची तालिम करतात आणि सहनशीलता आचरणात आणतात.*

(पवित्र कुराण १०३-३)

ईश्वरावर विश्वास, माणुसकी आणि सहनशीलता हे गुणविशेष माणसाच्या आयुष्यातील यशाची रहस्ये आहेत. जर तुम्हाला व्यवसायात यशस्वी व्हावयाचे असेल तर व्यवसायात ह्या गुणांचे आचरण करण्याचा प्रयत्न करा.

तुमच्या हाताखालच्या लोकांवर ताबा ठेवण्यासाठी व तुमच्या उद्योगाचे व्यवस्थापन करण्यासाठी तुम्ही तुमच्या आवडीच्या कोणत्याही तत्वाचे अनुकरण करा. परंतु ते तत्व हे मानवतेच्या सरळ व सर्वसामान्य नियमानुसार असले पाहिजे आणि ईश्वराची कृपादृष्टी आणि आशीर्वाद निमंत्रित करणारे असले पाहिजे.

### *प्रकरण क्र. २३*

# निर्णय घेण्याची प्रक्रिया

## (Decision Making)

• एक म्हातारा माणूस व त्याचा तरुण मुलगा हे त्यांच्या गाढवाला घेऊन शेजारच्या खेडेगावात जाण्यास निघाले. जेव्हा ते एका छोट्या गावांमधून जाऊ लागले तेव्हा लोकांनी त्यांना पाहिले व त्यांच्याकडे पाहून हसत म्हणू लागले,' काय मूर्ख लोक आहेत. त्यांच्याकडे गाढव आहे. पण ते त्यावर बसून स्वारी करीत नाहीत.' म्हणून म्हाताऱ्याने त्याच्या मुलाला गाढवावर बसण्यास सांगितले.

जेव्हा ते दुसऱ्या एका खेडेगावातून जात होते तेव्हा काही लोक पुन्हा त्यांच्याकडे पाहून हसून म्हणाले,'या मुलाला काही अक्कल नाही. बिचारा वृद्ध माणूस चालतो आहे व हा मुलगा मजेत गाढवावर बसून प्रवास करतो आहे.' तेव्हा मुलगा गाढवावरून खाली उतरला व वृद्ध बाप गाढवावर बसला.

ते जेव्हा एका दुसऱ्या शहरात प्रवेश करते झाले, तेव्हा लोक त्यांच्याकडे पाहून हसू लागले आणि म्हणाले,'ह्या बापाला काही दया वगैरे येत नाही बिचारा मुलगा पायी चालतो आहे व बाप स्वतः गाढवावर बसून मजेत चालला आहे.' तेव्हा त्या वृद्ध माणसाने आपल्याबरोबर मुलालाही गाढवावर स्वार होण्यास सांगितले व पुढे जाऊ लागले. त्या दोघांच्या वजनाचा भार गाढवाला अतिशय जास्त

होता. ते जेव्हा दुसऱ्या गर्दीच्या घोळक्यातून जाऊ लागले तेव्हा त्या घोळक्यातील काहींनी पुन्हा टोमणा मारला व म्हणाले,' हे बाप व लेक ह्या गरीब प्राण्याचा जीव घेत आहेत व त्यांना गाढवाबद्दल बिलकुल दया वाटत नाही.'

तो म्हातारा बाप व मुलगा काय करावे ह्याचा निर्णय निश्चित करू शकले नाही. अखेर शेवटी त्यांनी एक लाकडाचा ओंडका घेतला, गाढवाचे पाय त्याला बांधले व तो ओंडका गाढवासकट खांद्यावर घेऊन चालू लागले. ते जेव्हा एका पुलावर आले. तेव्हा ही गंमतीदार घटना पाहाण्यासाठी आणखी खूप गर्दी जमली. लोकांची टवाळकी, हास्य आणि शेरेबाजीने ते गाढव घाबरून गेले व स्वतःची सुटका करून घेण्याची धडपड करीत असतांना गाढव पाण्यात पडले आणि बुडाले.

ही शाळेत शिकवलेली एक काल्पनिक गोष्ट आहे. पण प्रत्यक्षात ती काल्पनिक नाही. अशा तऱ्हेच्या प्रसंगांची आपल्याभोवती शेकडो वेळा पुनरावृत्ती होत असते. फक्त त्यामधील पात्रे बदललेली असतात. उदा.

- श्री. जाधव नावाचे सद्‌गृहस्थ एका ऑफिसात कारकून म्हणून काम करीत होते. त्याच्या मित्राने त्यांना विक्रेतापद (Salesman) घेण्यास प्रवृत्त केले व नोकरीचा राजीनामा देण्यास सांगितले. त्याप्रमाणे जाधवने केले, पण तो विक्रेता म्हणून यशस्वी झाला नाही.

मग जाधवच्या वडिलांनी त्याला लहान लहान वर्कशॉपना कमिशन तत्वावर लोखंडी सामानाचा पुरवठा करण्यास सांगितले. त्याप्रमाणे त्याने केले. पण त्याच्या अपेक्षेइतका त्याला नफा मिळाला नाही. त्याच्या पत्नीने त्याला अद्ययावत (Precision) व किंमती टूल्स (Tools) विकण्यास प्रवृत्त केले व त्यासाठी मोठ्या उद्योगधंद्याशी संपर्क करण्यास सांगितले. जाधवने हे पण काम केले पण त्याच्या अपेक्षेप्रमाणे त्याला त्यात यश मिळाले नाही.

शेवटी जाधवने बांधकामदारांना (बिल्डर्सना) मोठ्या प्रमाणात

लोखंडी सळी, सिमेंट, रेती आणि विटा ह्यांचा पुरवठा करण्याचे ठरविले. जोपर्यंत प्रकल्प (Project) व्यवस्थित चालू होते तोपर्यंत जाधवला त्याची देणी व्यवस्थित मिळून त्यात फायदा होत होता. प्रकल्पकाम पुर्ण झाल्यावर जाधवला त्याने बिल्डरला पुरवठा केलेल्या शेवटच्या मालाचे पैसे मिळाले नाहीत.जाधवने कायदेशीर व बेकादेशीर मार्गाने त्यांचे पैसे मिळविण्यासाठी प्रयत्न करून पाहिले. परंतु बिल्डर हा अत्यंत मजबूत होता. शेवटी जाधवला त्याच्या माल पुरवठा करणाऱ्यांची देणी देण्यासाठी स्वतःचा फ्लॅट विकावा लागला. येथे गाढवाच्या ऐवजी जाधव त्याची स्वतःचा फ्लॅट व संपत्ति गमावून बसला.

- यशस्वी होण्यासाठी तुम्हाला स्वतःचा खंबीर निर्णय घेता आला पाहिजे व कोणीही काहीही टीका केली तरीही त्यावर दृढ राहिले पाहिजे. मते ही धरतीवर मिळणारी सर्वात स्वस्त वस्तू आहे. जे लोक मते स्विकारतात, त्यांच्याचसाठी मतांचा पुष्कळ साठा लोकांकडे असतो. जर तुम्ही दुसऱ्यांच्या टीकेमुळे वा मतप्रदर्शनाने प्रभावित झालात आणि स्वतःचा निर्णय बदललात, तर तुम्ही आयुष्यात कधीही यशस्वी होणार नाही व तुम्हाला तुमचे ध्येय प्राप्त होणार नाही.

- या जगातील सर्व यशस्वी माणसांना स्वतःचे निर्णय पटकन व खंबीरपणे घेण्याची सवय असते, व त्यांना त्यात जरी बदल करावासा वाटला तरी ते त्यासाठी खूप वेळ घेतात. याउलट सर्व अपयशी व्यक्ति निर्णय घेण्यासाठी खूप वेळ लावतात आणि घेतलेला निर्णय ताबडतोब बदलीही करतात.

**निर्णय कसा घ्यावा? (How to Make a Decision?):**

निर्णय घेण्याच्या प्रक्रियेच्या चार पायऱ्या आहेत.

१) प्रथम आपण समस्येचे बारकाईने स्पष्ट व संपूर्ण पृथ्थकरण केले पाहिजे. उदा. आपण निर्णय का घेतला पाहिजे? किंवा आपण निर्णय न घेतल्यास काय होईल?

२) नंतर आपण त्या गोष्टीबद्दलचे सर्व आकडे व तपशील गोळा केले पाहिजेत. सामान्यतः पुरावे गोळा करताना आपण चुका करतो. एखादया गोष्टीच्या त्याच पैलुवर आपण लक्ष केंद्रित करतो. जी गोष्ट आपली मनोवृत्ति आणि स्वभाव ह्यांना योग्य वाटते. आपल्या विचारांच्या विरूद्ध असलेल्या सर्व आकडेवारी व खऱ्या गोष्टी ह्या आपण नाकारतो. तथापि तज्ञ लोक असे सूचित करतात की, आपण या भावनेने प्रामाणिकपणे त्या गोष्टी केल्या पाहिजेत जणू काही दुसऱ्यासाठी करीत आहोत. डेल कार्नेग सांगतो, 'जर माणसाने त्याचा वेळ हा सत्य निःपक्षपातीपणाने शोधण्यात खर्च केला तर ज्ञानाच्या प्रकाशाच्या शोधात त्याच्या सर्व चिंता मिटतील.'

३) तिसरी पायरी म्हणजे आपण शक्य असलेले सर्व उपाय लिहून काढले पाहिजेत.

४) चौथ्या पायरीमध्ये आपण शक्य तो उत्तम उपाय निवडला पाहिजे व मागे वळून न पाहाता त्याची अंमलबजावणी करण्यास सुरुवात केली पाहिजे.

## काही भाष्ये (Few comments)

१) एखाद्या प्रश्नाचा ठराविक मर्यादेच्या पलीकडे विचार करतांना जास्त गोंधळ व काळजी उत्पन्न होते. अशी एक वेळ येते जेव्हा जास्त तपास व विचार करणे हे अपायकारक आहे. काही ठराविक काळानंतर आपण निश्चित निर्णय घेऊन पुढे गेले पाहिजे व परत मागे वळून बघता कामा नये.

२) प्रत्यक्षात कोणीही वरील चार पायऱ्यांचे आचरण करतो का?

फक्त मोजके आणि यशस्वी लोक ह्या चार पायऱ्यांचा वापर करतात. सामान्य माणसाला इतकी सहनशीलता नसते. पण प्रत्यक्षात चांगली व्याख्या केलेला प्रश्न हा अर्धा सोडवला जातो व चांगले चित्र हे १०००० शब्दांपेक्षाही जास्त प्रभावीपणे स्पष्ट करते. समस्या लिहून काढणे व त्याच्या उत्तरावर विचार करणे हा पद्धतशीर व

सरळमार्ग आहे. मन हे वारंवार त्याच चिंता करीत नाही व निर्णय हा जास्त स्पष्टपणे, अचूक व पटकन घेतला जातो.

३) जर आपण नियमांचे योग्य पालन केले, तर आपला निर्णय नेहमीच बरोबर असेल काय?

उत्तर नाही असे आहे. निर्णय हा नेहमीच बरोबर असेल अशी कुठलीही गुरूकिल्ली नाही. तथापि जर आपण समस्येचे पृथ्थकरण केले, त्यावर शक्य असणाऱ्या निरनिराळ्या उपायांचा विचार केला, एकाची निवड करून त्याचा योग्यरितीने अंमल केला, तर जरी आपला निर्णय चुकीचा असला, तरी आपणास त्यापासून चांगला अनुभव मिळतो. पुढीलवेळी निर्णय घेताना आपण जास्त समंजस होतो. जीवन ही सतत शिकण्याची प्रक्रिया आहे. कुणीही हा परिपूर्ण म्हणून जन्माला आलेला नाही. आपले चुकीचे निर्णय आणि कडू अनुभव ह्यामुळे आपल्यामध्ये नेहमी सुधारणा होत राहाते.

४) म्हणून प्रत्येक परिस्थितीत जेव्हा घटना ह्या आपल्या कल्याणासंबंधी असतात. तेव्हा निर्णय हा आपला स्वतःचा व वैयक्तिक असावा. आपण इतरांकडून सल्ला घेतला पाहिजे. पण आपल्या कल्याणासाठी जो निर्णय योग्य वाटतो तोच निर्णय आपण स्वत: घेतला पाहिजे. आपण खंबीरपणे आपला निर्णय घेऊन पुढे गेले पाहिजे.

- काही म्हणी आहेत ज्या ध्यानात ठेवण्यासारख्या आहेत.

'त्यांनाच यश मिळते जे हिंमत करतात व धडपड करतात.'

"Success is for those who dare and struggle for it".

'तुमचे काम उत्कृष्टपणे करा व बाकी सर्व परमेश्वरावर सोडून द्या.'

"Do your duty best and leave the rest for god".

'ईश्वराला धैर्यवान लोक आवडतात.'

"God likes courageous people".

'जे स्वतःला मदत करतात त्यांनाच ईश्वर मदत करतो.'

"God helps those who help themselve".

## काही महत्त्वाचे निर्णय (Few Crucial Decisions)

प्रत्येकाला आपल्या आयुष्यात पुढील महत्त्वाचे निर्णय घ्यावे लागतात.

१) शिक्षण (Education)

२) विवाह (Marriage)

३) व्यावसायिक भागिदारी (Business partnership)

## शिक्षण (Education):

ईश्वराने ह्या जगात प्रत्येकाला काही विशिष्ट हेतूने निर्माण केले आहे व त्यांच्या हेतूप्रमाणे त्यांना खास योग्यता दिल्या आहेत. उदा. घोडा हा माणसाला पाठीवर घेऊन लांब अंतरापर्यंत जलदगतीने धावू शकतो. बैल हा तासनतास ओझे खेचू शकतो. उंट हा वाळवंटात पाण्याशिवाय पुष्कळ दिवस प्रवास करू शकतो.

त्याचप्रमाणे ह्या जगात प्रत्येक मानवाने आपली योग्यता लक्षात घेऊन ईश्वराने कोणत्या उद्देशाने आपली निर्मिती केली याचा शोध घेतला पाहिजे, व आपली योग्यता व कर्तव्यनिष्ठेने आपला स्वत:चा व्यवसाय निवडला पाहिजे.

बालपणापासूनच माणसाचा स्वभाव स्पष्टपणे दिसून येतो. पालकांनी सकारात्मक रीतीने त्याची जोपासना करावी. आपल्या स्वतःच्या इच्छा आणि आवडीनिवडी मुलावर लादू नयेत.

जर पालकांना असे आढळून आले की मुलाचे मन हे तांत्रिक (Technical) आहे किंवा तो अभ्यासू वा बडबड्या वा नाटकी आहे व जर मुलाला सुद्धा त्याच्या आवडीनुसार शिक्षण घ्यावेसे वाटते. उदा. अभियांत्रिकी (Engineering), संशोधन (Research), अभिनय(Acting) अथवा जाहिरातक्षेत्र (Advertisement) इत्यादि. तर पालक व बालक दोघांनीही परिस्थितीचे सूक्ष्म परिक्षण केले पाहिजे, व्यवसाय मार्गदर्शन मिळविले पाहिजे व ज्यामध्ये नकारात्मक भाग काही नसेल, तर मुलाला त्याच्या किंवा तिच्या आवडीप्रमाणे शिक्षण दिले गेले पाहिजे.

या पहिल्या निर्णयात पालक व बालक दोन्ही सहभागी आहेत. या दोघांनी घेतलेल्या चुकिच्या निर्णयामुळे बालकाचे करिअर(Carrier) संपते.

## विवाह (Marriage):

विवाहाचे महत्त्व (Importance of Marriage):

- ईश्वर सांगतो,

*'मी स्त्री आणि पुरुष ह्यांना एकमेकांचा पोषाख किंवा वस्त्र म्हणून निर्माण केले आहे.'* (पवित्र कुराण २:१८७)

- दुसऱ्या एका ठिकाणी ईश्वर, असे सांगतो,

'*त्याने तुमच्या दरम्यान प्रेम आणि दया उत्पन्न केली.'* (पवित्र कुराण ३०:२१)

- अंतिम प्रेषित (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) यांनी असे सांगितले,

*'विवाह हा नजरा खाली ठेवतो आणि व्यभिचारापासून रक्षण करता* (हदिस)

त्यांनी पुढे असेही सांगितले,

*'वैवाहिक जीवन हीच माझी जीवनशैली आहे.'* (हदिस)

पैगंबरांनी ब्रह्मचर्याला बंदी घातली आहे.

- हिंदूचे अलौकिक पुस्तक सांगते,

*'चांगली पत्नी हा परमेश्वराने दिलेला सर्वात उत्तम आशीर्वाद आहे.'*

- वरील सर्व स्वर्गीय श्लोक विवाहाचे महत्त्व सूचित करतात.
- नेपोलियन हिल्स म्हणतो,'पुरुष जे काही करतो ते फक्त स्त्रीला खूष करण्यासाठी'

उदा. एखादा अविवाहित पुरुष चांगले घर वा उत्कृष्ट गाडी मिळवितो. कारण त्याच्या मैत्रिणीवर प्रभाव टाकण्यासाठी तो इच्छुक

असतो. विवाहित माणूस हा जास्तीत जास्त पैसा मिळवून त्याचे राहाणीमान उच्च करण्याचा व विशेषतः त्याच्या प्रेमळ पत्नीला खूष ठेवण्याचा प्रयत्न करतो. ही विरूद्धलिंगी व्यक्तीला खूष करण्याची गरज ही माणसाला व्यवसायात पैसे मिळविण्यासाठी व जीवनाच्या प्रत्येक मार्गावर अग्रेसर राहाण्यासाठी प्रवृत्त करते.

याउलट जर वैवाहिक जीवनात कटुता असेल तर पहिली गोष्ट म्हणजे श्रेष्ठ बनण्याची प्रेरणाशक्ति कमी होते. अयोग्य जोडीदार किंवा विवाहामुळे मनुष्याचे नीतिधैर्य पूर्णपणे खचते. अशा स्पर्धात्मक जगात सर्वश्रेष्ठ व्यक्तिच तग धरू शकते, तिथे मनाने खचून गेलेली व्यक्ति मानसिक स्वास्थाशिवाय कशी श्रेष्ठ बनेल?

म्हणून जीवनातील तसेच विशेषत: व्यवसायातील अपयश ह्यांचे अत्यंत महत्त्वाचे कारण म्हणजे वैवाहिक जीवनातील अपयश.

## विवाहातील जरूरी असणाऱ्या गोष्टी

- लग्नाची पहिली जरूरी असणारी गोष्ट म्हणजे दोन्ही जोडीदारांनी एकमेकांना पसंत केले पाहिजे.

अंतिम संदेशवाहकाने (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) सांगितले,

*'विवाहामध्ये वधू आणि वर ह्या दोघांची एकमेकांबद्दल आवड व इच्छा असणे अत्यंत जरूरी आहे.'*

पवित्र कुराणात ईश्वर सांगतो,

*सत्कर्मी लोक ईश्वराची प्रार्थना अशा शब्दात करतात, 'हे आमच्या पालनकर्त्या! आम्हाला आमच्या पत्नी व संततीपासून नेत्रसुख प्रदान कर आणि आम्हाला सत्कर्मी लोकांचा नेता (मार्गदर्शक) बनव.*

(पवित्र कुराण २५ : ७४)

जेव्हा नवरा व बायको एकमेकांकडे पाहातात तेव्हा त्यांना आनंद वाटला पाहिजे. ही विवाह व व्यावसायिक आयुष्यातील यशाची पहिली गरज आहे.

• आयुष्याचा जोडीदार निवडतांना दुसरी अतिशय महत्त्वाची गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे की, ती म्हणजे विरूद्धलिंगी व्यक्तीची कौटुंबिक पार्श्वभूमी. कारण “As the twig is bent, so the tree will be.”

कुटुंब संस्कृति ही व्यक्तीच्या स्वभावात घट्टपणे रुतलेली असते. धार्मिक, सहनशील, उत्साही, आशावादी व शिक्षणसंस्कृतीमध्ये जन्माला आलेले व मोठे झालेले मूलं त्यांचा वारसा घेईल. जर तुम्हाला अशी संस्कृति तुमच्या घरात हवी असेल तर त्याप्रमाणे जीवनसाथीची निवड करा.

चेहऱ्याचे आकर्षण, समागमाची उत्कंठता व प्रेमाची नैसर्गिक भावना यांच्यामुळे काहीवेळा लोक घाईघाईत निर्णय घेतात व अयोग्य जोडीदाराची निवड करतात व असे गृहित धरतात की तो (किंवा ती) ही त्याच्या (किंवा तिच्या) सुंदर दिसण्याप्रमाणे सुसंस्कृत असेल. पण असे कधीही घडत नाही. कारण गुलाबाचे फूल हे निवडुंगाच्या झाडावर कधीच उमलत नाही. याचप्रमाणे वाईट कौटुंबिक पार्श्वभूमीतून निवड केलेली व्यक्ति कधीही योग्य ठरत नाही. प्रेमाची भावना व अंतःकरण ह्या दोन्ही गोष्टी विवाहामध्ये अत्यंत जरुरीच्या आहेत ह्याबद्दल वादच नाही. तथापि बुद्धिकडे दुर्लक्ष होता कामा नये किंवा घाईचा निर्णय हा कधीही शहाणपणाचा नसतो.

• व्यक्तिगत आयुष्यातील पहिला महत्वाचा निर्णय म्हणजे शिक्षण. दुसरा निर्णय म्हणजे लग्न. म्हणून लग्नाचा निर्णय घेताना खालील गोष्टी ध्यानात ठेवा.

१) विरूद्ध बाजूकडे नीट लक्ष द्या. तो किंवा ती ह्यांना आकर्षक व्यक्तिमत्त्व असले पाहिजे किंवा कमीतकमी स्वीकार करण्याइतके तरी व्यक्तिमत्त्व असावयास हवे.

२) त्यांच्या कौटुंबिक पार्श्वभूमिची खरी माहिती मिळवा.

३) चारित्र्य आणि शिक्षण ह्यांच्याबद्दल खरी माहिती मिळवा.

४) तुमचे कुटुंबिय आणि मित्र ह्यांच्या आग्रहाखाली दबावाला

बळी पडू नका. तुमचा तर्कशुद्ध आणि खंबीर निर्णय घ्या आणि आनंदी जीवनाची वाटचाल करण्यास सुरुवात करा.

- विवाह करण्यासाठी उत्कृष्ट काळ म्हणजे २५ वर्ष. ३० वर्षाच्या पुढे उशीर होता कामा नये. कारण जेव्हा तुम्ही ५० किंवा ५५ वर्षाचे होता, तेव्हा तुमच्या मुलाबाळाची शिक्षणे पुरी होऊन त्यांनी उद्योगधंद्यात धोका पत्करण्यास सुरुवात केली असली पाहिजे. वयाच्या ५५ ते ६० वर्षामध्ये तुम्ही त्यांच्यावर अवलंबून राहाणार नाही व तुम्ही त्यांच्या व्यवसायात त्यांना मार्गदर्शन व प्रोत्साहन देत असाल.

या उलट जेव्हा तुमच्या निवृत्तिच्या वेळी तुमच्या मुलाचे शिक्षण पूर्ण होते, तेव्हा तुम्ही त्यांच्यावर अवलंबून राहू लागता. अशावेळी तुम्ही त्यांना धाडस करण्यास सांगू शकत नाही किंवा मुले तसे करण्यास धजणार नाहीत. ती अत्यंत जागरूक (Over-cautious) बनतात. अति जागरुकता (Over-cautious) हे व्यवसाय करण्याची तीव्र इच्छा मारून टाकते व त्यामुळे मानवाची यशाची संधी बंद होते.

म्हणून २५ वर्षाचे वय असताना विवाह करा. ज्यामुळे जेव्हा तुम्ही ५५ वर्षाचे होता त्यावेळी तुमची मुले ही तरूण असतील.

**तुमच्या भावनाबद्दल सावध राहा (Beaware of your Emotions)**

मानव प्राण्याला निराश होणे, उदासिनता, राग, भीतिपोटी स्वतःवरील ताबा जाणे (घेरी येणे) किंवा प्रेम अशा अनेक प्रकारच्या भावना असतात. ह्या भावना म्हणजे त्रूटी किंवा कमजोरपणा नसून त्या मानवजातीच्या अस्तित्वासाठी व धडधाकटपणासाठी आवश्यक आहेत. जर एखादा ह्या भावनांच्या प्रभावाखाली चुकीचा निर्णय घेत असेल, तर तो त्याचा स्वतःचा दोष असून मानवजातीच्या स्वभावाचा दोष नाही.

उदा. एखाद्याने अत्यंत रागाच्या भरात दुसऱ्याचा जीव घेतला, तर मी शुद्धिवर नव्हतो असे सांगुन तो स्वत:ची सुटका करून घेऊ

शकत नाही. त्याला त्याच्या गुन्ह्याबद्दल शिक्षा ही झालीच पाहिजे. कारण तो त्याच्या भावनेवर (येथे रागावर) नियंत्रण ठेवू शकला नाही ही त्याची चूक आहे.

तसेच एखाद्याने विवाहाबाबत किंवा व्यवसायात भागीदारी करणे किंवा तोडणे, इत्यादि बाबत चुकीचा निर्णय घेतला. तर तो भावनेला जबाबदार ठरवू शकत नाही. तो त्याचा दोष आहे कारण तो भावनांवर ताबा ठेवू शकला नाही. तो निष्काळजी राहिला म्हणून भावनांनी त्याच्यावर कुरघोडी केली.

**आपण आपल्या भावना समजून घेऊ या**

**(Let us understand our Emotions)**

• समजा, एक जोडपे हे अश्मयुगात त्यांच्या गुहेबाहेर हिंडत होते. अचानकपणे लांडग्याच्या कळपाने त्यांच्यावर हल्ला केला. त्यांना प्रतिकार करतांना पुरुष हा मरण पावला. स्त्रीला सुटका करून घेण्याची संधि मिळाली म्हणून ती वाचली. जेव्हा तिला समजले की, तिचा प्रियकर हा मृत झाला आहे. तेव्हा ती इतकी गर्भगळीत उदास व दुःखी झाली की, बरेच दिवस ती त्या गुहेच्या कोपऱ्यात स्वतःला कोंडून घेऊन बसली.

त्या लांडग्याच्या कळपाने माणसाच्या मांसाच्या मेजवानीचा आनंद घेतला, दुसऱ्या भक्ष्यासाठी काही दिवस वाट पहात राहिले आणि कळप मग पुढे निघून गेला. जर ती स्त्री गर्भगळीत होऊन त्या भावनेच्या पूर्णपणे आधीन झाली नसती व तिने स्वतःला गुहेच्या कोपऱ्यात कोंडून घेतले नसते, तर ती सुद्धा लांडग्यांकडून मारली गेली असती. ह्या गर्भगळीत भावनेमुळेच तिचे प्राण वाचले.

• नंतर ती स्त्री दुसऱ्या टारझनच्या शोधात होती, एकाएकी एक गोरिला माकड टारझनच्या बदली आले. ती इतकी घाबरली की तिचा स्वतःवरचा ताबा सुटून ती पुतळ्यासारखी स्तब्ध उभी राहिली किंवा तिला चक्कर आली. तिच्या शांत आणि काही हालचाल

न आल्यामुळे गोरिलाचे तिच्याकडे लक्ष गेले नाही व तिला काहीही इजा न करता गोरिला माकड निघून गेले.

भितीमुळे चक्कर येणे किंवा हालचालीशिवाय राहाणे ह्यामुळे तिचा जीव वाचला.

- ती स्त्री नशीब घेऊनच बहुतेक जन्माला आली होती. दुसऱ्या साथीदाराचा शोध घेताना तिला अश्मयुगातील जेम्स बाँड भेटला. जेव्हा जेम्स नेहमीप्रमाणे स्त्रीवर प्रेम करीत असतांना दुसऱ्या एका लांडग्याच्या कळपाने त्यांच्यावर आक्रमण केले. अयोग्यवेळी प्रेमक्रीडेमध्ये विघ्न आले म्हणून त्या दोघांचाही राग उफाळून आला. दोघांनीही लांडग्यांशी लढाई केली. रागाच्या भरात माणसाची शक्ति ही दुप्पट होते. म्हणून दोघांनीही खऱ्या नायक आणि नायिका यांच्याप्रमाणे रागाच्या भरात लढा दिला व लांडग्यांना पाठलाग करून दूर पळवून लावले.

यावेळी क्रोध किंवा राग ह्यांमुळे त्यांचे प्राण वाचले.

आपल्या भारत देशांत पारशी जमात राहाते. त्यांनी इराणमधून स्थलांतर केले व सुरूवातीला कच्छ (गुजरात) येथे स्थायिक झाले. सर्वसाधारणपणे हे पारशी लोक प्रामाणिक मेहनती, हुषार, सुशिक्षित, शांतताप्रिय, परिपूर्ण व आर्थिकदृष्ट्या श्रीमंत किंवा उच्च दर्जाचे असतात. तथापि शतकानुशतके ते एक चूक करीत आले आहेत. ते त्यांच्याच जमातीत विवाह करतात त्यामुळे त्यांच्या रोगसंरक्षण शक्तिवर परिणाम झाला आहे. म्हातारपणी इतर भारतीयांपेक्षा त्यांची अधोगती लवकर होते.

ही मानवी जातीची अधोगती टाळण्यासाठी ईश्वराने प्रेमाच्या भावनेची निर्मिती केली. या भावनेच्या प्रभावाखाली माणूस हा मानसिकरित्या आंधळा बनतो. माणूस हा विरुद्धलिंगी व्यक्तीवर इतके उत्कट प्रेम करतो की ते बंड करून उठतात. ते एकमेकांचा कमीपणा वा दोष ह्याकडे काणाडोळा करतात व समागमाने मिलन होण्यासाठी कुठल्याही मार्गाचा अवलंब करतात. ह्या प्रेमाच्या भावनेमुळेच

मानवजात ही अस्तित्वात राहाते, पसरते आणि शारीरिकदृष्ट्या तंदुरुस्त राहाते.

जर लोक प्रेमभावनेने मनाने आंधळे झाले नाही व त्यांच्या विरूद्ध पक्षाच्या प्रत्येक छोट्या मोठ्या गोष्टीचा मनाने तर्कशुद्ध विचार करू लागले, तर ते त्यांच्या मातेच्या निवडीप्रमाणे आपल्याच जातीत विवाह करतात. जे पारशी लोकांच्या बाबतीत घडले तसेच संपूर्ण मानवजातीसाठी घडु शकेल. म्हणजेच म्हातारपणी अनियमित अधोगती.

प्रेमाची भावना ही वाईट नाही. ती मानवजातीच्या अस्तित्वासाठीही उपयोगी आहे. ईश्वर ज्याने प्रेमाची नियमावली (Love Software) तयार केले आहे, त्याने व त्यामुळे मानवजात ही मागे पडणार नाही व भावनेच्या जाळ्यात अडकून बसणार नाही. याची काळजी कशी घ्यावी ह्याचेही वर्णन केले आहे.

ईश्वर कुराणामध्ये सांगतो,'

*हे पैगंबर (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) श्रद्धावंत पुरूषांना (स्त्रियांनाही) सांगा कि त्यांनी आपल्या दृष्टीची जपणुक करावी.*
(पवित्र कुराण २४ : ३०-३१)

ह्याचा अर्थ असा आहे कि विरुद्धलिंगी व्यक्तीवरती नजर रोखू नका.

*पवित्र ऋग्वेदात सांगितले आहे, 'ईश्वराने तुम्हाला स्त्री बनविले आहे. कोठेही काळजीपूर्वक पाहा. व तुमची नजर खाली ठेवा आणि तुमची पावले एकत्रपणे ठेवा आणि तुमचे शरीर कोणालाही दिसु नये असा पोषाख वापरा.* (ऋग्वेद १९-३३-८)

पवित्र कुराण सांगते,

*'हे नबी* (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम)*आपल्या पत्नी आणि श्रद्धावंताच्या स्त्रियांना सांगा की आपल्या चादरीचे पदर आपणावर आच्छादून ठेवत जा.* (पवित्र कुराण ३३:५९)

विरुद्धलिंगी व्यक्तीला आकर्षित करणारा पोषाख घालणे हाच फक्त सुंदर दिसण्याचा मार्ग नाही. सन्माननीय पोषाख, साधेपणा व ईश्वरावरील निष्ठा ह्यामुळे सुद्धा कोणीही सुंदर बनू शकतो. ईश्वरावर श्रद्धा ठेवण्याचा प्रयत्न करा व विरुद्धलिंगी व्यक्तीशी गैरजरूरी मिसळण्याचे टाळा. ह्यामुळे चुकीच्या व्यक्तींच्या प्रेमात पडण्यापासून आपला बचाव होऊ शकेल.

म्हणून चुकूनसुद्धा विवाहासंबंधी तुम्ही प्रेमभावनेच्या प्रभावाने चुकीचा निर्णय घेतला असल्यास, तुमच्या भावी आयुष्यांतील वैवाहिक जीवन व व्यावसायिक जीवन ह्यांमधील त्रासदायक विवाहामुळे निर्माण होणाऱ्या अपयशास सर्वस्वी तुम्हीच दोषी राहाल. त्यावेळी तुमची प्रेमाची भावना वा नशीब ह्यांना दोषी ठरविण्यात काही स्वारस्य नाही. भावना ह्या मानवजातीच्या सुरक्षितता व भरभराट ह्यांसाठी असतात, तुम्हीच त्यांचा गैरवापर करता.

**भागीदारी (Partnership):**

- जेव्हा २ किंवा त्यापेक्षा जास्त व्यक्तिंच्या भागीदारीतुन एखाद्या नविन कंपनीची सुरूवात होते, तेव्हा कंपनीतील भागीदारांचा एकमेकांवर प्रचंड विश्वास असतो. त्यांचे व्यवसायीक संबधही खुपच चांगले असतात. पण जेव्हा कंपनी प्रचंड प्रमाणात नफा मिळवु लागते, तेव्हा १० पैकी ८ भागीदाऱ्या तुटतात. कारण कंपनीतील भागीदारांचा एकमेकांशी ताळमेळ बसत नाही आणि गैरसमज वाढत जातात. म्हणुन कंपनीत भागीदार व्यक्तींची निवड करताना योग्य ती काळजी घ्या. कारण भागीदारीचा निर्णय हा अतिशय महत्वाचा असतो व तो खूप विचारपुर्वक घेतला पाहिजे.

- आफ्रिकेच्या नदीत असणाऱ्या मगरीपेक्षा उद्योगधंद्यात जास्त मगरी असतात. तुम्ही तरुण असाल आणि जर व्यावसायिक भागीदारीमध्ये एखाद्या वरिष्ठ व्यावसायिकाबरोबर भागीदारी करायची तुमची इच्छा असेल, तर वरिष्ठ भागीदार तुमच्यासारख्या तरुण, उत्साही सुशिक्षित मुलाबरोबर व्यवसाय करण्याची संधी कधीच

सोडणार नाही. कारण जेव्हा धंदा हा चांगला स्थिर होतो व जेव्हा नफा मिळावयास सुरुवात होते. तेव्हा तो वरिष्ठ भागीदार तुम्हाला संपूर्णपणे गिळंकृत करून टाकील. म्हणून शक्यतोवर आपल्यापेक्षा वरिष्ठ आणि प्रौढ व्यक्तिशी भागीदारी करणे टाळा.

- जर तुम्हाला एखाद्याच्या प्रामाणिकपणा आणि सचोटी ह्याबद्दल फाजील आत्मविश्वास असेल आणि तुम्हाला त्याचा भागीदार व्हावयाचे असेल तर त्याच्याबरोबर कायदेशीर करारनामा करा आणि त्यामध्ये उद्योगाची प्रत्येक गोष्ट लिहून काढा. तसेच भागीदारी संपुष्टात आणण्याच्या अटी आणि शर्ती यांचीपण नोंद करून घ्या.

ईश्वर सांगतो,

*जेव्हा तुम्ही एखाद्याबरोबर आर्थिक व्यवहारासंबंधी करारबद्ध होता, त्याची लिखित नोंद करा आणि त्यासाठी दोन साक्षीदार म्हणून दोघांची साक्ष घ्या.'* (पवित्र कुराण २:२८२ सारांश)

कारण जेव्हा पैशाच्या गोष्टींचा संबंध येतो तेव्हा सभ्य आणि प्रामाणिक व्यक्तीसुद्धा स्वार्थी बनतात. दुसरे असे की, माणसाची स्मरणशक्ति ही अत्यंत कमजोर असते. माणसे आपण कोणाचे काय व किती देणे लागतो हे लक्षात ठेवत नाहीत. पण आपणाला किती व काय मिळवायचे आहे हे बरोबर ध्यानात ठेवतात व नफ्यामध्ये सिंहाच्या वाट्यासाठी प्राधान्य देतात.

सभ्यगृहस्थाच्या वचनाची किंमत ही कागदाच्या तुकड्या एवढीही नसते. म्हणून नेहमी तोंडी आश्वासनावर विश्वास ठेवू नका. भागीदारी सुरू करण्यापूर्वी नेहमी लेखी करारनामा करा.

- रॉन हॉलँड ह्या त्याच्या 'Talk and Grow Rich' या पुस्तकामध्ये लक्षाधीश फिल्मी काऊबॉय रॉय रॉजर ह्याच्याबद्दल टिपणी करतो. तो भागीदारी संबंधी पुढीलप्रमाणे सांगतो, ५०:५० टक्के भागीदारीतसुद्धा प्रत्येक भागीदारीने ९० टक्के जबाबदारी स्वीकारण्याची तयारी दाखविली पाहिजे व त्यानुसार काम करून त्याच्या भागीदाराकडून फक्त १०

टक्के कामाची अपेक्षा केली पाहिजे. ह्याला ९०:१० सूत्र असे म्हणतात. हे सूत्र भागीदाऱ्यांच्या दरम्यान एकोपा व समजूतदारपणा निर्माण करते. हे सूत्र कोणत्याही व्यवसायिक भागीदारीत इतकेच काय तर त्रासदायक विवाहातसुद्धा चांगले कामास येते.

हे सूत्र म्हणजे लोकांच्या मनात वारंवार झपाटणाऱ्या विचारांना टाळण्यासाठी व लढा देण्यासाठी योग्य मार्ग आहे. उदा. तो माझ्या इतके कष्ट करून काम का करीत नाही. जेवढे कष्ट मी करतो, जसा मी लवकर येतो तसा तो का येत नाही? तो नवीन लोकांना भेटत का नाही वा नवीन ग्राहक का निर्माण करीत नाही? तो वारंवार रजा का घेतो किंवा घरी लवकर पळतो? मी जशी विक्री करतो तशी विक्री माझा भागीदार का करीत नाही? इत्यादि इत्यादि.

वरील सर्व विचार हे दोन्ही भागीदारांच्या मनात येतात आणि भागीदारी तुटण्यास कारणीभूत होतात. म्हणून दोन्ही भागीदारांनी ९०:१० सूत्र समजून, त्याचे अनुकरण करण्यास तयार व्हावे, व त्या सूत्राची अंमलबजावणी ही दैनंदिन जीवनात यशप्राप्तिसाठी आणि व्यावसायिक भरभराटीचे शिखर सर करण्यासाठी करावी.

स्पष्ट, तर्कशुद्ध, सुविचार, सल्लामसलत आणि दृढ निर्णय हे भागीदारीसारख्या व्यवसायात पुढे जाण्यासाठी अत्यावश्यक आहेत.

## *प्रकरण क्र. २४*

# वाटाघाटींची कला

## (Art of Negotiation)

**विलंबाचा सापळा (Delay Trap):**

आरमारी नोकरीतून सेवानिवृत्त झाल्यावर कॅप्टन गामिनी ह्या अत्यंत सज्जन गृहस्थाने त्याचा उद्योगधंदा हा श्रीलंकेमध्ये चालू करण्याचा निर्णय घेतला. त्याला भारतातून यंत्रसामुग्री खरेदी करावयाची होती. त्यासाठी त्याने श्री. लाखानी ह्या धूर्त व्यावसायिक दलालाशी संपर्क साधला.

कॅप्टन गामिनीची एक नवीनच तऱ्हेचा धंदा करण्याची योजना होती. त्याला नारळाचे तंतू आणि चुरगळलेल्या तंतुमय सूक्ष्म तुकड्यांची निर्यात ही गल्फ आणि मेडिटेरियन देशांना करावयाची होती. तंतूच्या लहान तुकड्यात असा गुणधर्म आहे कि ते जेव्हा वाळुत मिसळतात तेव्हा ते पाणी अडवुन धरतात. त्यामुळे वाळवंटातील निर्जीव जमिनीत हे नारळाचे तंतुमय तुकडे मिसळल्याने व खतांचा मिश्रणात वापर केल्याने त्या निर्जीव जमिनीचे रूपांतर फलधारणा करणाऱ्या सुपीक जमिनीत करता येईल. ह्या लहान तंतुमय तुकड्यांची निर्यात ही सुट्या स्वरुपात करणे अशक्य होते. कारण त्याला जास्त जागा लागत होती. म्हणून कॅप्टन गामिनीला अशा यंत्राची जरूरी होती, कि जे ह्या तुकड्यांचे एका मोठ्या ठोकळ्यात रुपांतर करू शकेल.

श्री. लाखाणीने कॅप्टनला प्रत्येक प्रमाणित (स्टँडर्ड) यंत्र व सामुग्री देऊ केली. पण ते विशिष्ट कॉम्पॅक्टिंग मशीन तो देऊ शकला नाही, ज्या यंत्राचा मी (लेखक) आराखडा (Design) व निर्मिती करतो. त्यासाठी लाखाणीने कॅ. गामिनीची माझ्याशी ओळख करून दिली.

जेव्हा कॅप्टन गामिनी हा भारतामध्ये सर्व यंत्रे आणि सामुग्री ह्यांची ऑर्डरबाबत अंतिम निर्णय घेऊन देण्यासाठी चार दिवसांच्या भेटीवर आला. तेव्हा लाखाणीने त्याचे राजेशाही थाटात स्वागत केले. त्याने पहिल्याच दिवशी कॅप्टनला आपल्या घरी भोजनासाठी नेले. दुसऱ्या दिवशी त्याने गामिनीला मुंबई शहर स्थळदर्शन आणि निरनिराळ्या भेटवस्तू खरेदी करण्यासाठी मदत केली. तिसऱ्या व चौथ्या दिवशी दोघांनी माझ्या विशेष प्रकारच्या यंत्राची संकल्पना व त्याचा आराखडा (Design) समजण्यासाठी तसेच त्यावर चाचण्या आणि किंमत वगैरे गोष्टींच्या वाटाघाटींसाठी माझी भेट घेतली.

त्यांनी माझ्या नफ्यांतील अखेरचा भाग अक्षरशः पिळून घेतला व अत्यंत कमी किंमतीमध्ये माझ्याशी व्यवहार निश्चित केला. तथापि त्या लाखाणीने कॅप्टन गामिनीला जेवण, स्थळदर्शन, वैयक्तिक खरेदी ह्यांमध्ये इतके गुंतवून ठेवले होते. त्यामुळे गामिनीला माझ्याशी वाटाघाटी करण्यास व व्यवहार निश्चित करण्यास फक्त दोनच दिवस मिळाले. लाखाणीने त्याचे नियोजन अशातऱ्हेने केले होते की, कॅप्टन गामिनीने श्रीलंकेला परत जाण्यापूर्वी फक्त एक तास आधी माझ्या मागणीवर (ऑर्डर) सही करून मला आगाऊ रक्कम दिली.

जेव्हा गामिनीला असे आढळून आले की त्याला उशीर होत आहे व त्यामुळे कदाचित त्याचे विमान (Flight) चुकेल तेव्हा लाखाणीने त्याची स्वतःची अंदाजी किंमतीचे निवेदन (Quotation) त्याच्यापुढे ठेवले. कॅ. गामिनी हे विमानतळावर पोहोचण्याच्या घाईगर्दीत होते. कारण जर त्याचे विमान (Flight) चुकले असते तर त्याच्या पूर्वनियोजित कार्यक्रमांनुसार ठरलेल्या दुसऱ्या भेटीवर त्याचा परिणाम झाला

असता. म्हणून ते निवेदनाकडे (Quotation) व लाखाणीच्या देऊ केलेल्या किंमतीकडे लक्ष देऊ शकले नाही. लाखाणीने देऊ केलेल्या किंमती जरी ह्या जास्त आकडे दर्शविणाऱ्या होत्या तरी कॅप्टन गामिनीकडे त्यावर वाटाघाटी करणे व मुंबईतील अन्य पुरवठादारांकडून देकार (ऑफर) मागणे इतका वेळ नव्हता. म्हणून असाहाय्यपणे त्यांनी लाखाणीचा देकार हा वाटाघाटीशिवाय जास्त किंमत असूनसुद्धा सही करून दिला व त्यांनी भारत देशाचा निरोप घेतला.

एक शिष्टाचार म्हणून मी त्याच्याबरोबर टॅक्सीतून विमानतळापर्यंत गेलो होतो, त्यावेळी त्यांनी लाखाणीच्या ऑर्डरवर सही केल्याबद्दल माझ्याजवळ असमाधान व्यक्त केले.

धूर्त आणि फसवणूक करणारा व्यावसायिक व वाटाघाटी करणारा हा धंद्यामध्ये काय करू शकतो ह्याचे हे एक उदाहरण आहे. फुकट गेलेला वेळ व उशीर ह्यामुळे निर्माण झालेली परिस्थितीतून दुसऱ्या बाजूची व्यक्ति ही अक्षरश: सापळ्यात अडकते व त्याला व्यवहारावर सही करण्याशिवाय पर्याय नसतो. म्हणून तुमच्याकडे कुठलाही व्यवहार पक्का करण्यासाठी भरपुर वेळ असला पाहिजे. त्यामुळे जर पहिल्या पार्टीशी तुमच्या वाटाघाटी फिसकटल्या, तर दुसऱ्या अन्य पार्टीशी वाटाघाटी करण्यासाठी पुरेसा वेळ असेल.

## वेळ आणि पैसा गुंतवणुकीचा सापळा(Resources Investment Trap)

श्री. अय्यर ह्यांनी माझ्या अटी व शर्ति मान्य करून मला होस क्रिम्पिंग (Hose Crimping) यंत्राची ऑर्डर दिली. २५ टक्के आगाऊ रक्कम व बाकीची रक्कम यंत्र पोहोचते केल्यावर देण्याची माझी अट होती. यंत्राची ऑर्डर नुसार निर्मिती झाल्यावर तो त्याचा तंत्रज्ञ घेऊन आला व त्याने यंत्राची संपूर्ण तपासणी केली. त्याने काही किरकोळ बदल सुचविले व दोन दिवसांनी येऊन यंत्र घेऊन जाण्यासाठी व उरलेली रक्कम देण्याचे आश्वासन देऊन अय्यर निघून गेले.

मी त्याप्रमाणे यंत्रात बदल केले व ते तपासणी आणि पाठवून

देण्यासाठी तयार ठेवले. मी माझ्या पुरवठादारांना देणी देण्याबाबतच्या काही योजना बनविल्या. व त्यांना २ दिवसांनंतर पेमेंट करण्याचे वचन दिले.

श्री. अय्यर हे दोन दिवसानंतर आले, त्यांनी यंत्राची पुन्हा चाचणी घेऊन त्याचा स्वीकार केला व त्यानंतर बाकी राहिलेल्या रक्कमेच्या फक्त ५० टक्केच रक्कम मला दिली आणि बाकीच्या ५० टक्के रकमेसाठी माझ्याकडे ३० दिवसांची मुदत मागितली.

माझी मनस्थिती एकदम बिघडली कारण मी खूप योजना आखल्या होत्या. इतकेच नव्हे तर माझ्या सर्व माल पुरवठादाऱ्यांना देणी देण्याचे आश्वासन दिले होते. मी ३० दिवसांची मुदत देऊ शकत नव्हतो. किंवा अय्यरने दिलेली ५० टक्के रक्कम परत करण्यास तयार नव्हतो. अखेरीस श्री. अय्यर जिंकला व तो यंत्र हे मुदतीच्या अटीवर घेऊन गेला. शब्द दिल्याप्रमाणे श्री. अय्यरने माझी बाकी राहिलेली रक्कम ३० दिवसाच्या मुदतीनंतर तात्काळ दिली. पण याच परिस्थितीत याआधीही माझे पैसे बऱ्याच लोकांनी लुबाडले आणि माझे आर्थिक नुकसान झाले.

या अवस्थेमध्ये वाटाघाटीं करणाऱ्या व्यक्तिची अशी रणनीती असते कि ती व्यक्ति तुमचा वेळ व शक्ति इतकी खेचून घेतात की, तुम्ही जरी कराराला नकार दिलात तरीसुद्धा तुम्ही हरलात असे तुम्हाला वाटते. ऑर्डर द्यावयाच्या वेळीच जर श्री. अय्यरने ३० दिवसांची सवलत मागितली असती तर मी कधीही त्यासाठी तयार झालो नसतो. पण जेव्हा त्यान माझा वेळ व पैसा हा गुंतवून माझ्याकडे आणखी ३० दिवसांची उधारीची सवलत विचारली त्यावेळी असाहाय्यपणे मला तसे करावे लागले.

म्हणून वाटाघाटी करणाऱ्यांच्या या योजनाबद्ध खेळीपासून सावध राहा व मोठा धोका पत्करण्यापेक्षा काही पैसा व वेळ गमाविण्याची तयारी ठेवा. तसेच मी जसा पुष्कळ पैसा काही वेळा गमावला त्यापासून काहीतरी धडा शिका.

**भावनात्मक सापळा (Emotional Blackmail):**

मैत्री करून उधारीची सवलत मिळविणे आणि नंतर फसवणूक करणे हा आणखी एक भावनात्मक सापळ्याचा प्रकार आहे. या सापळ्यात ग्राहक हा तुम्ही सांगितलेल्या किंमतीमध्ये काहीही घासाघीस न करता खरेदीस तयार होईल व पुरेशी आगाऊ रक्कमही देईल.

नंतर जेव्हा तुम्ही त्याच्या ऑर्डरची प्रक्रिया करीत असता त्यावेळी तो वारंवार भेट देऊन कामाची प्रगति किती आहे ह्याची तपासणी करील व तुमच्याशी चांगली मैत्री करण्याचा प्रयत्न करील. सहजपणे तो तुमच्यावर त्याच्या आर्थिक परिस्थितीचा तसेच, पुढील पुष्कळ ऑर्डर्सची शक्यता व त्याचा व्यवसाय करण्याचा स्वच्छ व प्रामाणिकपणा ह्या गोष्टींचा प्रभाव पाडील.

शेवटी मालाची पाठवणी करते वेळी त्याने तुमच्याशी निर्माण केलेल्या चांगल्या मैत्रीच्या संबंधाच्या आधारावर तो तुम्हाला त्याला काही दिवस वा काही आठवडे उधारीची सवलत द्या अशी मागणी करेल. आणि जर तुम्ही त्याला अशी सवलत दिलीत, तर पुढे तुम्हाला समजून चुकेल हा दोन पायांचा प्राणी किती कपटी आहे व त्याची वागणूक बदलण्यात इतका तरबेज आहे, की रंग बदलणाऱ्या सरड्याशी सुद्धा त्याची तुलना केली जाणार नाही.

म्हणून नव्या गिऱ्हाईकांशी गाढ दोस्ती स्थापन करू नका. कारण तेव्हा तुम्ही अयोग्य प्रस्तावाला नकार देऊ शकत नाही. ऑर्डर नाकारणे व धंदा न करणे हे फसवणूक करणाऱ्यांबरोबर धोका पत्करण्यापेक्षा जास्त चांगले आहे. १९९० ते २००० च्या दरम्यान मला सभ्य गृहस्थांच्या शब्दावर विश्वास ठेवून, उधारीची सवलत दिल्यामुळे ५ लाख रुपयांचा तोटा सहन करावा लागला आणि अजूनही मी काहीवेळा अशा सापळ्यात अडकतो. म्हणून माझ्या चुकांपासून तुम्ही भविष्यात चुका करणार नाही हा तरी बोध घ्या.

## घासाघीस करण्याचा आनंद (The Pleasure of Bargaining):

श्री. पटेल हा आमचा नेहमीचा ग्राहक आणि खूप घासाघीस करणारी व्यक्ति आहे. नवीन यंत्र खरेदी करताना तो प्रत्येकवेळी घासाघीस करतो आणि १० ते १५ टक्के सूट मिळवितो.

एकदा त्याला विशिष्ट प्रकारचा एक खास सुटा भाग (Spare part) पाहिजे होता. मार्केटमधून खरेदी करून व नंतर त्याला विकण्यापेक्षा मी माझा मित्र संजय ह्याला त्या सुट्या भागाच्या सामानाचा कमीत कमी किंमतीत श्री. पटेल यांना पुरवठा कर असे सांगितले. संजयने त्याला बिलासह सामान पाठविले. बिलाची रक्कम देताना पटेल ह्याने १० टक्के सवलत कापून घेतली आणि चेक पाठवून दिला. मला आणि संजयला अत्यंत वाईट वाटले पण आम्ही त्यावर गप्प बसलो. आणखी काही महिन्यानंतर पटेलला पुन्हा दुसऱ्या एका सुट्या भागाची जरुरी भासली. मी संजयला पटेलशी थेट तुझ्याच पद्धतीने व्यवहार कर असे सांगितले. ह्यावेळी संजयने बिलात २५ टक्के जास्त रक्कम वाढवून सामान बिलासह पाठवून दिले. नेहमीप्रमाणे पटेलने १० टक्के सूट कापून बिलाचा चेक संजयकडे पाठवून दिला. या व्यवहारात दोघेही खूष होते. कारण संजयला १५ टक्के नफा मिळाला व पटेलला १० टक्के सूट मिळाली.

बऱ्याच लोकांची सूट वा सवलत मागण्याची मानसिक प्रवृत्ति असते. त्यांना घासाघीस करण्यात आनंद व समाधान मिळते. ते असे समजतात कि पुरवठादाराकडून १० टक्के सूट घेऊन ते त्याच्या नफ्याचे प्रमाण कमी करतात व ते जे सामान खरेदी करतात त्याची किंमत अत्यंत कमी व उत्पादनाच्या किंमती इतकी असते. आपल्या संस्कृतीत बऱ्याच लोकांची ही मनोधारणा आहे. म्हणून तुम्ही कोणतेही उत्पादन व सेवा ह्यांची विक्री करता, त्यावेळी ग्राहकाची मनोवृत्ति नीट लक्षात घ्या आणि तुमची किंमत अशातऱ्हेने सांगा की, त्यांना त्याबद्दल प्रचंड घासाघीस व सूट मिळाल्याचे समाधान व आनंद मिळेल.

## घासाघाशीमधील सावधगिरी (Precautions in Bargaining):

श्री. इफ्तेखार खान हा माझा १९९२ सालापासून मित्र आहे. त्याला माझ्याकडून होझ क्रिम्पिंग (Hose Crimping) मशीन खरेदी करावयाचे होते. त्याला माहित होते की, मी ह्या यंत्राची किंमत २,३४००० रुपये इतकी सांगतो व घासाघाशीनंतर मी त्यावर १० टक्के सूट देतो. तो जेव्हा माझ्या कार्यालयात आला. मी त्याला कॉफी वगैरे देऊन त्याचे स्वागत केले. व त्याने विचारण्याच्या आधीच त्याला यंत्राच्या किंमतीवर १० टक्के सूट देऊन टाकली.

यंत्राची ऑर्डर निश्चित करताना तो त्या यंत्राची किंमत आणि १० टक्के सूट ह्यांवर खूष नव्हता. त्याने माझ्याशी सुमारे एक तासभर वाद घातला. मी त्याला माझे आकारणी शुल्क (Price list) व इतर ग्राहकांच्या ऑर्डरच्या प्रति दाखविल्या. पण तो सहमत झाला नाही व आणखी १० टक्के सवलत पाहिजे ह्यासाठी हट्ट धरून बसला व मला आगाऊ रक्कम दिली. तो केवळ माझा मित्र असल्यामुळे मी यंत्र हे नफा मिळाल्याशिवाय तयार केले व त्याला दिले.

म्हणून तुमच्याकडून नेहमी संपूर्ण सूट देण्याचा वेडेपणा कधीही करू नका. घासाघीस करताना सुरूवातीला फक्त २ ते २.५ टक्के सूट द्या व ग्राहकाला तुमची कशी पिळवणूक केली ह्याचे समाधान व आनंद उपभोगू द्या. त्याला तुमचा नफा कमी करीत करीत तसेच जास्त सूट मिळाली असे वाटू द्या. अन्यथा कोणतीही कमीत कमी किंमत त्याचे समाधान करू शकणार नाही.

## उत्पादनाची किंमत ठरविणे (Pricing the Product):

सुप्रसिद्ध पादत्राणे (Shoe making) कंपन्या ह्या भारतात बऱ्याचवेळी ४९.९९ रुपये किंवा ९९.९९ रुपये अशा किंमतीची लेबले चपलांवर लावतात. त्याचप्रमाणे वैयक्तिक संगणक (पर्सनल कॉम्प्युटर) एअर कंडिशनर, मोबाईल, टी.व्ही. इत्यादि ह्यांच्यावर पुढच्या पूर्ण अंकापेक्षा अगदी कमी किंमत दर्शविणारी किंमतीची लेबले असतात ते फक्त एक पैसा किंवा रुपये कमी का करतात? आपल्याला असे

वाटते का त्यांनी अचुकपणे किंमतीचा हिशेब केलेली व त्यावर अगदी कमीत-कमी किंमत ठेवलेली आहे? तसेच पुर्ण आकडा करण्यासाठी एखादा पैसा वाढवणे त्यांना परवडत नाही? पण तसे अजिबात नाही.

वस्तूची किंमत हीदेखील ग्राहकाला मानसिक समाधान देण्यासाठी निश्चित केलेली असते. साधारणपणे एखादी वस्तू ही बाजारात १०० रुपये किंमतीला उपलब्ध असेल, तर प्रत्यक्षात ती वस्तू बनविण्याची किंमत ही ३० रु. ते ३५ रुपये असते. बाकीची ७० ते ६५ रुपये किंमत ही जाहिरात, मुख्य दलाल, उपदलाल, साठा करणारा, किरकोळ विक्रेता इत्यादीचा नफा असतो.

वस्तूची वा उत्पादनाची किंमत अशा तऱ्हेने ठरविली जाते की, ती जरी जास्त वाटली तरी ती काटकसरीची दिसते व ती असा आभास निर्माण करते की, ती कमीत कमी व अचूकपणे हिशेब करून ठरविली गेली आहे. जर तुम्ही विक्री करीत असाल तर आकर्षक किंमत बनविण्याची कला शिका आणि जर तुम्ही खरेदीदार असाल तर कोणताही आकडा पाहून भुलून जाऊ नका. निरनिराळ्या स्पर्धकांच्या किंमतीची तुलना करा. वाटाघाटी करा आणि शेवटी निर्णय घ्या.

**प्रकरण क्र. २५**

# सोप्या विक्रीची रहस्ये

## (The Secrets of Easy Sales)

चांगली विक्री ही यशस्वी व्यवसायाची गुरुकिल्ली आहे. चांगला विक्रेता होण्यासाठी ग्राहकासंबंधात खुप गोष्टी व आकडेवारी माहित असणे व लक्षात ठेवणे गरजेचे आहे. तसेच विक्रीचे तत्त्व माहित असावे लागते व त्याप्रमाणे तुमची वृत्ति बदलावी लागते.

**ग्राहक आणि विक्री तत्त्वज्ञान ह्याबाबतची माहिती -:**

**१)** ग्राहक हा लूटमार करण्याची एक संधि किंवा पैसे उकळण्याचे एक साधन ह्या नजरेने पाहिला जाऊ नये. ज्याच्यामुळे तुम्हाला भरभराट प्राप्त होणार आहे, अशी व्यक्ति म्हणून ग्राहकाला मान दिला पाहिजे. प्रत्येक व्यवहाराबरोबर तुम्हा दोघांचाही फायदा झाला पाहिजे.

**२)** तुमचे उत्पादन वा माल वापरल्यानंतर, तसेच तुमची सेवावृत्ति किंवा कल्पना ह्यांच्यामुळे प्रत्यक्षात गिऱ्हाईकाला तुमच्याकडून जी काही चांगली भावना आणि फायदा प्राप्त होतो, गिऱ्हाईक ह्यांचीच खरेदी करतो. अन्यथा ग्राहकाला तुमच्याबद्दल काडीमात्रही आस्था नसते. म्हणून चांगल्या विक्रीसाठी तुमचे उत्पादन वापरल्यानंतर गिऱ्हाईकाला जो काही फायदा आणि चांगली भावना प्राप्त होते त्या गोष्टी ठळकपणे मांडल्या पाहिजेत.

**३)** लोकांना स्वत: खरेदी करायला आवडते, पण त्यांना जबरदस्ती खरेदी करण्यास भाग पाडणाऱ्यांची चीड येते, ते स्वत:हुन खरेदी करण्यास उत्सुक असतात. उदा. (लोक विक्रेत्याकडुन वस्तु खरेदी करण्यापेक्षा मॉलमध्ये जाऊन खरेदी करण्यास उत्सुक असतात.) म्हणुन सर्वप्रथम तुम्हाला व अन्य लोकांना खरेदी करायला कसे आवडेल हे नीट समजून घ्या.

**४)** तुमच्या मनातील विचारांचे प्रत्यक्षात रुपांतर होईल. म्हणून तुमची वृत्ति ही सकारात्मक तसेच तुमची कल्पनाशक्तीही होकारार्थी वाटाघाटीची आणि व्यवहार पूर्ण करणारी ठेवा. तरच तुम्ही मनात कल्पना केल्या असतील त्याप्रमाणे प्रसंग घडून येण्याची शक्यता आहे. तसेच जर तुमच्या मनात गिऱ्हाईक नकार देईल, अशी शंका व संशय असेल तर तसाच नकार हा घडुन येईल.

विक्री आणि विक्रीचे शास्त्र आणि कला हा एक मोठा विषय आहे. ह्या विषयावर पुष्कळ डिप्लोमा आणि डिग्री कोर्सेस आहेत. ह्या विषयाचा थोड्या पानामध्ये सारांश होणार नाही. खाली आम्ही वेळोवेळी चाचणी घेतलेल्या पद्धति आणि तत्त्वे ह्यांची ओळख आपणास करून देत आहोत.

## विक्रीपूर्वीचे नियोजन (Pre-Sales-Planning):

**१)** एखाद्या गिऱ्हाईकाकडे विक्रेता म्हणून संपर्क करण्यापूर्वी त्याच्याबद्दल जास्तीतजास्त तपशील मिळविण्याचा प्रयत्न करा.

**२)** त्याच्या गरजांबद्दल जास्त माहिती गोळा करण्याचा प्रयत्न करा.

**३)** व्यवहार पक्का होण्यापुर्वीच ग्राहकांनी तुमचे उत्स्फुर्त स्वागत केले, सकारात्मक आणि मैत्रीपुर्ण वातावरणात वाटाघाटी होत आहेत, आणि दोघांनाही फायदा होईल असा व्यवहार होत आहे. या सर्व घटना घडण्यापुर्वीच असे कल्पनारूपी चित्र स्वयंसुचनेद्वारे मनात उभे करा.

४) तुमचे उत्पादन आणि सेवा ह्याबद्दल पूर्ण ज्ञान असू द्या.

**विक्रीची पद्धत (The Selling Process)**

१) चांगल्या निरोगी व्यक्तिमत्त्वासाठी योग्य व आकर्षक पोषाख करा.

२) स्वयंसूचनेप्रमाणे पूर्वतयारी करून ग्राहकाला सकारात्मक वृत्तीने भेटा.

३) त्यांच्या गरजांबाबत विचारा आणि त्यांचे म्हणणे नीट ऐकून घ्या.

४) पूर्वीच्या पुरवठादारांकडून त्याला काय मिळाले नाही? त्याची तुमच्याकडून काय अपेक्षा आहे? या गोष्टी ग्राहकाला विचारून त्यांच्या समस्या काळजीपूर्वक समजून घ्या.

५) गिऱ्हाईकाच्या मनातील स्पंदनलहरींचा नीट अभ्यास करा. (उदा. त्याचा लहरीपणा, मनस्थिती, बोलावयाची रीत, विचार, बसायची तऱ्हा, त्याची प्रवृत्ति इत्यादि) त्याला विरोध न करता त्याच्या स्पंदनाबरोबर सुखशांतिने वागण्याचा तुम्ही प्रयत्न करा.

६) प्रामाणिकपणे ग्राहकाच्या समस्या सोडविण्याचा प्रयत्न करा. आपण खरेदी करत आहोत हा निर्णय माझा स्वतःचा आहे, अशी भावना गिऱ्हाईकाच्या हृदयात काळजीपूर्वक, तर्कशुद्ध व मोठ्या कुशलतेने निर्माण करण्याचा प्रयत्न करा आणि अशीही भावना गिऱ्हाईकाच्या हृदयात निर्माण करा की, तुम्ही तुमच्या उत्पादनाची विक्री व्हावी म्हणून सारखे पुढे पुढे करीत नाही. तुमचे उत्पादन (वा माल) खरेदी केल्यावर व त्यानंतरची मिळणारी सेवा त्यामुळे गिऱ्हाईकांचा फायदा होईल व त्याला अत्यंत बरे वाटेल. (लोकांना स्वत: खरेदी करायला आवडते, पण त्यांना जबरदस्ती खरेदी करण्यास भाग पाडणाऱ्यांची चीड येते, ते स्वत:हुन खरेदी करण्यास उत्सुक असतात.)

संपूर्ण व्यवहारात तुमची वृत्ति ही अशी ठेवा, कि सर्वप्रथम गिऱ्हाईकाला काय हवे ते त्याला मिळाले पाहिजे, त्यानंतर तुम्हाला जे पाहिजे आहे ते आपोआप मिळेल (नफा).

७) जर तुम्ही गिऱ्हाईकाची समस्या सोडवू शकला नाहीत, तर त्याची समस्या कशी सोडविली जाईल, ते ठिकाण किंवा त्याचा पत्ता द्या.

८) जर ग्राहकाने तुमची निवड करून तुमच्याशीच व्यवहार करावयाची इच्छा दर्शविली असेल, तर त्याच्या निर्णयाची स्तुति करा, त्याला अजिबात नुकसान होणार नाही अशी खात्री द्या. तसेच तुमचा उत्कृष्ट दर्जेदार माल व तत्पर सेवा ह्यांचीही खात्री द्या व प्रत्यक्षात त्याची अंमलबजावणीही करा. तुम्ही एकावेळी एखाद्याला फसवू शकता पण प्रत्येकवेळी प्रत्येकाला फसवू शकणार नाही. हे जग फार लहान जागा आहे व तुम्ही तुमच्या प्रामाणिकपणाबद्दल या जगात सर्वांना माहिती व्हाल, म्हणून कधीही --- कधीही ---- कधीही कोणाची फसवणूक करू नका.

) मालाची ऑर्डर किंवा पुरवठा हा प्रत्यक्षात सादर करतांना पारदर्शकता ठेवा. कारण एखादा लहानसा गैरसमजदेखील तुमचे गिऱ्हाईकाशी संबंध बिघडून टाकील. म्हणुन तुमच्यातील आणि गिऱ्हाईकांतील करारनामा हा नीट लिहून काढा व त्यामध्ये कराराच्या सर्व अटी ठळक व पूर्णपणे स्पष्ट करा. उदा. पेमेंट देण्याची पद्धत, Guarantee/Warrantee, कामाची व्याप्ति, पुरवठा करण्याचा कालावधि, वेष्टन (पॅकिंग), forwarding and commission etc.

**विक्रीनंतर (After-Sales):**

१) तुमचा माल खरेदी केल्यानंतर व त्याच्याबरोबर मिळणारी सेवा ह्याबद्दल तुमच्या गिऱ्हाईकाचे काय मत आहे ह्या गोष्टींचा पाठपुरावा करा.

२) उत्पादन किंवा त्यानंतरची सेवा ह्यात काहीवेळा अडचणी निर्माण होणार हे स्वाभाविकच आहे. पण त्याबद्दल भिती न बाळगता प्रामाणिकपणाने ती अडचण सोडविण्याचा प्रयत्न करा. त्यामुळे गिऱ्हाईकाला तुमचा दृष्टीकोन व खरेपणा दिसून येईल.

३) जर ग्राहकाचे समाधान झाले असेल, तर त्याच्याशी चांगले

संबंध ठेवा आणि त्याला अशी विनंती करा, कि तो त्यांच्या इतर मित्रांनाही तुमच्याकडून माल विकत घेण्यास प्रवृत्त करेल.

लक्षात ठेवा की, तुम्ही झगमगाटात केलेली जाहिरात आणि जबरदस्त केलेली मार्केटिंग ह्यापेक्षा तुमच्याबद्दल एखाद्या समाधानी गिऱ्हाईकाने तुमचे सुचविलेले नाव वा संदर्भ ह्यामुळे तुम्हाला जास्तीत जास्त धंदा करण्याची संधी मिळेल.

***प्रकरण क्र. २६***

# जास्त निरागस राहू नका

## (Don’t be too Innocent)

रस्त्याने शांतपणे चालणाऱ्या व्यक्तिला कुत्रे काहीही करत नाही, पण धावपळ करणाऱ्या व्यक्तिला कुत्रे नक्कीच चावतात, तसेच व्यवसाय जगातही मोठे मोठे कुत्रे किंवा मगरी आहेत, ते सुद्धा स्वयंकेंद्री व अनुभवी व शांतपणे धंदा करणाऱ्यांना काहीही करत नाही. पण पुष्कळवेळा मोठे धंदेवाईक हे नवीन आणि चैतन्यदायी व उत्साही उद्योजकांना फसविणे व त्रास देणे ह्यात आनंद मानतात. कारण त्यांना माहित असते की हे नवीन बाळ संपूर्णतः निरुपद्रवी आहे. जरी त्याची संपत्ति किंवा मालमत्ता जप्त केली तरी, हजारोंमध्ये एखादाच हा त्याची संपत्ती बाहुबळाचा वापर करून जबरदस्तीने परत मिळवू शकतो. बाकीचे नुसते विनवणी करतात, मऊपणे दोष देतात किंवा शांतपणे परत जातात. भारतीय न्यायव्यवस्था पण ह्यात काही मदत करू शकत नाही, कारण निकाल हा एका पिढीनंतर दिला जातो.

म्हणून मध्यमवर्गीय आणि मोठे व्यावसायिक ह्यांच्यामध्ये साधारणतः लहान व नवीन उद्योगजकांना फसविण्याची प्रवृत्ति दिसून येते. ते नवीन उद्योजकाचे सुरूवातीला लाल गालिचा पसरून राजेशाही

स्वागत करतात. त्याला खूप धंदा (Order) देतात, जास्तीत जास्त आर्थिक व्यवहार त्याच्याशी करतात आणि त्याचवेळी जास्तीत जास्त सवलत (Credit) घेण्याचा प्रयत्न करतात.

नवीन उद्योजकाकडून मोठी उधारी मिळाली की, त्यांची (जुन्या उद्योजकाची) वृत्ति बदलते. अशावेळी नवीन उद्योजक हा पण जाळ्यात सापडलेला असतो. त्याला त्याची सेवा व मालाचा पुरवठा हा अत्यंत कमीतकमी किंमत आणि दीर्घमुदतीच्या उधारीवर द्यावा लागतो. व एखादे वेळी त्याने अचानक सेवा किंवा मालपुरवठा बंद केला तर त्याची बाकी राहिलेली रक्कम ही गमावुन बसतो.

म्हणून कधीही भोळसट राहू नका. या जगात आणि उद्योगधंद्यात काय चालले आहे ह्याची माहिती करून घ्या व त्याप्रमाणे तुमच्या व्यवसायाची धोरण रचना तयार करा.

मी काही निरीक्षणे आणि अनुभव ह्याठिकाणी सांगत आहे. तुम्हाला त्यापासून निश्चितच फायदा होईल अशी मला आशा आहे.

**लेखी दस्तऐवजाचे महत्त्व (Importance of written document):**

१९८६ साली मी 'जनरल हायड्रोलिक' नावाच्या लहान कंपनीमध्ये डिझाईन इंजिनियर म्हणून काम करीत होतो. मी तेथे (Hydraulic Presses) या यंत्राचा आराखडा वा रचना करीत होतो व त्यावर देखरेख ठेवत होतो. आम्ही 'नोबल इंजिनियरींग वर्क्स' ह्या कंपनीकडून मोठ्या प्रमाणात गुंतागुंतीचे फॅब्रिकेशन व मशिनिंग करण्याचे काम करवून घेत होतो.

जेव्हा मी नोबल इंजिनियरिंग वर्क्सचा मालक जसवंतसिंग आणि त्याचा मुलगा बलबिरसिंग त्यांच्याकडे भेट देण्यास जात होतो, तेव्हा ते माझे राजेशाही स्वागत करीत होते. त्यांचे माझ्याशी अत्यंत मैत्रीचे संबंध होते. जेव्हा मी माझी नोकरी सोडुन सल्लागार (Consultant) म्हणुन स्वत:चा धंदा सुरू केला. तेव्हा मला श्री. शहा ह्यांचेकडून सहा (Hydraulic Presses) ची रचना व तयार करण्याचे काम मिळाले.

श्री.जसवंतसिंगने मला नेहमी सांगितले होते की, जेव्हा मी माझा स्वतःचा व्यवसाय सुरू करेन, त्यावेळी ते मला सर्व तऱ्हेने मदत करतील. मी जसवंतसिंगशी संपर्क साधला व मला मिळालेल्या नवीन ऑर्डरमध्ये मदत करशील का असे विचारले. त्याने माझे मनःपूर्वक स्वागत केले व पूर्ण मदत करेन असे आश्वासन दिले. त्याने ५०:५० टक्के अशा भागीदाराचा प्रस्ताव पुढे मांडला. माझ्याजवळ वर्कशॉप किंवा संपत्ति नसल्यामुळे मी त्याला मान्यता दिली.

जसवंतसिंगचे वागणे इतके नम्र व चांगले होते की, त्यामुळे कायदेशीर भागीदारी लेखी करारनामा करा असे सांगण्याचे मला धाडस झाले नाही. मी यंत्राच्या ऑर्डर त्याच्या नावाने घेतल्या. आम्ही यशस्वीरीत्या यंत्र पूर्ण केले व त्यात नफा मिळवला. श्री. शहाने आम्हाला यंत्राच्या किंमतीपेक्षा जास्त रक्कमेचे बिल तयार करून, जास्तीची रोख रक्कम त्याला परत देण्यास सांगीतले, ज्या गोष्टीला मी व जसवंतसिंग दोघेही तयार झालो. श्री. शहाने संपूर्ण रकमेचा चेक दिला व तो तात्काळ वटवला गेला.

चेक मिळेपर्यंत श्री. जसवंतसिंग व त्याचा मुलगा ह्यांनी मला असे आश्वासन दिले की, ते शहाला रोख रक्कम तात्काळ परत करतील व मला माझा नफ्याचा भाग देऊन दुसऱ्या यंत्राच्या निर्मीतीचे काम त्वरित सुरू करतील. परंतु जेव्हा पेमेंट मिळाले, त्वरित त्यांचा नूर पालटला. आता त्यांना पुढच्या यंत्रासाठी श्री. शहाला पूर्वी ठरलेली रक्कम परत करण्याच्या आधी आगाऊ रक्कम पेमेंट म्हणून हवी होती. तसेच त्यांनी मला आग्रहपूर्वक असे पण सांगितले की, माझा हिशेब हा वर्षाच्या अखेरीस चुकता होईल किंवा जेव्हा आम्ही सहा यंत्राची ऑर्डर पुरी करू तेव्हा होईल.

माझी घोर निराशा झाली. मी जसवंतकडे माझी नफ्याची रक्कम व श्री. शहाची रोख रक्कम ठामपणे मागितली, त्यावेळी जसवंतसिंगने माझा अपमान केला व मला शिव्या देण्यास सुरुवात केली. मी शारीरिकदृष्ट्या कमजोर असल्याने त्यांच्याशी भांडण

करण्याचे मला धैर्य झाले नाही तसेच माझ्याकडे काही कायदेशीर लेखी दस्तऐवजही नव्हता. त्यामुळे असाहाय होऊन मी काहीही करू शकलो नाही. मी सर्व सत्य घटना श्री. शहा ह्यांना सांगितली. श्री. शहा खरोखरच सज्जन होते. त्यांचे पैसे परत करण्याची नैतिक जबाबदारी जरी माझ्यावर होती तरी त्यांना माझी फसवणूक झाल्याचे समजल्यामुळे त्यांनी माझ्याकडे पैशाची अजिबात मागणी केली नाही.

माझ्या आयुष्यातील पहिल्याच व्यावसायिक व्यवहारात मला माझ्या नफ्याला, तसेच श्री. शहा ह्यांच्या पैशाला मुकावे लागले. एवढेच नाही तर ज्या पुरवठादारांनी माझ्या शब्दावर विश्वास ठेवून मला सामानाचा पुरवठा केला होता, त्यांचीही देणी चुकती करण्याची जबाबदारी माझ्यावर येऊन पडली. मी 'एका सभ्य गृहस्थाच्या (जसवंतसिंगच्या)' वचनावर भरवसां ठेवला व त्यामुळे मला खूप नुकसान सोसावे लागले.

म्हणून तुम्हाला माझा हा सल्ला आहे कि कधीही तोंडी वचने व आश्वासने ह्यांवर अवलंबून राहू नका. नेहमी कायदेशीर कागदपत्रे तयार करा. जर तुम्ही भागीदाराच्या व्यवहारात प्रवेश करणार असाल, तर अन्य सर्व गोष्टींबरोबर हा ही निर्णय घ्या की, भागीदारी संपुष्टात आल्यास कंपनीचे नाव कोणाला मिळेल व कंपनीचा दूरध्वनी कोणाला मिळेल. कारण भागीदारी तुटल्यानंतर सुद्धा पुढे बराच काळ मालाच्या ऑर्डरी व चौकशा ह्या जुना पत्ता, नाव व दूरध्वनि क्रमांकावर येत राहातात.

**व्यवसायातील मैत्री (Friendship in Business):**

श्री. विरदी नावाचा माझा एक मित्र आहे. त्याचे स्वतःचे इंजिनियरिंग वर्कशॉप असून तो कंत्राट पद्धतीने यांत्रिकीकरणाची कामे स्वीकारतो. तो खरोखरच सज्जन माणूस आहे. त्याने त्याचा एक मित्र व गिऱ्हाईक ह्यांच्यासाठी दुसरा जामिनदार (गॅरंटर) म्हणून सात लाख रुपयांच्या करारावर सही केली (१९९० साली). त्याचा

मित्र कर्जफेड करू शकला नाही. म्हणून कर्ज देणाऱ्या धनकोंनी (Creditor) श्री. विरदीने त्यांचे पैसे परत करावेत म्हणून अक्षरशः त्याची पिळवणूक केली. केवळ मैत्रीखातर कायदेशीर दस्तऐवजावर सही केल्यामुळे श्री. विरदीचे खूप आर्थिक नुकसान झाले व त्याला खूप त्रास सहन करावा लागला.

म्हणून व्यवसाय व उद्योगधंद्यात मैत्रीचा संबंध आणू नका. धोक्याच्या परिस्थितीत जागच्या जागी निर्णय घेऊ नका. खूप वेळ घ्या. तुमच्या वरिष्ठांचा सल्ला घ्या आणि मगच निर्णय घ्या.

## कोणीही नुकसान करून विक्री करीत नाही. (No one sells at loss):

मी 'हिंदुस्थान ॲलॉय मॅन्युफॅक्चरिंग कं. लि.(Hamco)' ह्यांना १९८९ मध्ये वस्तू दाब देऊन बाहेर काढणाऱ्या यंत्राचा (Extrusion presses) पुरवठा केला होता. एकदा मी त्यांच्या फोर्ट, मुंबई येथील कार्यालयात माझे देणे वसूल करण्यासाठी गेलो होतो. त्यांच्याकडून चेक मिळाल्यावर मी सहजच म्हणून व्ही.टी.स्टेशनच्या दिशेने जाण्यास सुरुवात केली. त्याचवेळी एक टॅक्सी आली आणि माझ्याजवळ येऊन थांबली. त्या टॅक्सीच्या ड्रायव्हरने मला विचारले,'सर तुम्ही ह्या गाडीतील उतारुला समजावून सांगाल का ही टॅक्सी अहमदाबादला जात नाही म्हणून? 'त्या टॅक्सीतील प्रवासी जो एक अरब होता त्याला मी विचारले,'काय भानगड आहे? 'त्याने मला असे सांगितले, की तो आताच त्याच्या मित्राच्या घरी लग्नाला हजेरी लावण्यासाठी दुबईहून आला होता. त्याच्या घराला कुलूप होते व शेजारी चौकशी करताना असे समजले की, लग्नसमारंभ अहमदाबादला असल्यामुळे ते सर्वजण तिकडेच गेले आहेत. आता मला अहमदाबादला ताबडतोब जायला पाहिजे व लग्न समारंभ आटपून ताबडतोब परत निघून मध्यरात्रीच्या विमानाने दुबईला महत्त्वाच्या कामासाठी परत जाणे भागच आहे. माझ्याकडे तेवढा वेळ नाही आणि हा टॅक्सी ड्रायव्हर सांगतो आहे की, त्याला अहमदाबादला जायचे नाही.'

मी त्या अरबाला असे सांगितले की ह्या गाडीला फक्त

मुंबईच्याच हद्दीत फिरण्याचा परवाना आहे व अहमदाबाद हे जवळ नसून ५०० किलोमीटर दूर आहे व टॅक्सीवाल्याकडे तेथपर्यंत जाण्याचा परवाना नसतो. तो अरब मला म्हणाला,'महाशय आपण जरा टॅक्सीत येऊ शकाल का? मला तुमच्याकडून एक मेहेरबानी हवी आहे.' मी तयार झालो व त्याच्या बाजूला बसलो. त्याने स्टिरीओ कॅसेट प्लेअरचा व घड्याळाचा खोका उघडला व मला म्हणाला,'ह्या वस्तू मी दुबईहून मित्रासाठी भेटवस्तू म्हणून आणल्या होत्या. मी लग्नाला जाऊ शकत नाही किंवा ह्या वस्तू परत पण नेऊ शकत नाही. मला तुम्ही त्याची विल्हेवाट लावण्यास मदत कराल का?' मी म्हणालो,'मुंबईमध्ये इलेक्ट्रॉनिक्स वस्तुंची खूप दुकाने आहेत, तेथे तूम्ही त्या वस्तू विकू शकता' त्यावर अरब म्हणाला,'मी मुंबईत नवीनच आहे त्यामुळे माझी फसवणूक होईल. तुम्ही ह्या वस्तू खरेदी करून मला मदत करू शकाल का?' मी विचारले,'ह्यांची किंमत काय आहे?' त्याने उत्तर दिले,'ह्या वस्तू रुपये १२००० च्या किंमतीयोग्य आहेत.'

मी त्याला म्हणालो,'माझ्याकडे इतके पैसे नाहीत.' त्याने विचारले,'तुमच्याकडे किती पैसे आहेत?' मी माझी ब्रिफकेस उघडली व त्यात मला फक्त ३००० रुपये आढळून आले. मी उत्तर दिले, माफ करा माझ्याजवळ फक्त ३००० रुपये आहेत. त्या अरबाने मला प्रश्न केला, 'तुम्ही आणखी काही पैशांची सोय करू शकाल का?' मी उत्तर दिले, 'सॉरी ! अजिबात शक्य नाही.' मी टॅक्सीतून बाहेर उतरण्यासाठी पाऊल टाकले तोच अचानकपणे तो अरब म्हणाला,'ठीक आहे साहेब हा स्टिरिओ घेऊन जा. मला आश्चर्याचा धक्का बसला आणि मी अतिशय खूष झालो. कारण १२००० रुपये किंमतीचा परदेशी बनावटीचा स्टिरिओ कॅसेट प्लेअर फक्त ३००० रुपयात मिळत आहे, ह्यावर माझा विश्वासच बसत नव्हता. मी त्याला पैसे दिले, स्टिरिओचा ताबा घेतला आणि घरी परत आलो.

जेव्हा मी घरी आल्यावर पार्सल उघडले आणि स्टिरिओ वाजवण्यास सुरुवात केली त्यावेळी माझ्या पायाखालची जमीन सरकली. कारण तो दिल्ली येथील एका बनावट कंपनीचा स्टिरिओ प्लेयर होता. ज्याची किंमत जास्तीत जास्त ८०० रुपये असेल.

• माझ्या व्यवसायाच्या सुरुवातीच्या काळात मी व्यक्तिशः दुकानात जात असे आणि वॉल्व (Valve), पंप व सुटे भाग ह्यांची खरेदी करीत असे. एकदा मी नागदेवी स्ट्रीटला मेसर्स कझाफ इंजिनियरिंग कंपनी येथे काही हायड्रॉलिक फिटिंग्सचे सामान घेण्यासाठी गेलो होतो. खरेदी केल्यानंतर मी सहजपणे मस्जीद स्टेशनकडे चालत असतांना, एक भटक्या माझ्यामागून आला व म्हणाला,'महाशय, क्षमा करा.' मी मागे वळून पाहिले तेव्हा तो म्हणाला, 'हा Scientific Calculator आहे. तुम्हाला तो विकत हवा आहे का?' मी उत्तर दिले, नको आणि परत स्टेशनच्या दिशेने चालायाला लागलो. त्याने माझा पिच्छा सोडला नाही व म्हणाला,'सर मी तुम्हाला अत्यंत स्वस्तात देईन. 'मी त्याला उत्तर दिले,'माझ्याकडे तशाच प्रकारचा कॅल्क्युलेटर आहे. 'व असे म्हणून मी पुढे चालावयास लागलो आणि त्याने माझा पाठलाग करणे काही सोडले नाही. तो माझ्याकडे येऊन म्हणू लागला,'सर जर तुम्ही खरेदी केलेत तर माझ्यावर उपकार होतील. माझ्याकडे अजिबात पैसे नाहीत व मला माझ्या मुलाबाळांचे पालनपोषण करावयाचे आहे.'

जेव्हा त्याने अशी विनवणी केली, तेव्हा मी एक क्षणभर विचार केला आणि हा व्यवहार टाळण्यासाठी त्याला उत्तर दिले,'मी तुला चांगली किंमत देऊ शकत नाही. तरी तू दुसरे गिऱ्हाईक बघ.' त्याने मला विचारले,'तुम्ही किती किंमत देऊ शकता?' ह्या सायंटिफिक कॅल्सीची बाजारात किंमत ५०० रुपये आहे. मी त्याला परत टाळण्यासाठी म्हटले, मी फार तर ५० रुपये देऊ शकेन.' 'सर पन्नास रुपये फार कमी वाटतात कृपया १०० रु. द्या.' मी ठामपणे सांगितले, माफ कर. ५० रुपये ही माझी अंतिम बोली आहे. त्याने विचारले ६० रुपये द्याल का? व माझ्या हातात त्याने कॅल्क्युलेटर दिला. मी त्या कॅल्सीची पूर्ण तपासणी केली, काही हिशेब त्याच्यावर करून पाहिले आणि त्याला ५० रुपये देऊ केले. मी अतिशय खुषीत स्टेशनवर परत येत असताना तो मला म्हणाला, मी तुम्हाला कॅल्सी चांगला पॅक करून देतो व मला दहा रुपये आणखी द्या.' मी त्याला कॅल्क्युलेटर बांधून देण्यासाठी परत दिला व सांगितले की ५०

रुपयापेक्षा एक पैसाही जास्त देणार नाही.' त्याने कॅल्सी बांधून माझ्या हातात दिला. मी तो मोठ्या खुषीत माझ्या बॅगेमध्ये ठेवला आणि स्टेशनवर येऊन घरी जाण्यासाठी ट्रेन पकडली. मी इतका आनंदी होतो की काही कारणाशिवाय मला आकडेमोड करण्याचा मोह आवरेना, म्हणून गाडीत बसलेलो असतांनाच माझी बॅग उघडली आणि तो बांधलेला कॅल्क्युलेटर बाहेर काढला त्यावरील पॅकींग उघडली. पण त्यावेळेच्या माझ्या अवस्थेचे वर्णन करण्यास माझ्याकडे पुरेसे शब्दच नाहीत. त्या पार्सलमध्ये कॅल्क्युलेटर नव्हता फक्त पुठ्ठ्याचे तुकडे होते. त्या भटक्याने मला दिवसाउजेडी फसविले नव्हते तर चुकीच्या तत्वामुळे मी माझी फसवणूक करून घेतली होती.

बाजारामध्ये अत्यंत कवडीमोलाच्या भावाने कोणत्याही वस्तू मिळत नाहीत. नुकसान सोसून कोणीही वस्तू विकणारा मूर्ख ह्या जगात नाही. तुम्हाला असे वाटते की, या जगात असे मूर्ख आहेत? तर मी म्हणेन होय. असे लोक आहेत व ते म्हणजे तुम्ही आणि मी.

- माझ्या एका श्री. शमीम नावाच्या मित्राने चोरीचा माल असलेल्या काही ॲल्युमिनिअमच्या वस्तूंची अत्यंत स्वस्त दरात खरेदी केली. चोरीचा माल खरेदी केल्याने पोलिसांनी त्याला अटक केली, आणि त्याला कोठडीमध्ये तीन दिवस डांबून ठेवले. काही अल्प रुपये वाचविण्याच्या भानगडीत श्री. शमीमला पोलिसांचे हात हजारो रुपये देऊन ओले करावे लागले व त्याची स्वतःची बेअब्रू व्हायची ती झालीच.

म्हणून फक्त विक्रीमध्येच नव्हे तर खरेदी करतांना व व्यवसायातील प्रत्येक व्यवहारात प्रामाणिक राहा.

**'प्रामाणिकपणा वा सचोटी हेच चांगल्या उद्योगाचे धोरण आहे.'**

## *प्रकरण क्र. २७*

# पुण्याच्या (किंवा उदात्त) कामांचे महत्त्व

## (Importance of Noble Deeds)

दरवर्षी अर्थशास्त्रामध्ये मास्टर्स डिग्री घेणारे शेकडो विद्यार्थी असतात. पण त्यापैकी प्रत्यक्षात कितीजण लखपती बनतात? अगदी थोडेजण! त्यांच्यापैकी प्रत्येकजण हा करोडपती बनत नाही. कारण फायनान्स (Finance) हातचलाखी माहिती असल्याने कोणी श्रीमंत होत नाही.

प्रत्यक्षात आर्थिक भरभराट ही पैसे साठवून ठेवण्याच्या सर्वसाधारण कल्पनेपेक्षा वेगळीच आहे. आपण मानव प्राणी हे पदार्थ आणि शक्ति ह्यांचा संयोग आहे म्हणजेच शरीर आणि आत्मा. त्याचप्रमाणे भरभराट आणि चांगली आर्थिक परिस्थिती हे पण पदार्थ आणि शक्ति ह्यांचा समतोलपणा आहे. पदार्थ म्हणजे संपत्ति आणि शक्ति म्हणजे ईश्वरी कृपा. भरभराट म्हणजे फक्त संपत्तीच नव्हे, खालील उदाहरण देऊन मला काय म्हणावयाचे आहे ह्याचे स्पष्टीकरण देण्याचा मी प्रयत्न करीन.

### १) वाळवंटातील एक मासा (A Fish in the desert)

असे समजा की, वाळवंटात एक खड्डा आहे. त्यामध्ये एक मासा ठेवा व त्यात बालदीभर पाणी ओता. तुम्ही कितीही पाणी त्या

खड्यात ओता. ते वाळूमध्ये शोषून घेतले जाईल आणि मासा हा आणखी काही पाण्याच्या थेंबासाठी हाव धरील.

असे समजा, आता पाण्याची पातळी ही जमिनीच्या खाली वाढावयास लागली आहे. ती जरी खड्याच्या तळाशी एक इंच वाढली तरी त्यामुळे माशाला थोडा आराम वाटेल. तसेच ओतलेले पाणी हे सुद्धा खड्ड्याच्या बाजूच्या वाळूच्या भिंतींनी शोषून घेण्यापूर्वी बराच वेळ तसेच राहील. पाण्याच्या पातळीमध्ये वाढ झाल्याबरोबर माशाचे सुख आणखी वाढेल व ओतलेले पाणी ताबडतोब काही झिरपणार नाही.

जर पाण्याची पातळी ही पुरेशा उंचीपर्यंत वाढली, तर पाणी ओतून टाकण्याची जरुरी पण भासणार नाही.

जर त्याचे कारंजात रूपांतर झाले तर, माशाबरोबरच खडयाबाहेरील आणखी काही जलचर प्राण्यांना त्याचा फायदा होईल.

मानव हे माशासारखे आहेत. पाणी ही आपली आमदनी आणि सुकी वाळू हा आपला खर्च आहे. ज्याप्रमाणे कोरडी वाळू ही तिच्यावर टाकलेले सर्व पाणी शोषून घेते, त्याचप्रमाणे आपले खर्च आणि राहणीमान हे इतके उंच आहे की, आपली आमदनी ही खर्चापेक्षा नेहमीच कमी पडते व आपल्याला नेहमीच पैशाची गरज भासते. जमिनीखालील पाण्याची पातळी ही ईश्वरी कृपा आहे. जेव्हा ती मानवी जीवनात स्पर्श करते तेव्हा आपणाला थोडे सुखकर वाटते. जशी कृपादृष्टी वाढते तसे आपले सुख पण वाढत जाते. आपली मनःशांति, जीवनातील समाधान, इच्छा पुरी होणे व आणखी पुढे म्हणजे भरभराट व समाजात मिळणारा मान हा आपल्या आमदनीपेक्षा ईश्वराच्या कृपेवरच जास्त अवलंबून असतो.

आपली उदात्त कामे इतकी चांगली नाहीत कि ईश्वराच्या कृपेचा वर्षाव आपल्यावर होईल. परंतु संत, ऋषीमुनी असे असतात जे कोणत्याही कमाईशिवाय अनाथालय किंवा आश्रम चालवतात. हीच ईश्वरीकृपा आहे जिचा वर्षाव त्यांच्यावर होतो. त्यामुळे हे सर्व करणे त्यांना शक्य होते.

म्हणून मनःशांति आणि आत्म्याची शांति व शेवटपर्यंत भरभराट ह्यासाठी परमेश्वराची कृपादृष्टी ही आपल्या मासिक आमदनीपेक्षा जास्त महत्त्वाची असते.

काही कंपन्यांचे कार्याध्यक्ष माझ्या माहितीत आहेत, ज्यांची मासिक प्राप्ति ही १० लाख रूपयांपेक्षा जास्त आहे. तथापि फ्लॅटस् व बंगला ह्यांचे भाडे, घरातील डझनावारी नोकरांचे पगार, पंचतारांकित क्लब्सची मासिक बिले, वारंवार मेजवान्या आणि परदेशाच्या सहली इत्यादीमुळे हे लाखो रुपयेसुद्धा त्यांना अपुरे पडतात. ते कार्याध्यक्ष नेहमी असंतुष्ट, अशांत, बैचेन व चिंताग्रस्त राहातात आणि तोंडाबाहेर जीभ लोंबणाऱ्या कुत्र्याप्रमाणे आशाळभूतपणे पैशाच्यामागे धावतात.

मला अशी पण काही कुटुंबे माहिती आहेत की, त्याची मासिक मिळकत ही फक्त १० हजार ते १५ हजार रुपये आहे. पण ते आयुष्याच्या प्रत्येक क्षेत्रात आनंदाने भरभराट करीत असतात. ह्या वरील दोन्ही प्रकारच्या कुटुंबाच्या जीवनातील परिणामकारक फरकाचे कारण म्हणजे ईश्वराची कृपा होणे किंवा न होणे हे आहे. ज्यांची कर्म उदात्त आहेत व जे ईश्वरावर श्रद्धा ठेवतात त्यांच्याच जीवनात फक्त ईश्वराच्या कृपाप्रसादाचा परिस स्पर्श लाभतो.

खालील श्लोकातुन तुम्हाला पुण्याच्या कामाचे महत्व समजेल.

ईश्वर सांगतो,

*"जो कोणी चांगले व योग्य आचरण करील. मग तो स्त्री वा पुरुष असू दे व माझ्यावर त्यांची श्रद्धा असेल तर मी त्यांना जगात पवित्र आणि आरामशीर आयुष्य देईन आणि त्यांच्या मृत्यूनंतर त्यांच्या चांगल्या कामांचा उत्कृष्ट मोबदला देईन."* (पवित्र कुराण, १६:९७)

*"जर त्यांनी बायबल, तोहरा आणि अन्य ईश्वरीय धर्मग्रंथांचे अनुकरण केले असते, तर आकाशांतून पाऊसरूपी भरभराट त्यांच्यावर पडली असती आणि ती त्यांच्या पायाखालूनही (जमिनीतुन) वर आली असती."*

*"त्यांच्यापैकी एक समूह हा सन्मार्गाने जातो पण बहुसंख्य मात्र हे वाईट वागतात किंवा वाईट काम करतात."* (पवित्र कुराण,सुरह माईदा ५-६६)

**ईश्वरी कृपा नसताना**

तुम्ही जेवढे पाणी खड्ड्यात टाकाल त्याचे कोरड्या वाळूत शोषन केले जाईल. त्याचप्रमाणे तुमचे आमदनी कितीही असा, तुमचा खर्च इतका प्रचंड असेल की तुम्हाला नेहमीच पैशाची गरज भासेल.

तुमची प्रचंड आमदनी

वाळवंटातील कोरडा खड्डा




आपले खर्च जर ईश्वराच्या कृपेचा जीवनात स्पर्श झाला, तर कमी आमदनीतसुद्धा माणसाला आयुष्यात सुख मिळेल.

लहान आमदनीही सुखी आयुष्यासाठी पुरेशी असते




पाण्याची जमीन खालील पातळी ही आपल्या जीवनात ईश्वराच्या कृपेसारखी असते.

शोषन कमी झाले. म्हणजेच अनावश्यक खर्च आपल्या आयुष्यात कमी झाले.

संत हे कारंजाप्रमाणे असतात. ईश्वराचा त्यांच्यावर आशीर्वाद असतो. आणि ते संत कुठल्याही आमदनीच्या स्त्रोताशिवाय शेकडो लोकांचे पालनपोषण करतात.




## २) हरवलेले चौथे चाक (The Missing Fourth wheel)

प्रगतीसाठी साधनसंपत्ति आणि संधि ह्या नेहमीच खुल्या, स्पष्ट अचूक आणि सहजासहजी मिळत नसतात. त्यामध्ये नेहमी काही अडथळे, खाचखळगे व मर्यादा असतात. आयुष्यभर माणूस ते अडथळे, खाचखळगे मर्यादा ह्यांच्यावर मात करण्याचा प्रयत्न करीत असतो. पण ९५% लोक निवृत्तीपर्यंत अयशस्वी असतात.

उदा. जे टपाल कार्यालय, रेल्वेज किंवा शाळा इत्यादि ठिकाणी नोकरी करतात. त्यांची जीवनशैली ही एकसुरी वा कंटाळवाणी असते. ते कामावर नऊ वाजता कसेबसे जातात, काहीतरी काम करून त्यांचा वेळ घालवितात व संध्याकाळी घरी परत येतात.

वर्षानुवर्षे त्यांचा हाच नित्यपाठ चालू असतो. त्यांच्या निवृत्तीच्यावेळी सुद्धा त्यांचे जीवनमान बदलत नाही. ते त्यांच्या काळाच्या गतिचक्राबरोबर चालत असतात व जवळजवळ त्याच ठिकाणी कायम राहातात.

अशाच प्रकारे लहान व्यवसायीकांच्या बाबतीत घडत असते. उदा. लहान हॉटेल मालक, लहान किराणा व्यापारी इत्यादि. काही पिढ्यानंतरसुद्धा त्यांचा दर्जा तसाच कायम राहातो.

त्यांची ही स्थिती खालील उदाहरणावरून स्पष्टीकरण केल्याने समजेल.

पुढील एक चाक नसलेल्या गाडीचा विचार करा. जर चालकाने ती गाडी चालविली तर ती पुढे जाणार नाही. पण एका वर्तुळात फिरेल आणि कितीही इंधन वापरले व वेळ लागला, तरी एकाच जागी वर्तुळाकार फिरत राहिल.

पुढे जाण्यासाठी एकमेव मार्ग म्हणजे गाडीला नवीन टायर बसविणे किंवा गाडी खेचून नेणे. गाडीला दुसरा टायर जोडणे म्हणजे ज्वलंत इच्छा, सकारात्मक वृत्ति, सहनशीलता, परिश्रम, व्यावसायिक प्रशासनाचे मिळणारे धडे, योग्य मार्गाने चालत जाणे ह्या भावना स्वत:च्या मनात निर्माण करने आणि असे कुठलेही काम न करने ज्यामुळे ईश्वराचा कोप होईल. पुण्याचे काम करणे व भरभराटीसाठी प्रार्थना करने हयांची तुलना साखळीने गाडी खेचण्याच्या सेवेसारखी आहे.

ज्या गाडीचे एक चाक हरवले आहे, अशा गाडीला टायर जोडल्याशिवाय किंवा गाडी खेचल्याशिवाय ती पुढे जाणार नाही. त्याचप्रमाणे यशाच्या तत्त्वाच्या चांगल्या सवयी मिळाल्याशिवाय आणि ईश्वराच्या आशीर्वादाशिवाय एखादी व्यक्ति ही आयुष्यात पुढे जाऊच शकणार नाही.

गाडीचा पुढील एक टायर नाही त्यामुळे ती एकाच ठिकाणी वर्तुळात फिरेल. गाडी चौथा टायर लावल्याशिवाय किंवा साखळीने खेचून नेल्याशिवाय पुढे जाऊच शकणार नाही.





चौथा टायर म्हणजे तुमचा होकारार्थी आणि विधायक प्रयत्न आहे. खेचून नेण्याची सेवा ही ईश्वराची कृपा आहे. ह्या दोन्ही गोष्टीच्याशिवाय तुम्ही जीवनात पुढे जाऊच शकणार नाही.

## ३) आंधळे भिकारी आणि भगवान शंकरजी

चार माणसे भीक मागून त्यांचे पोट भरीत होते. पार्वतीमातेला त्यांच्याबद्दल दया आली व तिने आपले पतिदेव श्री शंकर भगवान ह्यांना त्या चौघांना श्रीमंत करा अशी विनंती केली. भगवान शंकरजी म्हणाले,'त्यांच्या नशिबात गरीबीच आहे. ते कधीही श्रीमंत होणार नाहीत.'

परंतु पार्वतीमातेच्या सतत आग्रहामुळे भगवान शंकराने त्या चौघांना सोन्याच्या रुपात काही संपत्ति देण्याचे निश्चित केले. शिवशंकराने लाकडाच्या एका फळीचे सोन्याच्या फळीत रुपांतर केले आणि ज्या रस्त्याने ते चौघे भिकारी नेहमी रस्ता ओलांडतात त्या रस्त्याच्या मध्यभागी त्याने ती सोनेरी फळी ठेवली.

आपली कमाई दररोज वाढावी म्हणून ते गरीब लोक त्यांच्या भीक मागण्याच्या सवयीत नेहमी बदल करीत होते. त्यादिवशी त्यांनी आंधळे बनून भीक मागण्याचे ठरविले. म्हणून त्या सर्वांनी त्यांच्या डोळ्यावर कापडी पट्टी बांधली आणि भिक्षा मागण्यासाठी तयार झाले.

ते त्यांच्या नेहमीच्याच रस्त्यावरून जात होते, पण आंधळे असल्यामुळे ते सोनेरी फळीला ओलांडून पुढे गेले आणि आयुष्यभर गरीबच राहिले.

संधि साधण्याची दूरदृष्टी आणि शहाणपण ईश्वराशिवाय कोणीही देऊ शकत नाही. आपल्या भोवतालच्या समाजात लाखो रुपये कमावण्याच्या शेकडो संधि उपलब्ध असतात. पण फक्त ३ ते ५ टक्केच लोक त्याचा पुरेपूर उपयोग करून घेतात. बाकीचे ९५ टक्के लोक हे आंधळ्यासारखे राहातात व पुढे जातात. तुमच्या मार्गात उपलब्ध असलेली संधि शहाणपणाने मिळविणे आणि त्याचा योग्य उपयोग करून घेणे, ह्यासाठी तुम्हाला ईश्वरावर श्रद्धा ठेवावी लागेल व पुण्याची कामे करून, सतत प्रार्थना करून ईश्वराला संतुष्ट करावे लागेल.

## ४) विधिलिखित सुधारले (The destiny amended)

पैगंबर मूसा (अलैहि सलाम) यांच्या काळी एका म्हाताऱ्या जोडप्याला मूलबाळ नव्हते. त्यांनी प्रेषित मूसा यांना अशी विनंती केली की तू ईश्वराकडे आम्हाला मूलबाळ होण्याची प्रार्थना कर. प्रेषित मूसा यांनी ईश्वराकडे वृद्ध जोडप्याला मूल द्यावे अशी प्रार्थना केली. परंतु ईश्वराने उत्तर दिले,"त्यांच्या नशिबातच मूल लिहिलेले नाही." त्यावर हा संदेश प्रेषित मूसा (अलैहि सलाम) यांनी म्हाताऱ्या जोडप्याला कळविला.

खूप वर्षानंतर त्याच वृद्ध जोडप्याच्या घराजवळून जाताना प्रेषित मूसा (अलैहि सलाम) यांनी त्या वृद्ध जोडप्याच्या घरात खूप मुले खेळताना पाहिली. त्यांना अतिशय आश्चर्य वाटले. जेव्हा त्यांनी वृद्ध जोडप्याला ही मुले कशी प्राप्त झाली असे विचारले तेव्हा ते जोडपे म्हणाले,"एक साधुपुरुष आमच्या घरी आला होता. व त्याने भाकरीची मागणी केली. व वर असेही सांगितले की, तुम्ही मला जेवढी भाकरी खाऊ घालाल तेवढी मुले तुम्हाला होतील." आम्ही त्याला सात भाकरी दिल्या व आम्हाला सात मुले मिळाली."

प्रेषित मूसा (अलैहि सलाम) यांना आश्चर्याचा धक्काच बसला. ते सिनई पर्वतावर ईश्वराला खुलासा विचारण्यासाठी गेले व म्हणाले," हे ईश्वर ! तुम्ही तर त्या वृद्ध जोडप्याच्या नशीबात मुले नाही असे म्हणाला होतात ! पण आता त्या जोडप्याला अर्धा डझनाहून जास्त मुले आहेत. हे असे कसे शक्य आहे?"

ईश्वर म्हणाला," प्रिय मूसा ! मी तुला पुढे मागे ह्याचे उत्तर देईन. आधी माझ्यासाठी एक काम कर. मला माणसाच्या मांसाची जरूरी आहे. तेव्हा जवळच्याच शहरात जा आणि माझ्यासाठी ते मिळवून आण."

प्रेषित मूसा (अलैहि सलाम) हे शहरात गेले आणि प्रत्येकाला त्यांनी मांस देण्याबद्दल विचारले. पण कोणीही त्यांना मदत केली नाही. ते शहरातून परत येत असताना शहराबाहेरच त्यांना एक

झोपडी दिसली. त्यात त्यांना एक संत राहात असल्याचे आढळून आले. मूसा यानी मांसाच्या तुकड्यासाठी संतपुरुषाला विनंती करताच. त्यांनी मांसाचा एकच तुकडा नाहीतर त्याच्या शरीराच्या प्रत्येक भागातून मांसाचा एकेक तुकडा मूसा (अलैहि सलाम) यांना दिला.

प्रेषित मूसा (अलैहि सलाम) हे पर्वतावर पोहोचले व सर्व तुकडे त्यांनी ईश्वरापुढे ठेवले. ईश्वर म्हणाला,'मूसा ! तूम्ही स्वतःच मानव प्राणी असल्याने तू तुझ्या शरीरातील मांसाचा तुकडा मला देऊ शकला असतास पण तुम्हीच नाही तर या शहरातील कोणीही हे करू शकला नाही, जे फक्त संतच करू शकला. तो माझ्यावर खूप प्रेम करतो आणि जेव्हा मी मांसाचा फक्त एक तुकडा मागितल्यावर त्याने शरीराच्या प्रत्येक भागातील मांसाचा एकेक तुकडा मला दिला. आता मला सांग जर त्याने माझ्याकडे काही मागितले तर मी त्याला नकार कसा देऊ शकेन?'

• एखाद्याचे नशीब बदलणे ही ईश्वरास अशक्यप्राय किंवा कठीण गोष्ट नाही. त्याने फक्त म्हटले पाहिजे,'होऊ दे'! आणि नशीब त्याप्रमाणे बदलले जाते.

प्रत्यक्ष जीवनातसुद्धा आपण स्वत:च आपले नशीब निश्चित करत असतो. ईश्वर फक्त आपल्या चांगल्या किंवा वाईट कर्मानुसार न्यायनिवाडा करतो. चांगल्या कामाने आपल्याला ईश्वराकडुन भरभराटीचे बक्षीस मिळते व वाईट कामाने नाशाची शिक्षा होते.

म्हणून चांगले नशीब आणि भरभराटीसाठी आपले चारित्र्य, आपली वागणूक, आपली कार्ये व आपली जीवनशैली ही अशी असली पाहिजे की ईश्वर आपल्या विनंतीला नकार देऊच शकणार नाही.

अंतिम स्वर्गीय पुस्तक सांगते,

*'ईश्वर हा कुणालाही त्रास देत नाही. मानवप्राणी स्वतःच्याच करणी व कर्मामुळे त्रास आणि अडचणी ओढून घेतात.'* (पवित्र कुराण २:२८६)

## ५) अंतिम आधार (The last Straw)

- सन १९९५ ते २००२ ह्या कालावधीत भारतात औद्योगिक मंदीचा काळ होता. मी हायड्रॉलिक मशीनरीचे उत्पादन करतो. जेव्हा एखाद्या कंपनीला तिची उत्पादन क्षमता वाढवावयाची असते किंवा नवीन कारखाना सुरू करावयाचा असतो. त्यावेळी ती आमच्याकडून यंत्रसामुग्री आणि वस्तू खरेदी करते. ह्या मंदीच्या काळात जेव्हा कंपनीचे अस्तित्व टिकवणे हेच एक आव्हान असते, त्यावेळी कोणीही आमच्याकडून यंत्रे खरेदी करीत नाही. त्यामुळे मंदीच्या काळात हायड्रॉलिक मशीनरीचे उत्पादन करणाऱ्या कारखान्यांना खुपच नुकसान होते.

- मी नफ्याची चांगली पातळी ठेवून काम करतो, आणि माझ्या कामगारांना चांगले पगार तसेच प्रत्येक वर्षी योग्य ती पगारवाढ देतो. तथापि, मंदीच्या काळामध्ये कामगारांना कामात व्यस्त ठेवण्यासाठी मी 'ना नफा ना तोटा' ह्या तत्त्वावर ऑर्डर्स घेतल्या आणि कामगारांना २ वर्षे पगारवाढ देऊ शकलो नाही. कामगारांचा असा समज झाला की मी बदलून गेलो आहे व त्यांच्याकडे संपूर्ण दुर्लक्ष करीत आहे. म्हणून ते कामगार संघटनेमध्ये सामील झाले. कामगार संघटनेचा नेता हा कपटी माणूस होता. व मला वाटाघाटीच्या टेबलावर जबरदस्तीने बसवून व स्वतःला झटकन पैसा मिळावा म्हणून त्याने माझ्याविरुद्ध खटला दाखल केला आणि दहा लाखाहून जास्त रुपयांचा दावा केला.

- M/s. Middle Eastm Foundation Group (at Dubai) यांना मी दोन वेळा २५०० टन क्षमतेच्या जॅक्सचा पुरवठा केला होता. त्याचा वापर ते पुलांच्या आणि गगनचुंबी इमारतीच्या आधारभूत पायाभरणीच्या चाचणीसाठी करतात. त्या कंपनीने ३८ लाख रुपयांची ऑर्डर तिसऱ्यावेळी नोंदविली. उधारीच्या पतीचे पत्र(letter of creadit) हे तयार होण्यास खूप वेळ लागतो व त्या कंपनीची गरज अत्यंत तातडीची होती. म्हणून ह्यावेळी त्यांनी असे सूचित केले की, जर मी

तयार असेन, तर ते बँकेतर्फे माझे पेमेंट अदा करतील. मी तयार झालो आणि त्यांच्यासाठी जॅक्सचे उत्पादन केले. परंतु दुदैवाने ज्या प्रकल्पासाठी ते सामुग्री खरेदी करीत होते तो प्रकल्पच मुळी रद्द झाला. त्यामुळे कंपनीने पण माझी ३८ लाखांची ऑर्डर रद्द केली.

• मंदीमुळे मी 'ना नफा ना तोटा' ह्या तत्त्वावर ऑर्डर्स घेत होतो. परंतु कामगारसंघटनेच्या समस्येमुळे माझ्या कामगारांनी मंद गतीने चालू केलेले काम आणि माझे किंमतीबद्दलचे चुकलेले आराखडे ह्यांमुळे मला बऱ्याच उत्पादनामध्ये खूप नुकसान भोगावे लागले. जेव्हा रोख रक्कमेचा झरा थांबला, तेव्हा मी माझ्या पुरवठादारांना देण्याचे पैसे हे माझे कामगार व कर्मचारी ह्यांचे पगार देण्यासाठी फिरविले. ह्यामुळे थकबाकी रक्कम ही सुमारे २५ लाखाच्या घरात पोहोचली.

• मी पूर्णपणे अडकला गेलो होतो. ह्यांतून सुटण्याचा मार्गच नव्हता. राजकीय नेते आणि सरकारी अधिकारी ह्यांच्या आणलेल्या दबावाखाली सुद्धा कर्मचारी संघटनेचा पुढारी माघार घेण्यास तयार नव्हता.

मी मिडल इस्ट फाऊंडेशन ग्रुप (दुबई) ह्यांना माझ्या ऑर्डरचा स्वीकार करा अशी विनंति केली. तथापि त्यांना सुद्धा आर्थिक समस्या भेडसावत होती म्हणून त्यांनी नकार दिला. मालाचे पुरवठादार शिकारी कुत्र्याप्रमाणे माझ्या मागे लागले होते. त्यांचे शब्द होते,'काहीही कर पण आमची देणी देऊन टाक.'

• माझ्या कारखान्याच्या आवाराची किंमत ही ६० लाख रुपये इतकीपण नव्हती. त्यामुळे व्यवसायाची जागा गहाण टाकून पण माझी कर्जामधून सुटका होत नव्हती. जरी मी माझा प्रशस्त फ्लॅट विकला असता, तर मी दुसरी अशीच प्रशस्त जागा भाड्याने घेऊ शकलो नसतो. कमी प्रतीच्या किंवा लहान जागा घेणे ह्यामुळे माझ्या कुटुंबाची प्रतिष्ठा व आत्मविश्वास ह्यांचा नाश झाला असता, म्हणून मी ती गोष्टपण करण्याचे धाडस करीत नव्हतो.

- ह्या सर्व काळज्यांमुळे व चिंतानी माझे वजन हे सुमारे २० टक्के कमी झाले. मी अत्यंत किरकोळ शरीरप्रकृतिचा आहे व माझे वजन फक्त ५२ किलो आहे जे तेव्हा ४३ किलोपर्यंत कमी झाले. जेव्हा मला सर्व मार्गांचे दरवाजे बंद झालेले आढळून आले तेव्हा मी ईश्वराकडे वळलो.

- सतत चार महिने प्रार्थनेनंतर मी ईश्वराकडे विनंती करीत होतो. शेवटी दयाळू ईश्वराची माझ्यावर कृपादृष्टी झाली. एके दिवशी भल्या सकाळी मला मिडल इस्ट फाऊंडेशन ग्रुप (दुबई) च्या श्री. जोस थॉमस ह्यांच्याकडून असा निरोप आला की, त्यांची कंपनी पूर्वीचीच ऑर्डर पक्की करीत होते व त्यांच्या ३८ लाख रूपये किंमतीच्या जॅक्सची मालाची डिलिव्हरी लवकरच घेऊन जातील.

- मी त्यांना जॅक्सचा पुरवठा केला आणि माझे पेमेंटपण मला मिळाले. माझ्या कामगारांना समजून आले की, खटल्याच्या कागदपत्रांमध्ये कामगारांचा तपशील हा चुकीचा आणि दिशाभूल करणारा होता. कारण त्यांच्या संघनेच्या नेत्याने फक्त स्वतःला पैसा मिळावा म्हणून खटला हा दाखल केला होता. त्यामुळे कामगारांचा फायदा होणार नव्हता. मी कामगारांना न्यायालयाच्या बाहेर समेट करण्यासाठी बोलाविले. ते सर्व तयार झाले व मी त्यांना त्यांच्या प्रत्यक्ष थकबाकीपेक्षा २० टक्के जास्त रक्कम दिली व त्यांना कामावरून कमी केले.

- नंतर मी पुरवठादारांना सांगितले की, माझे दोन प्रश्न आता सुटले होते व माझ्या आर्थिक परिस्थितीत सुधारणा झाल्यावर मी त्यांची देणी देऊन टाकीन. पुष्कळसे पुरवठादार रागावले आणि त्यांनी त्यांच्या मालाचा पुरवठा बंद करून टाकला. तरीसुद्धा पुढील दोन वर्षात मी सर्व थकबाकीच्या रक्कमांची देणी देऊन टाकली.

- त्या अंधारमय काळाची आठवण झाली की माझ्या अंगावर अगदी काटा उभा राहातो.

या संपूर्ण विनाशांतून ईश्वराखेरीज कोणीही मला वाचवू

शकला नसता. आणि खरोखरच ईश्वराने मला वाचविले.

असा काळ हा प्रत्येक उद्योजकाच्या आयुष्यात कधीतरी येतोच जेव्हा तो एका क्षणात राजेपद जाऊन भिकारी बनतो. फक्त ईश्वरच आहे, जो आपल्या मस्तकावर मुकुट ठेवून त्याची देखभाल करतो.

व्यवसायात ईश्वरी कृपेकडे कधीही दुर्लक्ष करून चालणार नाही. त्याला म्हणजे ईश्वराला आपला व्यावसायिक भागीदार म्हणून समजला पाहिजे व जेव्हा त्याची देणी जेथे त्याला हवी तेथे आपण द्यावयास पाहिजेत. म्हणजेच देणगी आणि दानधर्म या स्वरुपात.

**(२००७ साली मी जेव्हा पुढील ऑडरसाठी दुबईला गेलो, तेव्हा त्यांच्याकडुन कळाले कि ज्या २५०० टन जॅक्सची ऑडर त्यांनी नाकारली व पुन्हा माझ्याकडुन तो जॅक्स खरेदी केला, त्याच जॅक्सचा वापर जगातील सर्वात उंच इमारतीच्या (Burj Dubai) पायाचाचणीसाठी त्यांनी केला.)**

## लेखकाने उत्पादन केलेली हैड्रॉलिक मशिन्स































←

(Export order of this Jack got cancelled and re-confirmed after four months. Foundation of world's tallest building "Burj Dubai" has been tested by M/s. Middle East foundation group, using our said exported Jacks.)

**PRODUCT RANGE :**

Hydraulic Presses for Transmission Industries
Hydraulic Press for Pipe Fitting Industries
Custom Build Hydraulic Press, Power Pack Cylinder etc.

## ६) गरिबीचा खड्डा

महाविद्यालये आणि विश्वविद्यालये ह्यात शिकवली जाणारी व्यवसायाची तत्त्वे ही जर योग्यरीतीने वापरली तर व्यक्ति चांगली प्रगती करते. माणसाच्या मेहनतीप्रमाने त्याचे यश असते.




भरभराटीत वाढ (यश)

बदलत्या काळानुसार समान कष्ट केले तरीही यशाचे प्रमाण वाढण्यापेक्षा कमी होते.




परंतु हा आलेख हा मोठ्या चित्राचा एक लहान भाग आहे. यश व कष्टाचे प्रमाण हे नेहमी कायम नसते. काही काळानंतर जरी कष्टाचे

प्रमाण वाढले तरी यश वाढणार नाही किंवा कमीही होईल.




९५% लोक या गरीबीच्या खडयात अडकुन पडतात आणि तेच लोकवर येतात जे ईश्वराच्या दोरीचा आधार घेतात. म्हणुन चांगले काम केल्याशिवाय भरभराट ही अशक्य आहे.

## ७) काही कमनशीबाची आणि भरभराटीच्या हानीची उदाहरणे

### घटना १

सरकारच्या आयात आणि निर्यात धोरणात बदल झाल्यामुळे अचूकपणा देणारी यंत्रे (Precision tools) ह्यांची आयात सहजसोपी झाली आणि श्री. खन्ना (प्रकरण क्र. १ मधील घटना क्र.४) ह्यांचा व्यापार धंदा बंद झाला. त्याचे मुलगे हे उत्पादन करण्यास राजी नव्हते. त्यामुळे त्यांनी यंत्र उत्पादन धंद्यात सहभाग दिला नाही. वाढत्या वयामुळे श्री. खन्नापण आपला उत्पादन निर्मिती व्यवसाय पुढे चालू ठेवू शकले नाही व शेवटी त्यांनी तो धंदा बंद केला. धडपड करणाऱ्या मुलांना नविन उद्योगात जास्त काही यश मिळाले नाही. कमी आमदनी परंतु उच्च जीवनशैली जगण्याची झालेली सवय ह्यामुळे त्यांचे आयुष्य दुःखमय झाले. वाढत्या तणावामुळे मेंदूवर परिणाम झाला. मेंदूतील रक्तस्त्रावामुळे श्री. खन्ना हे मरण पावले. ज्या कुटुंबाने मध्यम वर्गातून सुरुवात केली होती व उच्च दर्जावर पोहोचले होते शेवटी पूर्वीच्याच मध्यम वर्गाच्या दर्जाकडे त्या कुटुंबाला परत फिरावे लागले.

घटना क्र. २

श्री. मुजावर हे शिक्षक आणि अर्थशास्त्राचे विद्वान आहेत. कोल्हापूरजवळील एका लहानशा खेडेगावातील मध्यमवर्गीय कुटुंबात त्यांचा जन्म झाला. त्यानी परिश्रम करून अभ्यास केला, पदवी मिळविली, अर्थशास्त्राचा पण अभ्यास करून एक दिवस विद्वान बनले. त्यांना भारताच्या पंतप्रधानांकडून स्तुतिपत्र आणि बक्षीसपण मिळाले.

त्यांचा एकुलता एक मुलगा रियाझ हा अभ्यासात हुषार नव्हता. श्री मुजावरनी सर्व प्रयत्न केले पण ते त्यांच्या मुलाला शिकवू शकले नाहीत. रोजच्या मार खाण्यामुळे मुलगा बिघडला. तो १० वी इयत्तापण पास होऊ शकला नाही. तो प्रेमात पडला, त्याने लग्न करून त्याच्या सासुरवाडीला सासूसासऱ्यांबरोबर सांगली शहरात स्थायिक झाला. आज तो एक लहानसे दुकान चालवीत आहे. श्री. मुजावर ह्याचे मध्यमवर्गीय कुटुंब भरभराटीच्या अल्प काळाचा उपभोग घेऊन पुन्हा गरीब झाले.

घटना क्र. ३

श्री. वेंकटेश अय्यर हे एक उत्साहाने भरलेले, शिक्षणात उत्कृष्ट, खेळात प्रवीण व आकर्षक व्यक्तिमत्त्व असलेले सद्‌गृहस्थ होते. त्यांना चांगली नोकरी मिळाली. लवकरच त्याची भरभराट झाली व थोड्याच काळात ते त्यांच्या विभागाचे विक्री व्यवस्थापक बनले. त्यांना पुष्कळ पगार, कंपनीचा बंगला व ड्रायव्हर सकट गाडी मिळाली. श्री. अय्यर हे नेहमी फिरतीवर असायचे, तसेच फाजील आत्मविश्वास सतत धूम्रपान आणि दारु पिणे हे त्याचे गुणविशेष होते. एके दिवशी सिगारेट एका हातात व दारुचा पेला दुसऱ्या हातात अशा स्थितीत ते मेजवानीच्या ठिकाणी जमिनीवर कोसळून पडले व त्यांचे वयाच्या फक्त चाळीसाव्या वर्षी मेंदूतील रक्तस्त्रावामुळे दुःखद निधन झाले. त्यांच्या पश्चात त्यांची पत्नी, दोन लहान मुले यांना आमदनीचे काही साधन नव्हते. खुप कमी वेळात प्रचंड वेगाने यशाची भरारी घेतलेल्या कुटुंबाचे अचानकपणे गरीबीत रूपांतर झाले.

वरील उदाहरणे असे सूचित करतात की, बऱ्याचश्या घटनांमध्ये काही काळानंतर भरभराटीच्या मिळकतीमध्ये कमतरता होत जाते. ती स्थिर राहाते किंवा तिच्या मूळपदावर परत येते. बऱ्याच वेळा कुटुंबाने ज्या आर्थिक परिस्थितीपासून सुरुवात केली त्याच पदावर पुनरागमन होते.

आलेख (आकृती क्र.३) हा एक खड्डा आहे अशी कल्पना केली पाहिजे. मी त्याला गरिबीचा खड्डा असे नाव देतो. माणसे परिश्रम करतात, एका ठराविक मर्यादेपर्यंत प्रगति करतात पण जर त्यांनी त्यांच्या जीवनात यशाचा सल्ले देणारे नियम ह्यांचे अनुकरण केले नाही व त्यांची कार्ये ही उदात्त नसतील व त्यांचे चारित्र्य चांगले नसेल तर ते पुन्हा शेवटी खड्ड्याच्या तळाशी येऊन कोसळतात.

ह्या जगाचा पालनकर्ता परमेश्वर असे सांगतो.

*"ज्यांची ईश्वरावर श्रद्धा आहे, त्यांनी जणू ईश्वरी कृपेचा मजबूत दोरखंड धरला जो कधीही तुटणार नाही."* (पवित्र कुराण २:२५६सारांश)

## ८) तुम्ही गरिबीच्या साखळीत अडकला आहात काय?

नाश (Decay) आणि संहार (Destruction) ही एक नैसर्गिक क्रिया आहे. एखादा लोखंडी दांडा मोकळ्या जागेत ठेवा. तो गंजण्यास सुरूवात होईल व काही काळानंतर त्याचे मातीत रुपांतर होईल. चांगला बळकट किल्ला तयार करा व त्याकडे ध्यान न देता तसाच ठेवा. झाडे व झुडूपे त्याच्या सर्व भिंतीवर व पायावर वाढतील व काही शतकानंतर तो किल्ला ढासळून पडेल.

तसेच जर यशाकडे नीट लक्ष दिले नाही व योग्य रीतीने त्याचे जतन केले नाही, तर तो नष्ट होईल व गरिबी त्याची जागा घेईल. ही एक नैसर्गिक क्रिया आहे. म्हणून प्रत्येक माणूस हा गरिबीबद्दल संवेदनशील (Susceptible) असतो.

जेव्हा कुत्रा वेडसर होतो तेव्हा माणसे त्याला ठार मारतात. जेव्हा सिंह किंवा अन्य रानटी जनावर हा मनुष्यभक्षक बनतो, तेव्हा

सरकार त्यांला ठार मारते. जोपर्यंत ते समाजात शांती आणि एकोप्याने राहातात, तेव्हा त्यांचे अस्तित्व असते. जेव्हा ते प्राणी पिसाळतात तेव्हा त्यांना ठार मारले जाते. ही पण एक नैसर्गिक पद्धतच आहे.

ईश्वराने ह्या जगाची व मानवसमाजाची निर्मिती केली आहे. माता आपल्या लहान मुलावर जितके प्रेम करते, त्याच्यापेक्षा ईश्वर हा त्याच्यापेक्षा मनुष्यप्राण्यांवर जास्त प्रेम करतो. ह्या समाजात हजारो लोक असे आहेत, की जे पूर्णपणे सभ्य असून ईश्वराला घाबरतात. आणि त्यापैकी बरेचजण हे आर्थिकदृष्ट्या भरभराट संपन्न नाहीत. ईश्वर हा कोणावरही आर्थिक उत्कर्षाच्या आधारावर प्रेम करीत नाही. तो त्या व्यक्तीची माणुसकी आणि दयाबुद्धी ह्यांच्या तत्त्वानुसार प्रेम करतो. सध्या समाजात खूप गरीब व मध्यम वर्गीय लोक आहेत, त्यामुळे साहजिकच परमेश्वराचे प्रेम हे गरीब व मध्यम वर्ग लोक ह्यांच्यावर श्रीमंत समाजातील लोकांपेक्षा जास्त असते.

प्रत्येक माणसात चांगुलपणा व वाईटपणा हे गुण असतात. चांगला स्वभाव माणसाला समाज व मानवता ह्यासाठी चांगल्या गोष्टी करण्यासाठी प्रोत्साहन व चालना देतो, तर दुष्ट स्वभाव हा त्याला समुहांवर सत्ता गाजविण्यास चालना देतो. खूप संपत्ति गोळा करणे आणि बरोबरच्या सर्व साथीदारांच्या पुढे जाणे व त्यांच्यात हेवा आणि कमीपणाची भावना निर्माण करणे हे कार्य पण दुष्ट प्रवृत्ति करते.

जेव्हा माणूस हा आपल्या जोडीदाराचा स्वतःपेक्षा जास्त उत्कर्ष पाहतो, तेव्हा त्याच्या मनावर परिणाम होतो. तो निराश होतो व जोडीदाराचा हेवा करू लागतो, हा माणसाचा एक कमजोरपणा आहे. ही भावना दुःख देणारी असते व ती मनःशांती दूर घेऊन जाते. ह्या मत्सराच्या आगीमध्ये तो त्याला ईश्वराने दिलेली भरभराट पण आनंदाने उपभोगु शकत नाही. ईश्वराचे अत्यंत आवडते हे जास्त करून गरीब व मध्यमवर्गीय लोक आहेत, त्यांच्या हृदयातील ही दुःखे ईश्वराला आवडत नाहीत व तो त्या कारणाचा अंत करतो. ज्याप्रमाणे चावणाऱ्या कुत्र्याला नेहमी साखळीने बांधून एका जागी

ठेवले जाते, त्याचप्रमाणे अतिशय दुष्ट प्रवृत्तिच्या माणसाला जो सर्वावर अधिकार गाजवू इच्छितो, खूप संपत्ति साठवितो व आपले श्रेष्ठत्व हे दुसऱ्यावर दाखविण्याचा प्रयत्न करतो व दुसऱ्यांच्या अंतःकरणात द्वेष आणि दुःख निर्माण करतो अशा माणसाला ईश्वर कायमच गरिबीच्या साखळीने बांधून ठेवतो. जरी त्याची काही मार्गाने भरभराट झाली तरी जशी त्याला ती मिळते तशी ती ताबडतोब नष्ट होते. म्हणून उत्कर्षासाठी व धनवान बनण्यासाठी प्रथम तुमचा दुष्ट स्वभाव दाबून टाका व त्यावर नियंत्रण ठेवा. नेहमी विनयशील आणि सभ्य राहा. तुमची संपत्ति झाकण्याचा प्रयत्न करा. तुमची संपत्ति आणि ताकद ही गरीब आणि मध्यम वर्गीय लोकांवर प्रभाव पाडण्यासाठी व तुमचा श्रेष्ठपणा दाखविण्यासाठी वापरू किंवा दाखवू नका. शांतताप्रिय, निष्पाप लोकांना कधीही-कधीही-कधीही त्रास देऊ नका.

पुण्याच्या आणि चांगल्या कामांशिवाय कायमस्वरुपी उत्कर्ष हा अशक्य आहे.

**) पाप (Sin)**

अब्दुलाह शेठ हा समाजातील एक अत्यंत श्रीमंत माणूस होता. त्याच्याकडे खूप गोदामे, लाकडाच्या वखारी होत्या. त्याचा स्वतःचा घरबांधणीसाठी लागणाऱ्या सामानाचा पुरवठा करण्याचा व्यवसाय होता. त्याला इतका पैसा मिळत होता की, शेवटी त्याने तो मोजण्याचे थांबविले आणि त्याबद्दलची काळजी करण्याचे बंद केले.

त्याच्या एका मित्राने त्याला एका कोठयाचा (Brothel) मार्ग दाखवला. ते वातावरण त्याला अतिशय आवडले व तो त्याचा नियमित ग्राहक बनला. नाचगाण्याच्या मुजऱ्याच्यावेळी अब्दुलाह शेठ हा त्याच्या आवडत्या नर्तकीना हजारो रुपये भेट म्हणून देत होता. एके दिवशी त्याच्या नजरेला एक गिऱ्हाईक पडले जो त्याच्यापेक्षा जास्त पैसे भेट म्हणून देत होता. त्यामुळे अब्दुलाह शेठचा अहंकार दुखावला गेला. त्याचा असा समज होता की, उदारपणात त्याच्याशिवाय

दुसरा कोणी अन्य तोडीचा माणूस नाही.

प्रत्येक मुजरा नाचाच्या वेळी तो मारवाडी जातीचा ग्राहक हा अब्दुलाह शेठ नर्तकीना जितक्या भेटवस्तू अर्पण करीत असे त्यांच्यापेक्षा जास्त भेटवस्तू तो नाचणाऱ्यांना देत असे. त्यामुळे अब्दुलाहाचे मनस्वास्थ्य बिघडले. चिडलेल्या अब्दुलाहने एक हजार रुपयाची नोट काढली, त्यात तंबाखू भरून तिची सिगारेटसारखी नळी केली. व ती पेटवून ओढण्यास सुरूवात केली. ह्यामध्ये हेतू हा होता की, त्याच्याकडे इतकी संपत्ति आहे की त्याची त्याला किंमत नाही, हा प्रभाव पाडण्याचा एक मार्ग होता. मारवाडी हे संपत्तिला लक्ष्मी देवी (भरभराटीची देवी) मानतात व ते तिचा अपमान करीत नाही. म्हणून त्या मारवाडी ग्राहकाने आपली हार कबूल केली व ह्या नृत्यगृहामध्ये अब्दुलाहपेक्षा कोणीही अन्य उदारराजा नाही अशी मान्यता दिली.

पवित्र गीता सांगते, समय परिवर्तनशील आहे. म्हणजे वेळ ही नेहमी बदलत असते. त्याप्रमाणे अब्दुलाहच्या बाबतीत घडून आले. अव्यवस्थित कारभारामुळे त्याचा धंदा आणि उत्कर्ष ह्यांचे तुकडे तुकडे होऊ लागले. एकामागून एक त्याची सर्व गोदामे व दुकाने विकली गेली व असा एक दिवस उजाडला की त्यावेळी त्याच्याकडे काहीही शिल्लक राहिले नव्हते. पैसा नाही, मालमत्ता नाही, आणि त्याची मुले आणि नातेवाईक ह्यांनी त्याचा त्याग केला. ज्या अब्दुलाह शेठने अहंकारीपणामुळे कोणाचेही कधी स्वागत केले नाही. त्याला समाजातील वरिष्ठ लोकांनी रस्त्यावर भीक मागता मागता मरताना पाहिले आहे.

दुष्कर्मे ही भरभराटीच्या नावेला बुडवितात. म्हणून केवळ संपत्ति टिकवण्यासाठी पाप करू नका.

ईश्वर हा माणसाला कशासाठी निर्माण करतो? पैसा मिळविण्यासाठी? चांगली शहरे तयार करण्यासाठी? का चांगले बळकट सैन्य तयार करण्यासाठी?

त्याने मानवांची निर्मिती स्वतःची उपासना करण्यासाठी केली.

यक्ष किंवा देवदूत ह्यांना काही गरजा नसतात. त्यांच्या जीवनात फक्त एकच गोष्ट असते व ती म्हणजे ईश्वराची प्रार्थना. त्यांची प्रार्थना ही आपल्या प्रार्थनेसारखी मूल्यवान किंवा महत्त्वाची नसते. कारण आपल्या जीवनात आपणास खूप गरजा असतात व त्या पूर्ण करण्यासाठी आपण व्यस्त असतो. ह्या धकाधकीच्या व्यस्त जीवनात प्रार्थनेसाठी वेळ शोधून काढणे हीच एक मोठी गोष्ट आहे. म्हणुन देवदुतापेक्षा माणसाची प्रार्थना अधिक मूल्यवान असते.

आपण जशी प्रार्थना केली पाहिजे तशी करीत नाही. म्हणुन कमीत-कमी आपण त्याच्या विरोधी गोष्ट तरी करू नये. ईश्वराच्या संपर्कात राहण्यासाठी, त्याची कृपादृष्टी मिळण्यासाठी व कोप न होण्यासाठी, आपण पापकर्म करणे बंद केले पाहिजे. परमेश्वर हा अतिशय दयाळू आणि महान न्यायाधीश आहे. एखाद्याने कोणत्याही धर्माचे अनुकरण करावे. एखाद्यास न केलेल्या अपराधाबद्दल ईश्वर कधीही शिक्षा करणार नाही. म्हणून पापकर्म करण्याचे टाळा.

## ईश्वरी ग्रंथ काय सांगतात?

१) *मी प्रत्येक चुकीच्या मार्गाचा तिरस्कार करतो.*
(पवित्र बायबल PS ११९:१२८)

२) *मानवाने योग्य मार्गाने नम्रपणाने चालले पाहिजे.*
(पवित्र ऋग्वेद १०-३१-२)

३) *विश्वास ठेवा की ईश्वर एखाद्या अशा व्यक्तीला पसंत करत नाही जी आपल्या अहंभावात गर्विष्ठ असते व आपल्या मोठेपणावर अभिमान काहत असते. आणि असे लोकदेखील ईश्वराला पसंत नाहीत जे कंजुषपणा करतात आणि दुसऱ्यांनासुद्धा कंजुषपणाचा आदेश देतात व जे काही ईश्वराने आपल्या कृपेने त्यांना दिले आहे त्यास ते लपवितात.* (पवित्र कुराण ४:३६)

४) *तुम्ही ज्याप्रमाणे आचरण कराल त्याचप्रमाणे तुम्हाला त्याचे फळ मिळेल.* (यजुर्वेद २३-१५)

५) *हे शक्तिमान ईश्वर ! आमच्या अज्ञानामुळे आम्ही चुका करतो*

*व त्रास भोगतो. आम्हाला कृपया मार्गदर्शन कर व मदत कर!*

(पवित्र ऋग्वेद ७-८९-३)

६) *ही गोष्ट तुझा पालनकर्ताच जास्त जाणतो की त्याच्या मार्गापासुन कोण भटकला आहे आणि कोण सरळमार्गावर आहे, आणि पृथ्वी व आकाशाच्या प्रत्येक वस्तुचा स्वामी ईश्वरच आहे जेणेकरुन ईश्वराने वाईट करणाऱ्यांना त्यांच्या कृत्यांचा बदला द्यावा आणि त्या लोकांना चांगल्या मोबदल्याने उपकृत करावे .* (पवित्र कुराण ५३:३१)

७) *प्रत्येक श्वासोच्छवास हा जुगाऱ्याला शाप देतो, त्याची पत्नी त्याचा त्याग करते आणि जुगारी माणसाला कोणीही कर्जाऊ पैसा देत नाही. म्हणून हे जुगाऱ्यांनो ! शेती करा, आणि जुगार खेळणे सोडून द्या. व शेती करुन जे काय तुम्ही मिळवाल त्यात समाधानी राहा.*

(पवित्र ऋग्वेद, १०-३४-३)

८) *दारू पिणारे स्वतःवरील ताबा गमावून बसतात. ते अशी कामे करतात त्यामुळे ईश्वराला राग येतो म्हणून ईश्वरही अशातऱ्हेच्या लोकांना बिलकूल मदत करत नाही.* (पवित्र ऋग्वेद, २१४-१४)

९) *तुम्ही जे काही करता त्याची दोन फरिश्ते नोंद घेतात आणि लिहून ठेवतात. न्यायनिवाड्याच्या दिवशी तुम्ही हे नोंदणी पुस्तक पाहू शकाल.*

(पवित्र कुराण ८२, १०-१२ सारांश)

१०) *आम्ही मानवाला उत्कृष्ट रचनेत निर्माण केले, मग उलट फिरवून आम्ही त्याला निकृष्टात निकृष्ट करुन टाकले, त्या लोकांखेरीज ज्यांनी श्रद्धा ठेवली आणि सत्कृत्ये करीत राहीले की त्यांच्यासाठी कधी न संपणारा मोबदला आहे.* (पवित्र कुराण ९५ :५-६)

११) *हे श्रद्धावंतानो, दारू आणि जुगार व वेदी आणि शकून ही सर्व अमंगल शैतानी कामे होत, त्यांच्यापासुन दूर राहा, आशा आहे की तुम्हाला यश मिळेल.* (पवित्र कुराण ५-९०)

१२) *न्यायनिवाडा होणाऱ्या दिवशी तुम्ही अगदी कणा इतके केलेले पाप पण पाहू शकाल तसेच चांगले केलेले कणभर कामही तुम्ही पाहू शकाल.*

(पवित्र कुराण ९९ : ७-८)

१३) *ईश्वराबद्दल भितीयुक्त आदर बाळगा आणि पाप करण्यापासुन दूर राहा.* (पवित्र बायबल, Prove ३:७)

## शहाणपणा शिकविणारी पुस्तके काय सांगतात?

खालील गोष्टी ह्या गरिबी आणण्यास कारणीभूत आहेत.

१) घरांमध्ये कोळयाचे जाळे असणे
२) खोट्या शपथा घेणे
३) व्याभिचार (स्वतःच्या पत्नी खेरीज दुसऱ्या बाईशी संभोग) बायका ज्या त्यांच्या पतीशी एकनिष्ठ नाहीत.
४) सूर्यास्ताच्या थोडयावेळापूर्वी किंवा थोडयावेळानंतर झोपणे.
५) विशेषतः सूर्यास्तानंतर भिकाऱ्याला रिकाम्या हाताने परत पाठविणे
६) नातलगांशी गैरवर्तणूक व शेजाऱ्यांना त्रास देणे
७) स्वतःच्या मुलांना शाप देणे
८) पालक आणि शिक्षक ह्यांच्याशी गैर रीतीने वागणे
९) फुटक्या काचेच्या पेल्यामधून पाणी पिणे
१०) सूर्योदयानंतर झोपणे
११) खाण्याच्या वस्तूंना (अन्नाला) मान न देणे
१२) धार्मिक पुस्तकांचा अपमान करणे

## १०) प्रार्थना (Prayer)

एखादी मोठी पाण्याची लाट दगडावर येऊन आदळते आणि सर्व दिशेला उधळते आणि विखरून जाते व शेवटी समुद्राला परत येऊन मिळते. पण त्या दगडाला काहीही होत नाही. तथापि त्याच दगडावर सतत पडणाऱ्या पाण्याचा एक थेंब त्या दगडाला भोक पाडतो. त्याचप्रमाणे लहानशा प्रार्थनेमध्ये आपले विधिलिखित बदलून टाकण्याची परिणामकारक शक्ति असते.

याउलट आपण फक्त संकटाच्या वेळीच ईश्वराकडे वळतो. आपण प्रार्थना करतो, उपवास करतो, देणगी देतो आणि चांगल्या गोष्टी करतो. पण आपल्या अडचणी दूर झाल्या की, आपण पुन्हा आपल्या लक्ष्यहीन जीवनाकडे परततो.

आपणा सर्वांना लहानपणापासूनच प्रार्थना करण्यास शिकविले गेले आहे. म्हणून आपण हे संस्कार धरून ठेवले पाहिजे. कारण शेवटी ईश्वरच हा आपल्या जीवनात आणि आपल्या वारसदारांच्या जीवनात भरभराट टिकवून ठेवणार आहे. प्रत्येक दिवशी आपण ईश्वराकडे प्रार्थना केली पाहिजे. प्रार्थनेमुळे आपल्या जीवनात ज्या दुर्घटना घडून येणार होत्या त्या थांबतात किंवा टाळल्या जातात.

**शेवटच्या संदेश वाहकाने** (प्रेषिताने *Pbuh)* असे सांगितले,

ईश्वर सांगतो,

*हे आदमच्या मुलांनो ! माझी प्रार्थना करण्यात मग्न राहा आणि मी तुमचा उत्कर्ष करीन व तुमची दुःखे संपवून टाकीन. आणि जर तुम्ही असे केले नाही तर मी तुम्हाला सतत कष्ट करावयास लावीन व तुमची गरीबी आणि संकटे कधीही संपविणार नाही.* (हदीस-इब्ने माजाह ४१०७)

"*मला योग्य मार्ग दाखवा ! हे लॉर्ड ! मला तुमचा मार्ग शिकवा.*"

(पवित्र बायबल PS २५:४)

### पवित्र धर्मग्रंथ काय सांगतात?

१) *जो ईश्वरावर विश्वास ठेवीत नाही तो ईश्वराचा शत्रू आहे.*

*ईश्वर स्वत:च्या शत्रूचा नाश करतो.* (ऋग्वेद २-१२-५)

२) *तो एक सर्वश्रेष्ठ, श्रीमंत आणि सर्वसंपन्न आत्मा आहे. तो त्याच्या दूतांना शिकवणुकी देऊन पाठवितो. ज्यामुळे गरिबांचे कल्याण आणि भरभराट होते. संपत्ति ही ईश्वराच्या मेहेरबानीने मिळते व त्याच्या कोपामुळे नाश पण पावते.* (ऋग्वेद)

३) *जे त्याची स्तुति करतात त्यांच्यावर सर्वशक्तिमान ईश्वर श्रीमंतीचा वर्षाव करतो. तो मौल्यवान सूर्यदेवाचाही ईश्वर आहे. तो माणसाच्या व्यवहारांची देखभाल करतो. तो पूजाअर्चेचे प्रतिक आहे. तो उदार आहे. तो जे त्याची घरात पूजा करतात त्यांची काळजी घेतो.* (ऋग्वेद २-१-७)

४) *हे ईश्वरा ! आमच्या फायद्यासाठी आम्हाला योग्य तो मार्ग दाखविण्याचे मार्गदर्शन करा.* (यजुर्वेद ४०-१६)

५) *हे परमेश्वरा तू सज्जनांवर कृपा करतोस. हे तुझे वैशिष्ट्य आहे.* (ऋग्वेद १-१-६)

६) *जे नियमितपणे प्रार्थना करतात आणि त्यांच्या आयुष्याच्या अखेरच्या दिवसापर्यंत दानधर्म करतात व ईश्वरावर श्रद्धा ठेवतात त्यांना आम्ही लवकरच चांगला मोबदला देऊ.* (पवित्र कुराण ४:१६२)

७) *हे पैगंबर (स.) पठण करा या ग्रंथाचे जो तुमच्याकडे दिव्यबोधव्दारे पाटविला गेला आहे आणि नमाज कायम करा, निश्चितच नमाज, अश्लील व उपकृत्यांपासुन रोखते आणि ईश्वराचे स्मरण याहूनही मोठी गोष्ट आहे. ईश्वर जाणतो तुम्ही लोक जे काही करता.* (पवित्र कुराण २९:४५)

८) *हे लोकहो ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, तुमची मालमत्ता आणि तूमची संतती तुम्हाला ईश्वराच्या स्मरणापासून गाफिल करुन टाकू नये. जे लोक असे करतील तेच तोट्यात राहणारे आहेत.* (पवित्र कुराण ६३:९)

९) *मी तुझ्यावर जी कृपादृष्टी केली आहे त्याबद्दल माझे आभार व्यक्त कर. त्याबदलात मी तुझ्यावर आणखी जास्त कृपाप्रसादाचा वर्षाव करीन. जर तू नकार दिलास तर खरोखर माझी शिक्षा ही कडक आहे.* (पवित्र कुराण १४:७)

१०) *जर तुमची खरी श्रद्धा व विश्वास असेल तरच तुम्ही यशस्वी व्हाल.* (पवित्र कुराण ३:१३९ सारांश)

११) *जे मी दाखविलेल्या मार्गाने जातात त्यांच्यावरच कृपादृष्टी होते.* (पवित्र बायबल, Prove ८:३२)

१२) *कायम टिकणारे (शाश्वत) जीवन ही ईश्वराची देणगी आहे.*

(पवित्र बायबल,Rom ६:२३)

१३) *सदाचरणी माणसाची ताडाच्या* (Palm tree) *झाडाप्रमाणे भरभराट होते.* (पवित्र बायबल, PS ९२:१२)

## शहाणपणाची पुस्तके काय सूचित करतात?

शहाणपणाच्या पुस्तकानुसार खालील गोष्टीमुळे भरभराटीत वाढ होते.

१) मातापित्यांना योग्य वागणूक देणे.
२) नियमित प्रार्थना आणि उदारपणाने दानधर्म.
३) प्रामाणिकपणाने धंदा करणे.
४) सकाळी लवकर जागे होणे.
५) चांगले सामाजिक जीवन.
६) भौतिक जीवनापेक्षा मृत्यूनंतरच्या जीवनाला जास्त प्राधान्य देणे व ईश्वरावर दृढ विश्वास ठेवणे.
७) व्यवसाय करताना पैसे कमावतांना सहनशील राहणे.
८) पाहुण्यांना मान देणे.
९) धार्मिक पुस्तकांचा आदर करणे.
१०) कुटुंबाशी दयाबुद्धीने वागणे.
११) परमेश्वराचे नेहमी आभार मानणे.
१२) अन्नाचा मान ठेवणे व त्याची उधळपट्टी न करणे.

## ११) गरिबीच्या कारणांचा संक्षिप्त अहवाल



**वरील आकृतीचे स्पष्टीकरण :-**

गरिबी निर्माण करण्यास व कायम ठेवण्यास कारणीभूत असलेल्या सर्वसामान्य गोष्टी :-

**१) गरिबीचा खड्डा -**

हा निसर्गाचा एक साधारण नियम आहे की, जो कोणी योग्य त्या मानसिक आणि शारीरिक प्रयत्नांनी त्याचा उत्कर्ष कायम ठेवणे व वाढविणे ह्यासाठी धडपड करीत नाही आणि ईश्वराच्या कृपादृष्टीचा आधार घेत नाही. तो अखेर गरिबीच्या खड्ड्यात कोसळतो व तेथे बराच काळ राहातो.

**२) नकारात्मक स्वभाव**

ज्यांचा स्वभाव हा पुढीलप्रमाणे आहे ते गरिबीच्या साखळीला जोडलेले असतात.

- पैशाची, आणि साधनसामुग्रीची नासाडी.
- दुष्ट स्वभाव, म्हणजेच दुसऱ्याला उपद्रव देणे आणि दुसऱ्या माणसांचा अपमान करणे.
- पाप करणे आणि अशा सवयी ज्यामुळे ईश्वराचा कोप ओढवून घेणे.
- वारसाहक्काने आलेली गरिबी व संकटे ह्यांच्यामधून बाहेर पडण्याची इच्छाशक्ति, प्रयत्न व ज्ञान ह्यांची उणीव

**३) गरिबी निर्माण करण्यास कारणीभूत असे बाह्य प्रभाव व घटक**

- असभ्य समाज किंवा शहरामध्ये राहाणे
- वाईट लोकांची संगत
- जन्मस्थान, जात आणि धर्म ह्यांच्यावर आधारलेल्या तिरस्कार व सांप्रदायिक भावनांचे बळी पडणे. तसेच नातलग जिवलग मित्रांकडून मत्सरामुळे बळी पडणे.



१२) भरभराटीच्या कारणांचा संक्षिप्त वृत्तांत
ईश्वराच्या दोरखंड (मदत). जे ह्याचा आधार घेतात ते कधीही गरिबीच्या खड्ड्यात पडत नाहीत. (म्हणून ईश्वरावर विश्वास ठेवा, त्याच्या आज्ञापालन करा. पापे करून त्याच्या क्रोधाला आमंत्रण करू नका).
धार्मिक व .
श्रद्धावान लोकांची कृपादृष्टी व आशावादी लोकांची संगत ह्यांमुळे गरिबीच्या खड्यातून बाहेर पडण्यास मदत मिळते.
स्वच्छ मन, स्वच्छ शरीर, स्वच्छ अन्न, स्वच्छ कामाची ठिकाणे, स्वच्छ व ईमानदारीने मिळवलेले धन, ह्यांमुळे वाईट गोष्टींपासून दूर राहाण्याचे संरक्षण मिळते.
दानधर्म, देणगी व चांगले ध्येय ह्या गोष्टी गरिबीच्या खड्यातून बाहेर येण्यासाठी जिन्यासारख्या उपयोगी पडतात. त्यामुळे उत्कर्ष हा भराभर होत जातो.

## उत्कर्ष वा भरभराट होण्याची कारणे

१) दानधर्म आणि समाजसेवा ह्या दोन मार्गांनी मानवजातीची सेवा केल्याने भरभराट ही वेगाने वाढते. हे पुण्याचे काम गरीबीच्या खडयातुन बाहेर पडण्यास शिडीसारखी मदत करते.

२) भरभराटीची प्रार्थना केल्याने प्राप्तीमध्ये वाढ होते. संपुर्णपणे तन, मन, धनाने (व्यवहारात) स्वच्छ राहिल्याने दुष्ट प्रवृत्ती व वाईट लोकांपासुन आपला बचाव होतो.

३) ईश्वरावर पूर्ण निष्ठा ठेवून व त्याच्या आदेशांचे पालन करून त्याचा दोरखंड (आधार) पकडून ठेवल्यामुळे स्थिर आर्थिक परिस्थितीची खात्री मिळते व त्यामुळे दारिद्र्याच्या खड्ड्यात पडण्यापासून संरक्षण होते.

४) सकारात्मक वृत्तिच्या लोकांची संगत व आईवडिल आणि अन्य संतमंडळी ह्यांचेकडून मिळणारे आशीर्वाद. ह्यामुळे भरभराटीचा आणि यशाचा कठिण संघर्ष, हा सोपा आणि साध्य करण्याजोगा बनतो व त्यामुळे एखादया व्यक्तिस गरिबीच्या खड्ड्यातून बाहेर पडण्यास मदत मिळते.

### *प्रकरण क्र. २८*

# देणगी

## (Donation)

• असे समजा की, तुम्ही तुमच्या कुटुंबियांसह म्हणजे तुमची पत्नी व लहान मुलगी ह्यांच्यासह सुटी घालविण्यासाठी किंवा व्यवसायाच्या कामानिमित्त एखाद्या अपरिचित प्रदेशात गेला आहात. जेव्हा तुम्ही बाजारातील रस्त्यावरून चालत होता, त्यावेळी काही लुटारू आले आणि तुमची लूटमार करू लागले. त्यावेळी तुमच्या भोवताली असलेल्या सामान्य जनतेकडून तुमची काय अपेक्षा असेल? तुम्ही त्या प्रदेशात अपरिचित आहात हे ध्यानात ठेवा. तुम्ही त्यांच्या सरकारला कर दिले नसतील किंवा कोणावर तेथे मेहेरबानी केली नसेल, तर लोकांनी तुमचे रक्षण करण्यासाठी त्यांचा जीव धोक्यांत का घालावा?

स्वतःचे संरक्षण करताना तुम्ही मारले गेलात आणि तुमचे प्रेत रक्ताच्या थारोळ्यात पडले आहे. भटकी कुत्री तुमच्या देहाचे तुकडे छिन्नविछिन्न करीत आहेत. तुम्ही त्या समाजाकडून काय अपेक्षा कराल?

त्या ठिकाणचा समाज आणि लोक ह्यांनी तुमचा देह पुरण्यासाठी त्यांचे पैसे का म्हणून खर्च करावेत? कारण ते तुमचे नातेवाईक किंवा मित्र नाहीत.

दरोडेखोरांनी नंतर तुमच्या मुलीला आणि बायकोला एखाद्या कोठयात (brothel) विकण्यासाठी म्हणून पळवून नेले. तर तुम्ही त्या समाजाच्या प्रतिष्ठित लोकांनी आणि कायदा आणि सुव्यवस्था यंत्रणेने काय करावे अशी अपेक्षा कराल? ते तुमच्या कुटुंबाचे दुष्ट लोकांपासून रक्षण करतील काय? पण तुम्ही त्या प्रांताच्या सरकारला काही करभरणा केलेला नाही किंवा त्यांच्या मानवाधिकार संस्थेला काही देणगी दिलेली नाही. मग त्यांनी तुमच्या कुटुंबाचे संरक्षण करण्यासाठी का म्हणून पुढे यावे?

तुम्ही इतरांकडून जी अपेक्षा करता तुमच्या आयुष्यात तुम्ही अशाच परिस्थितीमध्ये हताश झालेल्या माणसासाठी काही केले आहे का? प्रत्यक्षात मानवप्राणी हा अत्यंत स्वार्थी आहे. आपण दुसऱ्यांकडून खूप अपेक्षा करतो, पण जेव्हा आपली पाळी येते तेव्हा आपण दुसरीकडे नजर फिरवतो.

• सिंह हा जंगलाचा राजा आहे. काही थोडेच प्राणीच त्या सिंहाच्या श्रेष्ठपणाला आव्हान देतात. कारण ते बलवान आहेत म्हणून नाही तर ते एका शिस्तबद्ध कुटुंबात राहात असतात. सिंह क्वचितच शिकार करतो. पण घुसखोरांपासून त्याच्या प्रदेशावर आक्रमण होण्यापासून व अन्य सिंहापासून त्याच्या इलाख्याचे रक्षण करण्यावर भर देतो. सिंहीण शिकार करते, आणि त्या भक्ष्याचे तिच्या अन्य कुटुंबियातील सभासदांना खाऊ घालून त्यांचा वाटा त्यांना देते.

सिंहीणी लहान छाव्यांना अंगावर दूध पाजतात व त्यांच्यावर प्रेम करतात. "जो धडधाकट आहे तोच जगेल" हा जंगलाचा एक अलिखित कायदा आहे. पण सिंहाच्या कुटुंबात दुर्बल आणि आजारी सिंहीण पण जगू शकते. इतर प्राण्यांची पिल्ले ही त्यांच्या आईबापांच्या मृत्यूनंतर उपाशी राहातात आणि मरतात. पण सिंहाच्या पिल्लांच्या बाबतीत ही गोष्ट घडून येत नाही. आपल्या आईबापांच्या मृत्यूनंतर पण ते कुटुंबात जगतात. सिंहाच्या कुटुंबातील सर्व सभासद अनाथ

पिलांवर प्रेम करतात व इतर अन्य सिंहीणी अनाथ पिलांना आपल्या अंगावर स्तनपान करण्यास परवानगी देतात. ईश्वराने सिंहासाठी जी जीवनपद्धति निर्माण केली, त्यापेक्षाही सरस जीवनपद्धति त्याने मानवासाठी निर्माण केली होती. परंतु आपण स्वार्थी माणसे कोल्हयाप्रमाणे कावेबाज आणि एकाकी जीवन जगणे पसंत करतो.

- परमेश्वराने आपणास निर्माण करून असे सांगितले नाही की, जा आणि एकत्रित कुटुंबातील सभासद म्हणून जगा. पण त्याने असे म्हटले, *"मानवी समाज हे माझे कुटुंब आहे. आणि प्रत्येक व्यक्ति ही माझ्या कुटुंबाचा सभासद आहे."* (हादिस)

न्यायनिवाड्याच्या (प्रलयाच्या) दिवशी परमेश्वर एखाद्या माणसाला विचारेल, *"मी भुकेला व तहानेला होतो. तू मला अन्नपाणी दिले नाहीस? मी आजारी होतो पण तू माझ्याकडे दुर्लक्ष केलेस." त्यावेळी तो माणूस म्हणेल,"हे ईश्वरा! तू सर्वांना निर्माण केलेस. तेव्हा तू भूकेला व आजारी कसा होशील?" ईश्वर उत्तर देईल,"अमुक अमुक व्यक्ति भुकेली व आजारी होती. जर तू त्यांला खाऊपिऊ घालून, त्यांची सेवा केली असतीस तर मी तुला त्यांच्याजवळ मिळालो असतो."* (हादिस)

आपल्या क्षुद्र मनामुळे आपण मोठ्या कुटुंबाची कल्पना आपल्या मनात रुजवू शकलो नाही. पण ईश्वराने ह्या गोष्टीकडे दुर्लक्ष करणे हा अपराध आणि पाप आहे असे जाहिर केले आहे. ही एक महत्त्वाची व जरुरीची बाब लक्षात ठेवण्यासारखी आहे.

- ऋग्वेद सांगतो,"जर एखादा आपली कमाई स्वतः एकटाच खात असेल तर तो पाप खातो असे समजावे." (पवित्र ऋग्वेद १०-११७-६)

म्हणजेच जर एखादा त्याच्या स्वकष्टाने मिळविलेल्या उत्पन्नाचा उपभोग एकटाच घेत असेल, तर ते लूटमार केलेली संपत्ति खाण्यासारखे किंवा दुसऱ्याचे पैसे चोरून खाण्यासारखे आहे.

- जो मानव त्याच्या मिळकतीच्या संपत्तिचा एक भागसुद्धा गरिबांना देत नाही त्या माणसाची ईश्वराने इस्लामधर्मातून हकालपट्टी केलेली आहे.

• ईश्वराने पवित्र कुराणात सुमारे १५० वेळा दानधर्म करावा, असा हुकूम जारी केला आहे. प्रकरण क्र. ९ श्लोक ६० मध्ये त्याने खालील गोष्टीवर पैसे खर्च करण्याची आज्ञा दिली आहे.

१) *गरिब लोक (ज्यांच्याकडे उत्पन्नाचे साधन नाही.)*

२) *गरजवंत वा गरजू (माननीय पण समाजातील, खालच्या दर्जातील लोक)*

३) *जे ज्यांची सेवा ही पैसे गोळा करणे व वाटणे (देणगी) ह्यासाठी देऊ करतात त्यांचा पगार.*

४) *लोकांना चांगल्या कामांसाठी आकर्षित करणे*

५) *गुलामांची सुटका करण्यासाठी.*

६) *जे कर्जाच्या सापळ्यात अडकले आहेत त्यांची सुटका करणे.*

७) *वाटसरू (ज्या प्रवाशांचे पैसे प्रवासात हरवले ते)*

८) *ईश्वराचा संदेश सर्वत्र पसरविणे*

(पवित्र कुराण ९ : ६०)

• विश्वास हा धर्माचा आधार आणि पाया आहे. धार्मिक विश्वास म्हणजे ईश्वराचे अस्तित्वाचा शारीरिक पुरावा नसला तरीही त्याच्यावर दृढ श्रद्धा ठेवणे. तसेच स्वर्ग, नरक देवदूत आणि न्यायनिवाडा दिवस (प्रलयाचा दिवस) ह्यांचा काहीही पुरावा नसला तरी त्यावर विश्वास ठेवणे.

जर ईश्वर, नरक व स्वर्ग हे दिसले तर ईश्वरावर विश्वास ठेवण्यात काहीच अर्थ नाही. ते जर दिसु लागले तर ईश्वरावर श्रद्धा ठेवण्याची, त्याची प्रार्थना करण्याची व कायमस्वरूपी स्वातंत्र्य मिळविण्याची संधिच संपेल. म्हणूनच ईश्वराचे अस्तित्व व अन्यसंबंधित गोष्टी दाखविणारे चमत्कार वारंवार नियमितपणे घडत नाहीत.

• समजा, एखाद्या मुलाचे आईवडिल अपघातात मेले व

ईश्वराला त्या अनाथ बालकाचे पालनपोषण करावयाचे आहे तर तो ते कसे करील बरे? देवदूत हे काही दूधाची बाटली हातात घेऊन पृथ्वीवर येत नाहीत. तर ईश्वर हा त्या अनाथ बालकाच्या जवळपासच्या नातेवाईकांची मिळकत वाढवील व त्याद्वारे अनाथ बालकाचे पालनपोषण करील.

त्याचप्रमाणे समाजात एखादी गरीब आणि म्हातारी विधवा बाई असेल जिच्याकडे उत्पन्नाचे काही साधन नाही. अशावेळी अन्नपाणी हे स्वर्गातून तिच्यासाठी खाली पडणार नाही, तर समाजाच्या सुस्थापित सभासदांच्या उत्पन्नाच्या माध्यमाद्वारे तिला मिळेल. म्हणून जर एखादी व्यक्ति स्वकष्टाची कमाई एकटीच खात असेल, तर कदाचित तो एखाद्या अनाथ बालक किंवा विधवा बाई ह्यांचा पैसाही खात आहे असे आपण म्हणु शकतो. म्हणजेच स्वकष्टाची कमाई ही एकट्याने खाऊन तिच्यातील वाटा लायक व्यक्तिंना न देणे म्हणजेच ते दुसऱ्यांचा पैसा खाण्यासारखे आहे. ही फसवणूक आहे, हा गुन्हा आहे. ऋग्वेदाप्रमाणे ती व्यक्ति पाप खात आहे ह्यात संशयच नाही व अशी व्यक्ति ही धर्मातून हकालपट्टी करण्याच्या लायकीची आहे (कुराणाप्रमाणे).

अंतिम प्रेषित (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) यांनी सांगितले,

***"मला संतुष्ट करण्यासाठी समाजाच्या दुबळ्या घटकांची मदत करा. कारण ईश्वर तुम्हाला साहाय्य करतो व त्यांच्यामुळे तुम्हाला भरभराट मिळते."***
(मस्नद अहंमद १९८/५, अबू दाऊद, एच २५९१, १८३/७, तिर्मिजी अल् जिहाद १७५४)

पैगंबर (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) यांनी असेही सांगितले,***"तुमच्या जास्त मिळकतीच्या रक्कमेच्या पैकी कमीतकमी २.५ टक्के रक्कम देणगी म्हणून द्या."*** (हादिस)

- ईश्वर हा काही हुकूमशहा नाही तो त्याच्या प्राणीमात्रांवर प्रेमळ आईपेक्षा ९९ टक्के जास्त प्रेम करतो. तो अधिक प्राप्ति झाल्यावर २.५ टक्के रकमेच्या दंडाची शिक्षा लादत नाही. परंतु गोरगरीबांना २.५ टक्के दान केले, तर ईश्वर हा त्या दानशूराला

कायमस्वरुपी भरभराटीची खात्री देतो. तो त्याला आजारपण, अपघात व वाईट मार्गाने होणारा खर्च ह्यांपासून वाचवितो. तो त्याची भरभराट वाढवीत जातो आणि त्याला सतत श्रीमंत ठेवून कधीही गरीबीची वेळ त्याच्यावर येऊ देत नाही. ज्यामुळे त्या दानशूराला दुसऱ्यांकडे कधीही देणगी मागावी लागत नाही.

- मी स्वतः असा अनुभव घेतला आहे की, जशी जशी आपली परोपकारी वृत्ति वाढत जाते, त्यानुसार ईश्वर हा आपले जीवनमान उंचावतो माझ्या वैयक्तिक अनुभवावरून तुम्हाला साधारण कल्पना येईल.

काही करून मी १००० चौ. फूटाचा फ्लॅट विकत घेतला. तथापि तो  फ्लॅट सुशोभित करण्यासाठी पैसे खर्च करण्याची माझी आर्थिक परिस्थिती नव्हती. जमीन ही अत्यंत घाणेरडी होती व मला जमीनीची तक्तपोशी (Tiles) अतिशय तातडीने बदलावयाची होती. पण सुंदर असा इटालियन मार्बल खरेदी करण्यासाठी माझ्याकडे पुरेसे पैसे नव्हते. मी त्या निराशेमध्ये पाच वर्षे काढली.

माझा एक गरीब कामगार जेम्स ह्याचा विवाह होणार होता. तथापि तो माझ्या जुन्या कर्जफेडीची रक्कम देऊ शकत नसल्यामुळे मी त्याला नवीन कर्ज देण्यास नकार दिला.

जेम्स हा लग्न करण्यासाठी अगदी उतावळा झाला होता. म्हणून त्याने एका सावकाराला गाठले आणि दरमहा ५ टक्के व्याजदराने कर्ज काढावयास तयार झाला. हा व्याजाचा दर खूप प्रचंड होता त्यामुळे मला समजून चुकले होते की जरी जेम्स हा कर्ज घेत होता तरी त्याची परतफेड तो त्याचे घर, किंवा त्याच्या कुटुंबाचे दागदागिने विकून टाकल्याशिवाय करू शकणार नव्हता.

जरी माझी आर्थिक परिस्थिती बिकट होती, तरीसुद्धा मी जेम्सला पुन्हा कर्जाऊ पैसे देण्याची व्यवस्था केली. या प्रसंगानंतर काही दिवसांनी माझ्या फ्लॅटमध्ये सुंदर कारपेट आला. त्या कारपेटची किंमत ही मार्बलच्या टाईल्सच्या किंमतीच्या फक्त १० टक्के होती.

मी ते पहिल्याच दिवशी खरेदी करू शकलो असतो जेव्हा मी फ्लॅट विकत घेतला त्यावेळी. परंतु चैनीची वस्तू आणि सुंदर घराचे सुख हे माझ्या नशीबात लिहिलेले नव्हते. म्हणून मी मार्बलयुक्त फ्लॅटचे स्वप्न पाहत वाट बघत बसलो. पण त्या प्रसंगानंतर ईश्वराने माझ्या नशिबात बदल घडवून आणला आणि माझ्या त्याच बिकट आर्थिक परिस्थितीत सुद्धा सुंदर गालिचाचे सुख व समाधान माझ्या नशीबात दिले जे माझ्या पायाखाली होते आणि त्याचे मी कौतुक करीत होतो.

• जेव्हा प्रेषित मूसा (अलैहि सलाम) पर्वतावर ईश्वराची आज्ञा घेण्यासाठी गेले, तेव्हा सामीरीने लोकांनी वासराची पूजा करावी ह्यासाठी चिथावणी दिली. जेव्हा प्रेषित मूसा आज्ञासकट परत आले व त्यांना लोक हे वासरांची पूजा करताना दिसले. ते इतके भडकले की त्यांनी ज्या दगडाच्या पाटीवर आज्ञा लिहिल्या होत्या, त्या खाली फेकून दिल्या व जे वासरांची पूजा करीत होते, त्यांना स्वतःलाच ठार मारून घेण्याची आज्ञा केली. तथापि त्यांनी प्रेषित मुसा यांना देवदूत ग्रॅब्रियल यांनी सामिरीला ठार न मारता सोडून देण्यास सांगितले. कारण सामिरी हा अत्यंत दयाळू होता. (किमियाए सादत लेखक इमाम गझाली, पान क्र.५८५ प्रकरणाचे नाव उदारपणाचे महत्त्व आणि त्याचा आशीर्वाद.)

वरील प्रसंग असे सूचित करतो की, दयाळू माणूस किती मूल्यवान आहे. अशा लोकांकडुन चुकून जरी पाप घडले तरी एखादेवेळी ईश्वर त्यांना क्षमा करेल.

• दानशूरपणा ही गरीबीच्या खळग्यांतून बाहेर पडण्याची एक पायरी (किंवा शिडी) आहे. मोठ्या कष्टाने कमावलेली भरभराट जास्तीत जास्त काळापर्यंत टिकविण्यासाठी हा एक भरवशाचा मार्ग आहे. ईश्वराची कृपादृष्टी आणि मान मिळविण्याचा हा एक खात्रीचा मार्ग आहे. हा दानधर्म नाही तर भौतिक आणि परमार्थिक ह्या दोन्ही जगातील यशाचा जीवनविमा आहे. तसेच समाजातील गरीब लोकांसाठी आपल्या मिळकतीचा थोडा भाग खर्च करणे, हे ही आपले नैतिक कर्तव्यच आहे.

ईश्वराने सदाचारी लोकांची अशा शब्दात प्रशंसा केली आहे.

*"सदाचारी लोकांच्या मिळकतीत जे उघडपणे मागतात (भिकारी) आणि जे स्वस्थ बसतात (माननीय पण समाजातील गरीब लोक) ह्या दोघांचाही वाटा आहे."* (पवित्र कुराण ५१ :१९)

(म्हणजेच सदाचारी व्यक्ति त्यांच्या मिळकतीतील काही भाग हा गरिबांना वाटतात किंवा नियमितपणे देणगी देतात.)

• मी माझी बी. ई. (मेकॅनिकल) ची पदवी परीक्षा १९८३ मध्ये ७६ टक्के गुण मिळवून वालचंद कॉलेज ऑफ इंजिनियरिंग सांगली येथून पूर्ण केली. जरी माझा शैक्षणिक आलेख हा उत्तम होता तरी माझी अत्यंत खराब तब्येत व व्यक्तिमत्त्व ह्यामुळे मला नोकरी मिळू शकली नाही. मी काही काळ बेकार राहिलो व असहायपणाने एक लहान वर्कशॉपमध्ये नोकरीला लागलो. माझे वर्गमित्र जेथे ४००० रुपये पगार अधिक अवांतर प्राप्ति मिळवित होते, तेव्हा मला फक्त १३५० रुपये पगार मिळत होता. जेव्हा मी लहान मुलांसाठी रात्रीचा वर्ग सुरू केला त्यावेळी माझे विधिलिखित बदलले. मी आणि माझा शेजारी ह्यांनी प्रत्येकी १५० रुपये वर्गणी काढली आणि एका माणसाने त्याचा दिवसाचा एक तास संध्याकाळी खर्च करावा आणि आमच्या समाजातील लहान गरीब मुलांना शिकवावे. ह्यासाठी ३०० रु. त्याला देऊ केले. मी आणि माझे पिताजी त्यांनी आमच्या जन्मस्थानी बलरामपूर (उत्तरप्रदेश) येथे आमच्या कुटुंबियांची मिळकत व इतर नातेवाईकांची मिळकत ह्यांच्या मदतीने एक शाळा सुरू केली.

आजच्या घडीला हा रात्रीचा वर्ग हा एका स्थानिक प्रतिष्ठानने पद्धतशीरपणे मोठ्या प्रमाणावर चालविण्यासाठी घेतला आहे आणि आमचे कुटुंब हे एकाकीपणाने गावच्या शाळेची आर्थिक व्यवस्था पाहात आहेत. ह्या दोन्ही शाळांमध्ये सुमारे १२० विद्यार्थी हे शिक्षण घेत आहेत.

१९८३ साली मी बेकार होतो व २००६ साली माझ्या कंपनीची आर्थिक उलाढाल ही हैड्रोलिक प्रेस मॅन्युफॅक्चरिंग उद्योगात मुंबई शहरामध्ये सर्वात अधिक होती. अर्थात हा उत्कर्ष ही ईश्वराचीच मेहेरबानी आहे. पण माझ्यामते ही कृपादृष्टी देणगी आणि सामाजिक सेवा ह्यांच्यामुळेच लाभली.

- कदाचित माझ्या देणगीला इतक्या मोठ्या कृपाप्रसादाची किंमत आहे, कारण ती फसवणूक, चोरी, पिळवणूक, जुलूम, व कंजूषपणा इत्यादि पापकर्माच्या विरूद्ध आहे.

- मुहम्मद पैगंबर (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) यांनी असे सांगितले,"एक माणूस एकटाच प्रवास करीत होता. त्याला तहान लागली म्हणून तो एका विहिरीपाशी गेला आणि पाणी प्यायला. जेव्हा तो विहिरीच्या बाहेर आला तेव्हा त्याने एका कुत्र्याला अत्यंत तहानेमुळे वाळू (वा माती) खाताना पाहिले. माणूस परत विहिरीकडे उतरला, त्याचे चामड्याचे पायमोजे त्याने पाण्यात भिजविले, त्याला दातात पकडून वर आला आणि त्याने तहानलेल्या कुत्र्याला पाणी पाजले."

- पवित्र प्रेषित पुढे म्हणाले, ईश्वराने त्याच्या माणुसकीच्या कार्याला दाद दिली आणि त्याला स्वर्गलोकात प्रवेश देऊन त्याच्यावर कृपा केली. पवित्र प्रेषितांचे इतर मित्रमंडळ आश्चर्यचकित झाले आणि विचारू लागले,

*"हे ईश्वराचे पैगंबर ! प्राण्यावर दया करून आम्ही कृपादृष्टी मिळवितो हे खरे आहे का?" प्रेषित म्हणाले, होय तुम्ही एखाद्या प्राणीमात्राची सेवा केल्यावर तुम्हाला कृपाप्रसाद मिळेल.* (बुखारी २३६३, मुस्लिम २२४४)

वरील श्लोक आम्ही थोडक्यात दिलेला आहे. संपुर्ण श्लोकात मुहम्मद पैगंबरांनी (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) अग्नीपासुन निर्मीत जीन व राक्षसाचा समावेश केलेला नाही.

- नुसता वरवरचा अभ्यास न करता जर एखाद्या धर्माची धार्मिक पुस्तके आपण नीटपणे अभ्यासली, तर आपणास असे आढळून येते की, मानवता आणि ईश्वराच्या प्राणीमात्रांची सेवा ह्या गोष्टींना खूप मोठी आशीर्वादांची किंमत आहे, व ती नुसत्या अर्धवटपणे केलेल्या धार्मिक विधिंपेक्षा जास्त महत्त्वपूर्ण आहे.

- अभियंता (इंजिनियर) जो विमानाचा आराखडा बनवितो आणि ते विमान तयार करतो त्याला विमानचालकाचा परवाना मिळत नाही. तथापि जी व्यक्ति विमानउड्डाणाचे शिक्षण घेते व त्यात प्रवीण होते तिलाच तो परवाना मिळतो. कारण इंजिनियर हा विमानाच्या यंत्राच्या अगदी जवळ असतो पण अननुभवी अभियंता हा विमान उड्डाण करण्यात असफल ठरला तर त्यामुळे शेकडो निष्पाप लोकांचे प्राण जाऊ शकतात.

त्याचप्रमाणे एखादा धार्मिक प्रवृत्तिचा इसम हा जरी ईश्वराच्या खुप जवळ असला तरीही त्याला पुष्कळ धन प्राप्त होत नाही. कारण पुष्कळ धन प्राप्त झाल्यावर ती व्यक्ति जर सैतानी स्वभावास काबुत ठेवण्यास असमर्थ ठरली, तर ती व्यक्ति निष्पाप लोक आणि समाज ह्यांच्या जीवनात अनर्थ निर्माण करू शकते.

नियमितपणे प्रामाणिकपणे पैसा कमविणे व शहाणपणाने तो खर्च करणे हे विमान चालविण्यासारखेच आहे. जेव्हा वैमानिक हा विमान चालविण्यात (उडविण्यात) तरबेज होतो तेव्हा त्याला वैमानिकाचा परवाना मिळतो. जेव्हा एखादा माणूस शहाणपणाने संपत्ति खर्च करण्यात प्रवीण होतो. त्याचवेळी त्याला श्रीमंत बनण्याचा परवाना मिळतो.

जेथे आवश्यक आहे तेथेच पैसा खर्च करणे हा शहाणपणाने खर्च करण्यासारखा आहे. म्हणजेच स्वतःच्या व्यक्तिगत कल्याण आणि समाजाच्या कल्याणासाठी खर्च करणे. ईश्वराला समाजाच्या भल्याची व निरपराध लोकांची काळजी असते. त्यामुळे जो समाजाच्या कल्याणासाठी खर्च करतो. त्यालाच पटकन श्रीमंत बनण्याचा परवाना मिळतो.

• सर्व जग हे ईश्वराचे एक कुटुंब आहे. ईश्वराला स्वतःचा चांगला मान आहे. तुम्ही त्याच्या कुटुंबासाठी कुठलीही अनुकूल गोष्ट केली, की तो तुमच्या उपकाराच्या कर्जात राहाणार नाही. पण ईश्वर तुमच्या भलेपणाचा परतावा चांगल्या तऱ्हेने व उदारपणाने देईल. तुमच्या क्षमतेप्रमाणे नेहमी मानवतेची सेवा करीत राहा. तुम्ही प्रचंड संपत्ति देणगी देण्याची जरुरी नाही. पण तुम्ही तुमच्या संपत्तीचा काही भाग हा गरजू लोकांसाठी देऊ शकता. नियमाने दानधर्म करा (देणगी द्या.) तुमच्या कुटुंबातील जवळच्याच व्यक्तिपासून दानधर्माची सुरूवात करा व नंतर शेजाऱ्यापाजाऱ्यांकडे लक्ष द्या. गुप्तपणे दान द्या. त्याची कोणाकडेही वाच्यता करू नका. तुमच्या जास्त नफ्याच्या २.५ टक्के रक्कम दरवर्षी देणगी म्हणून द्या.

## स्वर्गीय पुस्तके काय सांगतात?

१) *जे गरीब किंवा अनाथ ह्यांना अन्न देत नाहीत. व त्यांच्याकडे मुबलक अन्न असले तरी स्वतःच एकट्याने खातात ते संकटातून कधीही बाहेर पडू शकत नाहीत.* (पवित्र ऋग्वेद १०-११७-२)

२) *देणगीदार वा दानशूर व्यक्तिला अमरपद मिळते. नासधूस, भिती आणि दुःख त्याच्या जीवनात स्पर्श करीत नाहीत. दान केलेली वा देणगी दिलेली संपत्ति ही दानशूरांना पृथ्वीवर आणि स्वर्गात या दोन्हीकडील जीवनात अनुकूलता पुरविते.* (पवित्र ऋग्वेद १०:१९७:८ )

३) *परमेश्वर हा उत्साही देणगीदारावर प्रेम करतो.*
(पवित्र बायबल, २ कॉर. ९.७)

४) *तुम्ही जोपर्यंत ईश्वरी मार्गात तुमच्या सर्वाधिक प्रिय वस्तू करत नाही; तोपर्यंत तुम्ही पुण्य प्राप्त करु शकत नाही. जे काही तुम्ही खर्च कराल त्याविषयी ईश्वर सर्वज्ञ आहे.* (पवित्र कुराण ३:९२)

५) *जो गरीब आणि गरजू लोकांना मदत करण्यासाठी देणगी देतो तोच खरा दयाळू आहे. तो नेहमी फायदयामध्ये राहातो आणि त्यांचा शत्रू त्याचा मित्र बनतो.* (पवित्र ऋग्वेद १०-११७)

६) *जे कोणत्याही स्थितीत आपली संपत्ती खर्च करतात, मग ते बिकट स्थितीत असोत अथवा चांगल्या स्थितीत, जे राग गिळून टाकतात व दुसऱ्याचे अपराध माफ करतात. असे सदाचारी लोक ईश्वराला अतिशय प्रिय आहेत.* (पवित्र कुराण ३:१३४)

७) *जे अनाथांना दूर ढकलतात आणि गरीबांचे पोषण करण्यासाठी उत्सुक नसतात त्यांना नेहमी खूप त्रास व कष्ट भोगावे लागतात.*
(पवित्र कुराण १०७ : २-४ सारांश)

८) *जे दानधर्म वा देणगी देतात त्यांची ईश्वर भरभराट करतो आणि जे कर्ज दिलेल्या पैशांवर व्याज घेतात. त्यांचा उत्कर्ष ईश्वर कमी करतो.*
(पवित्र कुराण २ : २७६ सारांश)

९) *ईश्वर हा एकच आहे. तो दयाळू लोकांवर कृपा करतो.*
(पवित्र ऋग्वेद १-८४-७)

## *प्रकरण क्र. २९*

# तत्फिफ

## (Tatfeef)

गेल्या तीन दिवसांपासून इतका उन्हाळा भासत होता की, मदाअेन शहरातील प्रत्येकजण हा काही आराम मिळण्यासाठी उतावीळ झाला होता. त्यांनी शहराच्या बाहेर एक काळा ढग थंड वाऱ्यासह पाहिला. सर्व शहर त्या ढगाच्या खाली उन्हाळ्यापासून काही सुटका मिळेल ह्या आशेने धावत आले. जेव्हा सर्वजण त्या ढगाखाली एकत्र जमले व त्यांनी काही थंड जलधारांची अपेक्षा केली, त्यावेळी प्रचंड गडगडाटात त्यांच्यावर आगीचा वर्षाव होण्यास आरंभ झाला व त्यामध्ये त्या शहरांतील प्रत्येक व्यक्ति ही मरण पावली.

त्या प्रखर ईश्वरी शिक्षेचे एकमेव कारण तत्फिफ हे होते.

- मदाअेन हे ठिकाण सौदी अरेबिया आणि सिरिया ह्यांच्यामध्ये आहे. ईश्वराने प्रेषित शोएब (अलैहि सलाम) यांना तेथे लोकांना शिकविण्यासाठी व मार्गदर्शन करण्यासाठी पाठविले होते.

जेव्हा प्रेषित शोएब हे उपदेश करीत होते, तेव्हा लोक त्यांना विचारत होते, *"हे शुएब(अ.)! तुझी नमाज तुला हेच शिकविते काय की आम्ही त्या सर्व उपास्यांना सोडावे ज्यांची उपासना आमचे वाडवडील करीत होते? अथवा असे की आम्हाला आमच्या मालाचा आमच्या इच्छेनुरुप विनियोग करण्याचा*

*अधिकार नाही? केवळ तूच का एक उदारवृत्ती आणि सत्यवादी मणुष्य उरला आहेस"!* (पवित्र कुराण ११:२७)

वरील श्लोकांचा अर्थ असा आहे की, ते लोक एका ईश्वराच्या उपासनेच्या कल्पनेने व आर्थिक व्यवहारासाठी स्वर्गीय मार्गदर्शन ह्यांवर अत्यंत क्रोधित झाले होते.

- आर्थिक व्यवहारासंबंधीच्या उपदेशाबाबत संतापाचे एकमेव कारण हे होते की, सर्व लोक हे धंदेवाले व्यापारी होते किंवा त्याचा व्यवसायाशी काही कारणाने संबंध येत होता. जेव्हा ते व्यवसायिक व्यवहार करत होते ते त्यावेळी फसवणूक करीत होते. ते कमी, निकृष्ट दर्जाची किंवा काहीतरी दोष असलेल्या वस्तू ह्या विक्री करताना देत होते. व ते माल खरेदी करताना त्यावेळी त्यांची उत्कृष्ट माल मिळावा अशी अपेक्षा करीत होते. ते निष्पाप लोकांना धमकीही देत होते आणि त्यांच्या प्रदेशातून जाणाऱ्या वाटसरूंची लुटमार करीत होते.

- ईश्वराने खालील शब्दांत त्यांचा तीव्र धिक्कार केला,

*"विनाश आहे काटा मारणाऱ्यांसाठी, ज्यांची स्थिती अशी आहे की जेव्हा लोकांकडुन घेतात तेव्हा पुरेपूर घेतात आणि जेव्हा त्यांना मापुन किंवा तोलून देतात तेव्हा कमी देतात. काय त्यांना समजत नाही की एका मोठया दिवशी हे उठवून आणले जाणार आहेत? त्या दिवशी जेव्हा सर्व लोक जगाच्या पालनकर्त्यासमोर उभे असतील"* (पवित्र कुराण ८३:१-६)

प्रे. शोएब यांनी असे म्हटले होते,

*(प्रे. शोएब यांच्या आदेशाकडे लोकांनी दुर्लक्ष केले तेव्हा ते म्हणाले) "माझ्या पालनकर्ता जाणतो जे काही तुम्ही करीत आहात" त्यांनी त्याला खोटे लेखले, सरतेशेवटी छत्रीवाल्या दिवसाचा प्रकोप त्यांच्यावर कोसळला. आणि तो फारच भयावह दिवसाचा प्रकोप होता.*

(पवित्र कुराण २६:१८८-१८९)

दुसऱ्या लोकांना इशारा देतांना ईश्वर असे म्हणाला,

*"आणि कित्येक अशा वस्त्या आम्ही नष्ट केल्या आहेत, ज्यांच्यातील लोक आपल्या उपजीवीकेवर गर्व करीत होते, तर पहा, ती त्यांची निवासस्थाने पडलेली आहेत ज्यात त्यांच्यानंतर क्वचितच कोणी वसले आहे, सरतेशेवटी आम्हीच वारस म्हणुन राहिलो."* (पवित्र कुराण २८ :५८)

- तुमच्या जवळपासच्या वाचनालयातून प्राचीन संस्कृतिबद्दलची पुस्तके जरुर वाचा. त्यामध्ये तुम्हाला असे कुठलेही पुस्तक आढळणार नाही की ज्यामध्ये ईश्वराच्या कोपामुळे प्राचीन संस्कृतिचा अंत झाला. पण जेव्हा तुम्ही कुराण, बायबल आणि तोहरा ही पुस्तके वाचाल, त्यावेळी तुम्हाला हुद, आद, समुद आणि मदाअेन ह्या संस्कृतींच्या नाशाचे सविस्तर वर्णन समजेल. व हे कळून येईल की, बहुतेक प्राचीन संस्कृतींचा सर्वनाश हा ईश्वराच्या क्रोधामुळेच झाला आहे.

## तत्फिफ ह्याचा खरा अर्थ काय आहे?

पवित्र कुराणामधील प्रकरण क्र. ८३ (मुतफिफीन) मधील श्लोक क्र.१ मध्ये ततफिफचे भाषांतर असे केले आहे,"विनाश आहे काटा मारणाऱ्यांसाठी" प्रत्यक्षात ततफिफला आपल्याकडे अचूक शब्दार्थ नाही. म्हणून आपण 'काटा मारणे' असे त्याचे भाषांतर केले आहे. खरे पाहता ततफिफ ह्या शब्दाला व्यापक अर्थ आहे. ज्यामध्ये पुढील गोष्टींचा समावेश आहे.

- ततफिफमध्ये अशा सर्व अटी व परिस्थिती ह्यांचा समावेश आहे. ज्यावळी माणूस हा फक्त मालाचा स्वीकारच करत असतो. तो पूर्णपणे त्याचा साठा करतो, मजा करतो, काढतो मागणी करतो, हिसकावून घेतो किंवा अधिकारवाणीने त्याचा हक्क, त्याची संपत्ति, मालमत्ता आणि सेवा ह्या घेतो.

परंतु जेव्हा तो देणाऱ्याच्या भूमिकेत असतो त्यावेळी तो दुसऱ्या मार्गाने पाहातो. तो माल कमी देतो, तो फसवणूक करतो,

तो चोरी करतो, तो वजनात काटा मारतो, त्याने आश्वासन दिल्याप्रमाणे तो चांगली सेवा देत नाही. तो ज्यासाठी जबाबदार होता आणि ज्यासाठी त्याने पैसे घेतले होते त्या कर्तव्याची पूर्तता तो करीत नाही. आणि धर्माप्रमाणे हे एक भयंकर मोठे पापकर्म आहे.

## ततफिफची उदाहरणे

• तुम्ही काही निश्चित अटीवर व शर्तीवर एखाद्या व्यक्तीची नेमणूक केली व त्या अटी आणि शर्तीप्रमाणे त्याच्या सेवाचाकरीचा लाभ घेतला पण जेव्हा तुम्हाला त्याची बिदागी द्यावयाची होती, तुम्ही ती देण्यास विलंब केलात. त्यामध्ये कपात केली व त्या माणसाला त्रास दिलात व त्याची सेवाचाकरी अत्यंत कमी दरात मिळविण्यासाठी काम पुर्ण झाल्यावर पुढच्यावेळी तुम्ही त्याच्या पेमेंटपैकी काही भाग बाकी ठेवून त्याला अडकविण्याचा प्रयत्न केलात. अशा गोष्टी करून तुम्ही मालक ह्या नात्याने ततफिफ, एक मोठे पाप केलेत.

अंतिम प्रेषित (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) यांनी सांगितले,

*"कामगारांचा घाम सुकण्यापूर्वीच त्यांना त्यांची मजूरी देऊन टाक."*
(हादीस)

• तुम्ही कर्मचारी म्हणून एखाद्या कंपनीमध्ये सहभागी झालात तुमच्या कामाचा मोबदला आणि काही ठराविक जबाबदाऱ्या पार पाडण्याबद्दल कंपनीने तुमचा पगार निश्चित केला. जेव्हा पगार घेण्याची तुमची वेळ येते. तुम्ही तुमच्या पगाराची पै न पै मोजून घेऊन जाता. पण जेव्हा तुमची सेवाचाकरी करण्याची वेळ येते, तेव्हा तुम्ही पूर्ण आठ तास काम करीत नाही. वचन दिल्याप्रमाणे तुम्ही तुमची सेवा देत नाही. तसेच तुमच्या अटी व शर्तिप्रमाणे तुम्ही तुमची जबाबदारी पार पाडीत नाही. अशा रितीने तुम्ही एकप्रकारचे ततफिफ करता किंवा काटा मारता, जे एक मोठे पापकर्म आहे.

• ईश्वराने तुम्हाला दररोज काही प्रार्थना करावयास सांगितले. ईश्वर तुम्हाला कधीही हवा, पाणी, सूर्यप्रकाश आणि अन्न देण्याचे थांबवीत नाही. पण जेव्हा तुमची प्रार्थना करण्याची वेळ येते त्यावेळी तुम्ही त्यात पळवाटा काढता. तुम्ही प्रार्थना करीत नाही किंवा अगदी थोडक्यात करता. ही गोष्ट म्हणजे दुसरे काही नसून ततफिफ (काटा मारणे) आहे.

ईश्वर असे सांगतो,

*"मग विनाश आहे त्या नमाज पढणाऱ्यांसाठी जे आपल्या नमाजात गफलत करतात. जे दिखाऊपणा करतात, आणि क्षुल्लक गरजेच्या वस्तू (लोकांना) देण्यास टाळाटाळा करतात"* (पवित्र कुराण १०७ :४)

• तुम्ही उत्कृष्ट दर्जाचा माल पुरविण्याची मागणी स्वीकारलीत पण काही जास्त नफा कमाविण्याच्या हेतूने तुम्ही मालामध्ये छाटाछाट केलीत व चांगल्या दर्जाची वस्तू दिली नाहीत. हे ही ततफिफ किंवा काटा मारणे आहे.

तुम्ही एक व्यापारी आहात. तुम्ही काही उत्पादन करीत नाही पण तुम्हाला एखादी वस्तू ही वाईट किंवा नकली आहे ह्याची माहिती आहे. त्यानंतर तुम्ही ती वस्तू असली आणि उत्कृष्ट दर्जाची म्हणून विकता. हेतूपूर्वक तुम्ही गिऱ्हाईकापासून खऱ्या गोष्टी लपवून ठेवीत आहात. त्याप्रमाणे तुम्ही ग्राहकाची फसवणूक करीत आहात. आणि हेही पाप आहे. ह्यालाच ततफिफ किंवा काटा मारणे म्हणतात.

पैगंबर (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) यांनी सांगितले,

*"फसवणूक करणाऱ्यांना आमच्याकडे अजिबात स्थान नाही."*(हदिस)

• ह्याचा अर्थ असा आहे की, अशा लोकांना भाविक आणि धार्मिक वृत्तिच्या लोकांच्या समूहात प्रवेश नाही. त्याची रवानगी नरकलोकाकडे केली जाते.

• तुमच्या कौटुंबिक जीवनात तुम्ही तुमच्या पत्नीकडून पुरेपूर

व समाधानकारक सेवा आणि फायदा घेता. पण जेव्हा तिच्याबाबतीत कर्तव्य बजावण्याची वेळ येते तेव्हा तुम्ही ते समाधानकारकपणे पार पाडीत नाहीत. ही ततफिफची क्रिया आहे, एक प्रकारचे मोठे धार्मिक पाप आहे.

ईश्वर म्हणाला, *" पत्नीबरोबर चांगल्या प्रकारे जीवन व्यतीत करा. "*
(पवित्र कुराण ४ :१९)

अखेरच्या संदेशवाहक (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) यांनी म्हटले, *"जे आपल्या कुटुंबाशी चांगले वागतात तेच तुमच्यामधील सर्वोत्कृष्ट आहेत. "*
(हदिस : तिर्मिजी शरीफ)

दुसऱ्या एका ठिकाणी पैगंबर (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) म्हणाले, **"तुमच्या पत्नीला सन्मानाने वागवा."** (सहिह बुखारी)

ततफिफ (फसवणूक) करून वाचविलेला किंवा मिळविलेला पैसा हा शापित संपत्ति आहे. त्याचा तुमच्या कष्टाने कमाविलेल्या संपत्तिशी संबंध आणू नका कारण तो कधीतरी नष्ट होणारच आहे. आणि ती संपत्ति दूर जाताना तुमची सर्व मनःशांति आणि उत्कर्ष घेऊन जाईल व तुम्ही फसवणूकीची अशी संपत्ति मिळविल्याबद्दल नरकात जाऊन पडाल.

म्हणून तुम्हाला दोन्ही जगात यश मिळवायचे असेल तर शक्य तेवढे ततफिफपासून दूर राहा.

### *प्रकरण क्र. ३०*

# शापित पैसा

## (The Prohibited Money)

- तुम्ही दररोज सकाळी चांगल्या प्रमाणात शौचाच्यावेळी विष्ठा शरीराबाहेर टाकता. त्यापैकी तुम्ही थोडी तरी खाऊ शकाल काय? अगदी एक ग्रॅमभर !

तुम्हाला एकदम मळमळण्यास सुरुवात होईल.

तर आपण तो गू दुधाबरोबर मिसळू या. त्याचे थोडेसे प्रमाण आपण दूधाने पूर्ण भरलेल्या टॅंकरमध्ये टाकू या आणि आता तरी तुम्ही ते दूध पिऊन दाखवाल? नाही? तर मी तुम्हाला काही पर्याय सुचवितो. कुठल्या प्राण्याची थोडी विष्ठा जास्त प्रमाणाच्या दूधात मिसळल्यावर तुम्ही ते दूध प्याल काय?

काय? तुम्ही सांगता आम्ही विष्ठा खाणार नाही म्हणून ? अरे देवा ! तुम्ही मूलगामी आहात ! तुम्ही जुनाट मताचे आहात. तुम्ही लवचिक वृत्तिचे नाहीत. तुम्ही काळाप्रमाणे बदलत नाही व तुम्ही मागे पडलेले आहात.

- २००४ ते २००५ ह्या वर्षामध्ये १५०० पेक्षा जास्त शेतकऱ्यांनी महाराष्ट्र राज्यात आत्महत्या केल्या व ते दरवर्षी करीत आहेत. शेतकरी हे सहजपणे तडाका खाणारे शेंगदाण्यासारखे नाहीत. दुष्काळ,

पूर, अतिशय थंडी व नैराश्य या गोष्टींमुळे त्यांची इच्छाशक्ति कमजोर होत नाही. पण एकाच गोष्टीमुळे ते इतके तुटून जातात की जगण्यापेक्षा आत्महत्त्या करणे पसंत करतात. असे कुठले संकट, वा अनर्थ वा ओझे होते ज्यामुळे त्यांची शक्ति तुटून पडली?

कर्जावरील व्याज हेच कारण होते.

- सरकारने त्यांना चांगल्या हेतूने आणि विश्वासाने त्यांच्या आयुष्यात उत्कर्ष निर्माण होण्यासाठी कर्जे दिली. पण दुर्दैवाने त्यांच्या पुस्तकी ज्ञानाच्या वर्षात सरकारी अधिकारी फक्त अभ्यास करतात व अर्थशास्त्राचे पुस्तक काय सांगते हे नीट लक्षात ठेवतात. जो ईश्वर मुख्यत्वे ह्या जगाचे अर्थशास्त्र नियंत्रण करीत आहे. तो ईश्वर काय सांगतो ते नीट लक्षात ठेवीत नाहीत.

शेतकऱ्यांनी पण मोठ्या आत्मविश्वासाने व्याजासह मूळ मुद्दल ठरलेल्या मुदतीत परत करण्याच्या उद्देशाने कर्जे घेतली. पण ते शेतकरी स्वर्गीय नियमांबद्दल अज्ञानी होते. स्वतः आत्महत्या करण्यापूर्वी त्यांनी पैसे वाचविण्याचे व कर्जाची परतफेड करण्याचे सर्व प्रयत्न केले असतील. ते उपाशी राहून जुने कपडे वापरून व त्यांच्या मुलेबाळे व पत्नी ह्यांच्यावर कमीत कमी खर्च करून राहिले असतील. त्यांनी आपला घाम गाळून व रक्ताचे पाणी करून खूप कष्टांनी पै न पै जमा केला असेल व तो कर्जफेडीसाठी दिला असेल. तथापि जेव्हा ते कर्जाच्या रक्कमेवर वाढत्या व्याज्याच्या शापातून बाहेर पडु शकले नाहीत, तेव्हा त्यांनी मृत्यूला मिठी मारून आपल्या जीवनातून स्वतःची सुटका करून घेतली.

- श्री. पटेल हा एक श्रीमंत व समाजात मान असलेला व स्वतःच्या व्यवसायातून चांगले पैसे कमविणारा गृहस्थ होता. त्याला तृप्ति नावाची एकुलती एक मुलगी होती. त्याच्या मुलीसाठी चांगला नवरा मिळविण्यासाठी त्याने खूप पैसे हुंडा म्हणून द्यावयाची तयारी दाखविली. त्याला खूप चांगले प्रस्ताव आले. त्याने खूप हुंडा दिला व त्याच्या मुलीचे लग्न होऊन ती नवऱ्याबरोबर संसार करू लागली.

प्रत्यक्षात श्री. पटेलने त्याचे राहाते घर बँकेकडे गहाण ठेवून हुंड्याची रक्कम बँकेकडून कर्ज म्हणून घेतली होती. त्याची अशी समजूत होती की. तो बँकेच्या कर्जाचे हप्ते त्याच्या व्यवसायाच्या उत्पन्नातून फेडू शकेल. तथापि म्हातारपण आणि मंदीमुळे त्याचा उद्योगधंदा हळूहळू कमी होत गेला. त्याने कर्जाच्या हप्त्यांची परतफेड योग्य मुदतीत केली नाही. शेवटी बँकवाल्यांचा संयम संपला व त्यांनी जर कर्जफेडीचे हप्ते भरण्यास विलंब झाला तर घराचा ताबा घेण्याची धमकी दिली.

फ्लॅट गमावण्याच्या तणावामुळे पटेलवर त्याचा परिणाम होऊन त्याला हृदविकाराचा झटका आला पण तो त्यांतून वाचला. जेव्हा तृप्तिला सत्य परिस्थिति माहिती झाली तेव्हा तिला धक्काच बसला. कारण तिचे भविष्य उज्वल करण्यासाठी तिच्या आईवडिलांनी स्वतःच्या आयुष्याचा नाश केला होता.

आता आपल्या आईवडिलांना बेघर होण्यापासून कसे वाचवायचे आणि त्या वाढत्या रक्कमेची परतफेड कशी करावयाची हा मोठा पेच तृप्तिपुढे निर्माण झाला. शेवटी तिने एक अविश्वसनीय निर्णय घेतला. आपल्या नवऱ्याच्या परवानगीने ती आजारी आईबापाची सेवा करण्यासाठी म्हणून माहेरी आली. पण ते कर्ज फेडण्यासाठी व आईवडिलांची बेघर होण्यापासून सुटका करण्यासाठी तिने वेश्याव्यवसाय चालू केला. (गुप्ततेच्या दृष्टीने नावे बदलली आहेत.)

• अकबरने एका पठाणाकडून (अफगाणीस्तानी) ठराविक काळासाठी कर्ज घेतले. पण ते तो वेळेवर परत करू शकला नाही. प्रत्येक दिवशी पठाण हा संध्याकाळी अकबरच्या घरी येत होता व त्याचे पैसे मागत होता. जेव्हा अकबराने त्याच्याकडे काही मुदत मागितली तेव्हा पठाण म्हणाला, "तुझ्या बायकोला माझ्या घरी भांडी घासण्यासाठी आणि स्वयंपाक करण्यासाठी पाठव. त्यामुळे कमीतकमी तू माझ्या कर्जावरील व्याजाची काही अंशी परतफेड करू शकशील."

माझ्या लहानपणी माझे मित्र मला असे सांगायचे की, जेव्हा अकबराची बायको पठाणाच्या घरात प्रवेश करते, त्यावेळी तो पठाण ताबडतोब दरवाजा बंद करतो. शरीराने ताकदवान असा घरमालक हा कर्जदाराच्या सुंदर पत्नीबरोबर बंद घराच्या दरवाजाआड काय व्यवहार करीत असेल ह्याची तुम्ही साधारणपणे कल्पना करू शकाल आणि हे असे वारंवार घडत होते.

• जेव्हा मी वरळीला १९९०साली राहात होतो. त्यावेळी माझ्या जवळील जास्त पैशांची मी बँकेमध्ये मुदतबंद ठेवीत (Fix deposit) रुपांतर केले. काही महिन्यांनी माझ्या धंद्यासाठी मला पैशाची जरुरी भासली. म्हणून मी बँकेत ती मुदतबंद ठेव मोडण्यासाठी म्हणून गेलो. तेव्हा बँक मॅनेजर म्हणाला,"मुदत संपायच्या आधी ही ठेव (F.d) मोडू नका. मी तुम्हाला तुमच्या मुदतबंद ठेवीच्या(F. d)रकमेवर ७५ टक्केपर्यंत अधिक रक्कम (ओव्हरड्राफ्ट) काढण्याची सवलत देतो." म्हणून मी ओव्हरड्राफ्ट सुविधा घेतली व आवश्यक तेवढी रक्कम बँकेमधून काढून आणली आणि माझ्या व्यवसायासाठी वापरली. त्या दिवसानंतर पुढील चार वर्षे माझ्या बँकेच्या खात्यात शिल्लक जमा रक्कम कधीच दिसली नाही. ती नेहमीच ओव्हरड्राफ्टच्या स्वरूपात राहीली. जेव्हा मी भांडूपला राहायला गेलो तेव्हा मला खाते बंद करावयाचे होते. त्यावेळी माझ्याकडे ओव्हरड्राफ्टची रक्कम देण्यासाठी पैसे नव्हते. म्हणून मी मुदतबंद ठेव (F.d) मोडली, ओव्हरड्राफ्टची सर्व रक्कम भरली व माझे बँकेतील खाते बंद करून टाकले.

• सन २००१ मध्ये मी सिटी बँकेकडून माझ्या व्यवसायासाठी २४% प्रतिवर्षी व्याजदराने कर्ज अतिशय सहजपणे घेतले. सुरुवातीला असुरक्षित कर्जाचा व्याजदर हा अतिशय जास्त होता. मी कर्जफेडीचा मासिक हप्ता हा प्रत्येक महिन्याच्या १८ तारखेला देणे बंधनकारक होते.

आश्चर्याची गोष्ट अशी होती की, महिन्याच्या सुरुवातीला १ ते ७ तारखेपर्यंत माझ्याकडे माझ्या कामगारांचे पगार आणि सामान

पुरवठादारांची देणी देण्यासाठी पुरेसा पैसा हाता. पण प्रत्येक महिन्याच्या १८ तारखेला माझ्या बँकेच्या खात्यातील शिल्लक एवढी कमी असे की, मी सिटी बँकेला पुढील तारखेचे दिलेले धनादेश हे वटविले जावे ह्यासाठी मला माझ्या मित्रांकडून उसने पैसे घ्यावे लागत होते.

शेवटच्या संदेशवाहकाने (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) असे सांगितले होते,

*"जो त्याचे कर्जफेड करण्यासाठी प्रामाणिकपणे प्रयत्न करतो त्यालाच ईश्वर मदतीचा हात देतो."* (हदिस)

पण त्या परीस्थितीत मला मदत मिळत नव्हती.

आता ४ वर्षानंतर २००५ मध्ये जेव्हा मी ह्याचे परिक्षण करतो तेव्हा मला असे वाटते की, मासिक हप्त्यातील रक्कमेबरोबर मी व्याजाची रक्कमही देत होतो म्हणुन मला ईश्वराची मदत मिळत नव्हती.

• "Talk and Grow Rich" ह्या पुस्तकाचा लेखक श्री. रॉन हॉलंड सांगतो,"लोक हे बँकेकडून कर्ज घेतात व असा विचार करतात की, ते दुसऱ्याच्या संपत्तिवर राज्य उभारू शकतील. पण ते जेव्हा कर्जाच्या जाळ्यात अडकतात ते म्हणतात Knowing what I Know now, I would not have borrowed the money in the first place. म्हणजे आता मला जे माहित झाले, ते आधी कळून चुकले असते तर मी पहिल्याच वेळी कर्ज घेतले नसते. श्री. रॉन हॉलंड असा सल्ला त्यांच्या वाचकांना देतात की शक्य असेल तो पर्यंत कर्ज काढू नका. आणि जर त्याची आवश्यकताच भासली तर तुम्ही कुठल्याही अडचणीत न येता वा तुमची अस्थिर स्थिती न होता तेवढ्याच रकमेचे कर्ज घ्या, जे तुम्ही कधीही परत फेडू शकाल. तो पुढे सांगतो,"Do not use money as a substitute for brain. Try to use energy and efforts instead of money."

## वर्तमानपत्रांतील वृत्तांत (A Newspaper Report)

२४ जानेवारी २००६ रोजी वर्तमानपत्र टाईम्स ऑफ इंडियाने त्यांच्या "बॉम्बे टाईम्स" ह्या विभागात असे वृत्त प्रसिद्ध केले होते की वैयक्तिक कर्ज ह्यामुळे ब्रिटनमध्ये १ Trillion पौंड इतकी पातळी गाठली आहे. म्हणजेच ब्रिटनमध्ये एका व्यक्तिमागे सरासरी २४००० पौंड कर्ज रक्कमेचा भार आहे. त्यामुळे ब्रिटनची अर्धी लोकसंख्या ही पैशाची आजारपण असलेल्या भावनेने पछाडलेली आहे.

१९ व्या शतकातील ब्रिटनचे लोक जे समुद्राच्या लाटांवर राज्य करण्याचा दावा करतात आणि जगाला सुशिक्षित बनविण्याचे धडे शिकवितात हे आज कर्जाच्या फासामध्ये अडकले आहेत. एक शतकापूर्वी प्रत्येक व्यक्तिकडे सरासरी २४००० पौंड रक्कम जमा असेल. पण आज सरासरी प्रत्येक माणसाच्या डोक्यावर २४००० पौंड कर्जाचा भार आहे. त्यांच्या उत्कर्षाला हे काय झाले?

शापित पैशाने त्यांना शाप दिला.

शेवटचे प्रेषित (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) म्हणाले,

*"जे लोक व्याजाच्या पैशाच्या व्यवहारात गुंतलेले आहेत त्या सर्वांना ईश्वराने शाप दिला आहे."* (हादिस)

ज्यांनी कोणी क्रेडिट कार्डस्‌चा वापर केला आणि वैयक्तिक कर्ज घेतले त्यावर त्यांनी भरघोस रक्कम व्याज म्हणून दिली असेल. व्याज देणे किंवा घेणे दोन्ही गोष्टी पापकर्म आहेत. हाच तो शापयुक्त व्याजाचा पैसा आहे, ज्याने ब्रिटिश लोकांची शिल्लक रक्कम ही प्रत्येक व्यक्तिसाठी २४००० पाऊंडस् कर्जाच्या ओझ्यात रुपांतरित करून टाकली. अत्यंत विद्वान, अत्यंत प्रगत, अति सुसंस्कृत ह्या कोणत्याही गोष्टी ईश्वराच्या कोपापासून कोणालाही सुरक्षित ठेवू शकत नाहीत. जो त्याच्या आज्ञांचा भंग करतो त्याला शिक्षाही होतेच.

## ईश्वरी श्लोक (Devine Verses)

- शेतकरी, तृप्ति आणि अकबर ह्यांच्या उदाहरणावरून तुम्हाला असे समजून येईल की, कर्जावरील व्याज हे मानवजातीला खूप त्रासदायक ठरते म्हणून ईश्वराने त्यावर बंदी घातली आहे.

- ईश्वराने व्याज घेणे तसेच व्याज देणे ह्या दोन्ही गोष्टींना मनाई केली आहे. ज्या गोष्टीला ईश्वराने मनाई केली आहे त्यापासून काहीही फायदा होणार नाही.

- पवित्र कुराण सांगते,

*"ईश्वर व्याजाचा ऱ्हास करतो आणि दान-धर्माची वाढ करतो आणि ईश्वर कोणत्याही कृतघ्न आणि वाईट आचरण करणाऱ्यांना पसंत करत नाही "* (पवित्र कुराण २:२७६)

पवित्र ऋग्वेद सांगतो,

*"हे परमेश्वरा ! जे लोक जास्तीत जास्त नफा (व्याज) मिळविण्याच्या हेतूने पैसे कर्जाऊ देतात त्यांची भरभराट तू नष्ट कर."* (पवित्र ऋग्वेद ३:५३:१४)

पवित्र कुराण सांगते,

*"हे ईमानधारकांनो ! ईश्वराचे भय राखा जर तुम्ही ईमानधारक असाल तर व्याजाची कितीही रक्कम बाकी असली तरी तू त्यांना माफ कर आणि तू जर असे केले नाहीस तर ध्यानात ठेव की, ईश्वर व त्याचे प्रेषित हे तुझ्याविरुद्ध लढा घोषित करतील. जर तुला पश्चात्ताप झाला असेल तर तुला मूळ रक्कम घेण्याचा अधिकार आहे. तू कोणालाही त्रास देऊ नकोस वा कोणीही तुझे नुकसान करू नये."* (पवित्र कुराण २:२७८-२७९)

- समजा धार्मिक स्थळाच्या उदा. मंदिर, मशीद किंवा चर्च ह्यांच्या जमिनीवर थोडीशी विष्ठा पडलेली असेल, तर पंडीत वा मौलवी हा कधीही तडजोड करणार नाही व ती जमीन साफ केल्याशिवाय प्रार्थनेला सुरुवात करणार नाही. त्याचप्रमाणे प्रामाणिकपणे रोजी रोटी कमावणे हा एक उपासना करण्याचाच प्रकार आहे. हे

काम पूर्णपणे साफ व धार्मिकतेने झाले पाहिजे. तसेच कुठल्याही तऱ्हेचा अप्रामाणिकपणा, कुठलीही ततफिफ (काटा मारणे) वा ज्याला ईश्वराने बंदी घातली आहे, त्यांपासून मुक्त असले पाहिजे. म्हणून कधीही तडजोड करू नका.

- उत्कर्ष वा भरभराट ही ईश्वराच्या मेहेरबानीमुळेच येते. जर आपण त्याच्या आदेशांकडे दुर्लक्ष केले किंवा ईश्वर काय सांगतो त्याच्या विरुद्धच जर काही केले, तर ईश्वरी कृपेचा पाऊस आपणावर कधीही पडणार नाही.

- शेतकऱ्यांनी दिलेले व्याज हे पैसा नाही तर त्यांचे रक्त होते. उपाशी राहून, आजारपण व जीवनातील कोणतेही सुख वा आराम ह्यांचा उपभोग न घेता वाचविलेला पैसा होता. तृप्ति व अकबरची पत्नी ह्यांनी दिलेले व्याज हे व्यवसायातील नफा नव्हते. पण त्यांचे पावित्र्य (वा शुद्धता) होते. त्यांचे स्वतःचे शरीर विकून मिळविलेला पैसा होता. बँकाचा पैसा हा साधारणतः साफ व खरा पैसा असतो. पण त्यावर बँक जे व्याज मिळविते तो पैसा मात्र शेतकरी आणि तृप्तिसारख्या लोकांनी दिलेला मिश्रण झालेला पैसा असु शकतो.

जर तुम्ही असा अशुद्ध मिश्रणवाला पैसा हा बँकेकडून तुमचा दानधर्म, भिती, ईश्वराचे आज्ञापालन ह्या गोष्टीवर आधारलेला व्यवसाय चालविण्यासाठी घेतलात तर तो तुम्हाला सोयीस्कर होईल काय? त्याने तुमचा फायदा होईल ह्याची तुम्हाला खात्री आहे का? त्याने माझा फायदा झाला नाही तसेच श्री. पटेल व शेतकरी ह्यांनाही तो लाभदायक झाला नाही. जो ईश्वरावर श्रद्धा ठेवतो आणि त्याच्या आशीर्वादाच्या सहवासात असतो त्या कोणालाही अशा पैशामुळे फायदा होणार नाही.

- जळू आणि बांडगुळे इत्यादि हे नेहमी दुसऱ्यांचे रक्त शोषून त्याच्यावर जगतात. या जगाच्या सुरुवातीपासून वेश्या, मारणारे, दरोडेखोर व गुलामांचा व्यापार करणारे होते. ते जगले आणि

त्यांच्या व्यवसायात भरभराटीला आले. म्हणजे ह्याचा अर्थ असा होत नाही की, त्यांनी ज्या धंद्यातुन संपत्ति व भरभराट मिळवली तोही यशाचा एक मार्ग आहे. पण तो सरळ नरकलोकाकडे जाणारा रस्ता आहे.

ईश्वर सांगतो,

*"हे मुहम्मद(सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) ! त्यांची धनदौलत आणि यांची संतती पाहून फसू नका. ईश्वर तर असे इच्छितो की याच वस्तुद्वारे सांना ऐहिक जीवनात देखील कोपग्रस्त करावे आणि यांना मुत्यू आला तरी तो सत्याच्या इन्काराच्या स्थितीतच यावा"* (पवित्र कुराण ९:५५)

वरील श्लोक असे सूचित करतात की, ईश्वर हा जास्तीत जास्त संपत्ति देऊन शिक्षापण करतो. जर तुम्हाला शंका असेल तर अशा लोकांना विचारून पाहा, ज्यांच्यामागे टॅक्स अधीकारी शिकारी कुत्र्यासारखे लागले आहेत किंवा ज्या व्यक्तींना गुडांकडुन खंडणीसाठी फोन येतात व ज्या व्यक्तीची मुलेही त्यांच्या विरूद्ध जातात. व अशा लोकांना विचारा ज्यांचे आर्थिक राहणीमान खुप उंच होते, पण काही कारणाने त्यांचे मासीक उत्पन्न बंद झाले.

व्याजाच्या रक्कमेचा धंदा आणि व्याजाने केलेला व्यवसाय ह्यामुळे वरकरणी खूप लोकांना फायदा झाला होतो असे दिसेल. पण त्याचा अर्थ असा नाही की हा भरभराटीचा एक मार्ग आहे. ईश्वराला घाबरणाऱ्या माणसासाठी हा गरिबीचा एक मार्ग आहे.

- तुम्ही दूधाच्या पूर्ण भरलेल्या टँकरमधील लहान प्रमाणातील विष्ठेचा पण तिरस्कार केलात. तुम्ही ते दूध वापरणार नाही. त्याचप्रमाणे तुमच्या उत्पन्नातील अत्यंत लहान अपवित्र रकमेचा पण तिरस्कार करा. त्याचा कधीही स्विकार करू नका. ती कधीही सहन करू नका. तुमच्या पवित्र मिळकतीमध्ये कधीही त्या अपवित्र रकमेचा समावेश होऊ देऊ नका. असे करणे हे मूलगामी नाही किंवा हा असहिष्णुपणा नाही. हे ईश्वराचे आज्ञापालन करणे आहे.

- शरीराने पवित्र व्हा, मनाने पवित्र व्हा, आत्म्याने पवित्र व्हा तसेच संपत्तिने पवित्र व्हा. संत हे काही आकाशातून खाली पडले नाहीत. ते आपल्यासारखेच सर्वसामान्य मानव आहेत. पण ते कष्ट करतात, ते धडपड करतात, ते परमेश्वराची मदत घेतात. व सतत प्रयत्न करून ते स्वतः आतून आणि बाहेरून स्वच्छ होतात व त्यानंतर जेव्हा त्यांना जरी नको असले तरीही, संपत्ति व मानसन्मान त्यांच्यामागे धावतात व त्यांच्या पायाशी लोळण घेतात.

असे तुमच्या बाबतीत का होणार नाही? पैशाच्या मागे धावू नका. तुमच्या तत्वांशी तडजोड करू नका. पण योग्य रस्त्याने जाण्यासाठी धडपड करा व तुम्ही असे आचरण केलेत, तर तुम्ही या जगामध्ये फक्त यशस्वीच नव्हे तर मृत्यूनंतरच्याही जीवनात यशस्वी व्हाल.

### *प्रकरण क्र. ३१*

# भरभराटीचा विमा

## (Insurence of Prosperity)

- ह्या पुस्तकाच्या सुरुवातीला आपण मनाची भरभराटीच्या प्राप्तीसाठी भूमिका ह्याचा अभ्यास केला. काही ठराविक मर्यादेपर्यंत मनाच्या अनुकूल आणि सकारात्मक वृत्तिचे रक्षण व दैनंदिन जीवनातील चांगली कामे ह्यामुळे भरभराटीचे रक्षण होऊन ही तिची देखभाल होते.

- तुम्ही अत्यंत सामान्य परिस्थितीतून भरभराटीसाठी तुमची धडपड सुरू केली असेल. सतत प्रयत्न व प्रार्थना ह्यांमुळे तुमचा उत्कर्ष झाला. आता अशावेळी तुम्ही ज्या परिस्थितीतून सुरूवात केली तिचे स्मरण करणे व तुमचे अपार कष्ट, प्रयत्न व ईश्वराच्या कृपेने तुम्हाला मिळालेले यश ह्या गोष्टीपण लक्षात ठेवल्या पाहिजेत. त्यामुळे तुमचा आत्मविश्वास, श्रद्धा, सहनशीलपणा, इच्छाशक्ति व तुमच्या प्रयत्नांचे सातत्य वाढीस लागेल. तसेच तुमच्या हृदयात जळणारी ज्वलंत इच्छा ही सतत जास्त उजेडाने पेटून निघेल. आत्मविश्वास व तुमची सकारात्मक वृत्ति ह्यामुळे तुम्हाला तुमच्या सभोवतालच्या लोकामध्ये ऊर्जा निर्माण करता येईल व त्यांना तुमच्या उत्कर्षाच्या मार्गावरून प्रवासास नेण्यासाठी नेतृत्व करण्याची इच्छा तुमच्यामध्ये निर्माण होईल.

• यश मिळाल्यानंतर जर तुम्ही तुमच्यापेक्षा उच्चवर्गीय लोकांच्या समूहात प्रवेश केलात. तर त्या समाजामध्ये तुमच्यापेक्षा शेकडो लोक हे मोठ भरभराट झालेले, तुमच्यापेक्षा जास्त सुंदर, तुमच्यापेक्षा जास्त आकर्षक, तुमच्यापेक्षा जास्त समृद्ध असलेले आढळून येतील. अशा लोकांच्या सहवासात तुम्ही स्वतःला खुप लहान समजाल. सामान्य माणूस असल्यामुळे हेवा, मत्सर, कमीपणाची भावना, झटकन पैसे मिळविण्याची उत्कंठा, श्रीमंती मिळविण्याचे झटपट रस्ते आणि अशा कित्येक भावना तुमच्या अंतःकरणात नकळत डोकावू लागतील. व त्याचा तात्काळ परिणाम म्हणजे तुमच्यातील ज्वलंत इच्छेची ज्योत विझून जाईल. तुमचा विश्वास, सहनशीलता, सकारात्मक वृत्ति आणि पद्धतशीरपणे विचार करण्याची क्षमता ह्या सर्व गोष्टींचा नाश होईल. श्रीमंत समाजातील सर्वच लोक हे काही सतत परीश्रम किंवा विचारपूर्वक संघर्ष करणारे नसतात. पण त्यापैकी काहींना त्यांच्या वडिलांकडून उत्कर्षाचा वारसा मिळालेला असतो व ते अशी संपत्ति बेफिकिरपणे खर्च करीत असतात. काहींनी चुकीच्या मार्गांनी धन मिळवलेले असते व ते तात्पुरत्या भरभराटीच्या अवस्थेत असतात. (अशा लोकांच्याबाबतीत ईश्वर म्हणतो, *"अशांना मी संपत्ती ही शिक्षा करण्यासाठीच देतो."*) यातले काहीजण जे प्रसिद्ध व श्रीमंत घराण्यांतून आलेले असतात पण उतरती कळा लागलेल्या स्थितीत असतात.

अशा लोकांच्या संगतीने तुम्हाला कधीही काही मदत मिळणार नाही. म्हणून शक्य तेवढी त्याची संगत टाळा. आणि तरुण तुर्क, उद्योजक, लढवय्ये, आशावादी विचार करणाऱ्या व तुमच्यासारखे श्रम करणाऱ्या लोकांच्या समूहामध्ये सामील व्हा.

तुमचे सर्व प्रश्न हे फक्त तुमचे स्वतःचे प्रयत्न आणि परमेश्वराची कृपा ह्यांमुळेच सोडविले जाऊ शकतील. ते कधीही वशिला, मैत्री व उच्च समाजातील लोकांच्या शिफारशी ह्यामुळे सुटू शकणार नाहीत.

कोणीही धंदा हा तोट्यात करीत नाही. जो कोणी तुमच्या कठीण प्रसंगात तुम्हाला मदत करतो, त्याने तुम्हाला मदत करताना

तुमच्यावर जो काही खर्च केला असेल, त्यापेक्षा जास्तीत जास्त प्रमाणात फायदा तो तुमच्याकडुन घेईल. म्हणून अशा लोकांपासून जास्त दूर राहाणेच चांगले!

• तुमच्या दिवसाची सुरुवात ही ईश्वराच्या प्रार्थनेने करा. प्रार्थनेच्या शेवटी असे सांगा,"हे ईश्वरा ! मी अशा आणि अशा परिस्थितीत होतो. केवळ तुझ्याच आशीर्वादाने मी सर्व मिळवू व करू शकलो. मला ह्याच्यापेक्षा जास्त साध्य करण्यासाठी शक्ति आणि शहाणपण दे आणि तुझ्या मदतीची कृपा सदैव माझ्या पाठीशी असूं दे!"

वरील सर्व वाक्ये पुन्हा म्हणा आणि तुमच्या पूर्वीच्या बिकट परिस्थितीचे स्मरण करा. त्यामुळे तुमच्या मनात कधीही अन्य लोकांकडे असलेली श्रीमंती व इतर प्रसिद्ध लोकांची संपत्ति पाहुन ह्याबद्दल कडवटपणाची भावना निर्माण होणार नाही. तसेच त्यामुळे तुमच्या हृदयातील दिव्य ज्वलंत ज्योत सतत पेटत राहील व तिची नीट देखभाल केली जाईल. तुम्ही तुमचा धार्मिक भरभराटीकडे जाणारा पवित्र प्रवास थांबवू शकणार नाही किंवा तुम्ही स्वकष्टाने घाम गाळून मिळविलेला पैसा कधीही नष्ट होणार नाही.

ईश्वर सांगतो,

*"स्मरण ठेवा, तुमच्या पालनकर्त्याने सावध केले होते की जर कृतज्ञ बनाल तर मी तुम्हाला आणखी जास्त उपकृत करीन आणि जर कृतज्ञता दर्शवाल तर माझी शिक्षा फारच कठोर आहे."* (पवित्र कुराण १४:७)

*"त्या परमेश्वराने दिलेल्या अमुल्य बक्षीसाबद्दल आभार माना."*
(पवित्र बायबल २ कौर ९:१५)

*"ईश्वराने दिलेल्या भरभराटीबद्दल नेहमीच धन्यवाद देत राहा."*
(पवित्र बायबल २ एपीएच, ५:२०)

**म्हणून परमेश्वराचे ह्यापुढे नियमितपणे आभार मानून तुमच्या भरभराटीचा विमा उतरवा.**

## *प्रकरण क्र. ३२*

# स्वच्छता
## (Cleanliness)

जेव्हा तुम्ही काचेचा रॉड हा लोकरीच्या कापडावर घासता, तेव्हा त्याच्यामध्ये स्थिर विद्युतप्रवाह (Possitive Static current) निर्माण होतो. नंतर तो रॉड कागदाच्या तुकडयावरून फिरवा. तेव्हा कागदाच्या तुकड्यात आपोआप (Negatitive Static current) निर्माण होईल आणि कागदाचे तुकडे काचेच्या रॉडला चिकटतील.

तुम्ही श्रीमंत व खूप प्रसिद्ध झालात की, तुमचा स्वभाव कितीही चांगला असू दे, तुमचे शत्रू हे निर्माण होणारच. तुम्ही रस्त्यावरून स्वच्छंदपणाने चालू शकत नाही. अशा सर्वसाधारण घटना आपण रोजच्या जीवनात पाहातो.

जेव्हा आपण योग्य मार्गावरून चालत असतो किंवा धार्मिक आणि भाविक बनतो त्यावेळी पण असेच घडते. ह्या विश्वामध्ये धार्मिक शक्ति आणि आत्मे आहेत, त्याचप्रमाणे दुष्ट शक्ति व आत्मे पण आहेत. जेव्हा आपण योग्य मार्गावरून चालत असतो, तेव्हा (दुष्ट शक्ति व आत्मे) हे आपले शत्रू बनतात. त्यांचा हेतू हा आपणास मारण्याचा नसतो. पण शारीरिकरीत्या व मानसिकरित्या योग्य मार्गावरून आपले लक्ष विचलित करणे तसेच दुष्ट आत्मे

यांचा असाही प्रयत्न असतो कि व्यक्ति शेवटपर्यंत गरिबीच्या खड्ड्यांत अडकुन राहिली पाहिजे.

आपण चोरी आणि शत्रू ह्यापासून आपले संरक्षण करतो, त्याचप्रमाणे आपण अशा दुष्टशक्ति व आत्मा यांपासून आपले रक्षण केले पाहिजे. त्यांच्यापासून पूर्णपणे सुरक्षित राहाण्याचा प्रभावशाली मार्ग म्हणजे नेहमी अत्यंत स्वच्छ राहाणे व आपले दैनिक काम किंवा दिवस सूरू करण्यापूर्वी ईश्वराकडे रक्षणासाठी आणि उत्कर्षासाठी प्रार्थना करून मदत मागणे हा आहे.

## स्वच्छतेबद्दल दिव्य पुस्तके काय सांगतात?

- *हे मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) "तुम्ही आपल्या कपड्यांना स्वच्छ पवित्र राखा."* (पवित्र कुराण ७४ :४)

- ईश्वराचे प्रेषित मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) म्हणाले, *"स्वच्छता हा अर्धा धर्म आहे."* (हादिस)

- *"फक्त स्वच्छ आणि पवित्र लोक ईश्वरी पुस्तकांना स्पर्श करू शकतात.* (पवित्र कुराण ५६ : ७९)

## मनाची स्वच्छता (Cleanliness of Mind)

जर पुष्कळ अनोळखी असे वेगळ्या जातीचे व ब्राह्मण लोक हे एकत्र मिसळले आणि तुम्हाला ह्यामध्ये ब्राह्मण कोण आहेत ह्याचा तर्क करण्यास सांगितले तर बहुसंख्य घटनांमध्ये तुम्ही त्यांच्या चेहऱ्यावरून कोण व्यक्ति ब्राह्मण आहेत ह्याचे अनुमान करू शकाल. प्रार्थनांचे पठण व स्वच्छ अन्न हे ब्राह्मणांना हुषार बनविते व त्यांच्या चेहऱ्यावर तेज आणते.

म्हणून नेहमी पूर्णपणे स्वच्छ राहाणे व स्वच्छ खाणे ह्याची काळजी घ्या. माझ्या मते मनाच्या व शरीराच्या संपूर्ण स्वच्छतेसाठी तुम्ही खालील गोष्टी केल्या पाहिजेत.

• पूर्ण शाकाहारी बना. जर ते शक्य नसेल तर फक्त मासे आणि घरी शिजविलेले हलाल-मटण ह्यावरच फक्त आहार मर्यादित ठेवा. हॉटेलमध्ये मांसाहारी अन्न कधीही खाऊ नका.

• मांसाहारी हॉटेलमध्येसुद्धा शाकाहारी जेवण खाण्याचे टाळा.

• (Alcohol Liquor), दारू आणि नशा आणणारी सर्व पेये यांचे सेवन करू नका. ज्यावर ईश्वराने प्रतिबंध केला आहे, त्या गोष्टींपासून तुम्हाला काहीही फायदा होणार नाही. जर ताण कमी करण्यासाठी तुम्ही दारू पीत असाल तर त्याऐवजी योगाभ्यास किंवा ध्यानसाधना ह्यांचा प्रयत्न करून पाहा.

• कंम्प्युटरच्या भाषेमध्ये GI-GO ह्याचा अर्थ 'Garbage in - Garbage out'. ह्याचा अर्थ कंम्प्युटरला चुकीचे फिडींग केले तर चुकीचेच रिझल्ट मिळतील. हेच तत्त्वज्ञान तुमच्याही उपयोगात येऊ शकते. जर तुम्ही फसवणूक, अप्रामाणिकपणा व माणसांची पिळवणूक करून पैसा कमवीत असाल, तर अशा तऱ्हेच्या पैशातून खरेदी केलेले अन्न खाऊन तुमच्या व तुमच्या कुटुंबियांच्या मनामध्ये कधीही विधायक आणि पवित्र विचार निर्माण होणार नाहीत. तुम्ही व तुमच्या कुटुंबीयांनी अशा तऱ्हेचे अन्न सेवन केल्यामुळे फक्त फसवणूक, अप्रामाणिकपणा व सर्व तऱ्हेचे गुन्हे ह्यांच्याबद्दलच विचार करू शकाल. तुम्ही जसे पेराल तसेच उगवेल. म्हणून कधीही फसवणूक करून मिळालेल्या पैशाने दीर्घकालीन भरभराटीचा विचार देखील करू नका. वाईट मार्गाने (फसवणुकीने) मिळवलेले अन्न खाल्याने दृष्ट शक्तिपासुन ईश्वराचे संरक्षणही मिळत नाही.

• व्यवसायाच्या व्यवहारात घासाघीस करणे आणि कर वाचविणे हा तुमचा जन्मसिद्ध हक्क आहे. पण त्याच्यापलीकडे अत्यंत प्रामाणिक राहा.

तुम्ही तुमच्या स्वच्छ अन्नाबद्दल अशी काळजी घ्या, की लोक तुम्हाला जुनाट मतप्रणालीचे किंवा विक्षिप्त म्हणाले तरीही तुम्ही

तुमच्या स्वच्छ अन्नाबाबत योग्य काळजी घ्या. बेवारस वस्तू वा पैसे जे जमिनीवर पडलेले आहेत ते उचलू नका. मग तो एक रुपया असो किंवा १००० रुपये असोत. जी व्यक्ति ही सभ्य नाही ह्याची तुम्हाला माहिती आहे त्याच्याकडे कधीही खाऊ नका किंवा त्याचा पाहुणा बनू नका.

- तुमच्या पत्नीशी संभोग केल्यानंतर किंवा तुमच्या मुलाच्या बाळंतपणानंतर किंवा मासिकपाळीच्या काळात तुमचे अन्न खाण्यापूर्वी स्वच्छतेची पूर्ण काळजी घ्या.

- विधायक हुषारी (Constructive intelligence) ही एक ईश्वरी देणगी आहे. संगीतकार हा प्रत्येक वेळी मागणीनुसार हृदयाला भिडवून जाणारा संगीताचा कार्यक्रम करू शकत नाही. त्यासाठी त्याला त्याच्या मनाची तयारी करावी लागते व संगीताचा प्रवाह बाहेर टाकण्यापूर्वी निसर्गमातेच्या आधारे शांतपणे संगीत लहरींना ग्रहण करावे लागते. कवीलाही स्तब्ध राहून व त्याच्या अंतःकरणातील आवाज ऐकण्यासाठी व त्याचे कागदावर लिखाण करण्यापूर्वी संपूर्ण लक्ष केंद्रित करावे लागते. संगीतकार व कवी ह्यांच्याकडे काही ताल आणि काव्य यांचा शब्दकोश नाही. परंतु ईश्वरी कृपेने किंवा निसर्गमातेच्या प्रेरणेने त्यांना ती कला प्राप्त होते.

व्यवसाय यशस्वी होण्यासाठी विधायक दृष्टीने विचार करण्यास अशाच ईश्वरी मदतीची आवश्यकता असते व त्यासाठी तुम्ही स्वच्छतेबद्दल अंत्यत काळजी घेतली पाहिजे.

### शरीराची स्वच्छता (Cleanliness of the Body)

तुमच्या घरी दूरदर्शन संच (टी.व्ही) आणि केबलची जोडणी असेल. आपण टी.व्ही.ला विद्युत पुरवठा हा दोन तारांनी करतो. एक Neutral व दुसरी Phase. टि.व्ही.ला जोडलेल्या केबलला पण दोन तारा असतात पण त्या निराळ्या स्वरूपाच्या असतात. विद्युतप्रवाह पुरवठा करणाऱ्या दोन तारा एकमेकांना समांतर असतात. एका तारेमधून वीजप्रवाह हा टि.व्ही.मध्ये शिरतो व दुसऱ्या तारेतून तो

पुरवठ्याकडे परत येतो, तर केबलमध्ये एक तार ही टि.व्ही.मध्ये जाते व दुसरी ही पहिल्या तारेभोवती गुंडाळलेली असते. ह्या दुसऱ्या तारेचे पहिल्या तारेवर आच्छादन करण्याचे कारण म्हणजे तिचे बाहेरच्या नको असणाऱ्या संदेशापासून (Signal) रक्षण करणे. तसेच गुंडाळलेली तार ही (जमीन संरक्षकाचे) Earthing कार्य करते. जर तुम्ही केबलच्या एकाच तारेचा टी.व्ही.ला पुरवठा केलात तर चित्र हे स्पष्ट दिसणार नाही, आणि टी.व्ही.च्या पडद्यावर विकृत आकृत्या व तसेच अन्य नको असलेले संदेश (Signal) मिळत राहातील.

त्याचप्रमाणे तुमच्या आत्म्याला निसर्गमाता आणि परमेश्वर ह्यांकडून मिळणारे ईश्वरी संदेश ह्यांचे अनावश्यक संदेशापासून रक्षण केले पाहिजे. तुमचे शरीर हे दुष्ट संदेशाचा प्रभाव पडण्यापासून पुरेसे विरोधक असले पाहिजे. त्यानंतरच तुमचे मन हे फक्त ईश्वरी बुद्धिमत्तेचे संदेश पाहिलं आणि ग्रहण करील व हे फक्त संपूर्ण शरीर साफ, स्वच्छ असल्यावरच शक्य आहे.

शरीराच्या स्वच्छतेसंबंधी माझ्या व्यक्तिगत सूचना पुढीलप्रमाणे आहेत.

- माणसाच्या शरीरांतून ज्या गोष्टी बाहेर पडतात त्या घाणेरड्या असतात. घाम, विष्ठा, मूत्र, रक्त आणि वीर्य इत्यादि ह्या सर्व घाण आहेत. आपणास हे माहित आहे व आपण त्या धुवून टाकतो. परंतु कुठच्या व कोणत्या मर्यादेपर्यंत आपण धुवून टाकतो हे संस्कृति संस्कृतिवर अवलंबून आहे.

- तुम्ही सकाळपासून संध्याकाळपर्यंत भुकेले राहू शकता, पण जर तुमचा उपवास करण्याचा हेतू असेल, तरच तुम्हाला ईश्वराचा कृपाप्रसाद मिळेल. हेतुशिवाय भुकेले राहिल्याने ईश्वराची कृपा होत नाही. त्याचप्रमाणे आपण नेहमी शरीराची स्वच्छता करतो, पण ईश्वराने सांगितलेल्या मार्गाप्रमाणे जर आपण आपल्या शरीराची स्वच्छता केली व आपला हेतुही ईश्वरी संरक्षण हा असला तरच आपल्याला ईश्वराचे अचुक संरक्षण मिळते.

- आपण आपले केस चांगल्या स्थितीत ठेवण्यासाठी शॅम्पूचा वापर करतो. शॅम्पू हा तीन मिनिटे लावल्यानंतर जर आपण आपले केस हे पाण्याने दहा मिनिटे धुतले आणि शांपूचे सर्व कण काढून टाकले तरीपण आपले केस हे मऊ आणि रेशमासारखे होतात. कारण केस हे शॅम्पूतील रसायने शोषून घेतात आणि रसायनांचा परिणाम हा जवळजवळ २४ ते ४८ तास टिकतो.

त्याचप्रमाणे काखेतील व आपल्या लज्जास्थानावरील केस हे घामटपणा घाणीत बराचकाळ राहातात. ते संभोग करताना प्रत्यक्षात वीर्य शोषून घेतात तसेच मासिकपाळीच्या वेळी रक्ताचे शोषण करतात. स्वच्छ राहण्यासाठी आपण स्नान करतो. आपण कितीही साबण व पाणी ह्यांचा वापर केला, तरी घाम, वीर्य व रक्त यांचे परिणाम हे केसामध्ये स्नान केल्यानंतरही शाम्पूच्या परिणामासारखे शिल्लक राहातात. म्हणून आध्यात्मिकरित्या स्वच्छ राहाण्यासाठी तुमच्या काखेतील व गुदद्वाराच्या भोवतालचे केस दर पंधरा ते वीस दिवसांनी काढून टाका. चाळीस दिवसांच्यापुढे विलंब करू नका. कारण त्या काळानंतर केस हे आध्यात्मिक दृष्टीने अस्वच्छ म्हणून मानले जातात.

- वाऱ्यामध्ये धुळीकण असतात. धुळीच्या कणांमध्ये सर्व तऱ्हेच्या वस्तूंच्या बारीक कणाचा समावेश असतो. त्यामध्ये प्राणी व मानवी विष्ठा ह्यांचे कण तसेच घाणेरडी गटारे व नाले ह्यांमधील कणांचा पण समावेश असतो. वारा हे सर्व धुळीकण आपल्या डोक्यावरील केसात खोलवर पसरवितो. अशा घाणेरड्या धुळीच्या कणांपासून पूर्णपणे मुक्त राहण्यासाठी साधू आणि हिंदू विद्वानांनी आपले डोक्यावरील सर्व केस काढले व मुसलमान आणि शिख ह्यांनी डोक्यावर टोपी किंवा फेटा धारण केला. अशा तऱ्हेच्या घाणीपासून स्वच्छ राहण्यासाठी तुमच्या मनाजोगते योग्य ते मार्ग अवलंब करा.

- आपण रोज आंघोळ करतो. जेव्हा आपण संडासात जातो तेव्हा सुद्धा आपण संपूर्ण विष्ठा साफ करून दूर करण्याची काळजी घेतो. पण आपण लघवीच्या बाबतीत मात्र निष्काळजी राहातो. जर

लघवीचा एक थेंब हा मशिद, चर्च किंवा मंदिराच्या जमिनीवर सांडला व त्या मौलवी किंवा पंडीत यांना ते माहित पडले, तर तो साफ करण्यापूर्वी प्रार्थना चालू करील काय? जर हे अतिशय घाणेरडे आहे तर तुम्ही तुमच्या अंतर्वस्त्रात तो थेंब सांडूच का देता व तरीही तुम्ही असा विचार करता की तुम्ही स्वच्छ आहात व प्रार्थनेला लायक आहात किंवा ईश्वरी मदत व संरक्षण ह्यांना पात्र आहात?

ज्याप्रमाणे तुम्ही विष्ठा साफ करून दूर टाकता त्याचप्रमाणे लघवीही साफ स्वच्छ करा व तिचा एकही थेंब हा तुमचे शरीर आणि कपडे ह्यांच्यावर पडणार नाही ह्याची नीट काळजी घ्या. जर तुमचे अंतर्वस्त्र हे लहान थेंबपण शोषण करीत असेल, तर तुम्ही तुमचे हात आणि तोंड स्वच्छ धुवून पण आध्यात्मिकरीत्या स्वच्छ होऊ शकत नाही. तुमचे कपडे आणि अंतर्वस्त्र हे अनेक प्रकारच्या घाणेरडया गोष्टींपासून पूर्णपणे मुक्त असेल ह्याची काटेकोर काळजी घ्या.

म्हणून नेहमी बसून, बसण्याच्या स्थितीत लघवी करा व काही वेळ वाट पाहा त्यामुळे शेवटचा थेंब पण बाहेर येईल आणि मग तो टिश्यू कागदाने पुसून किंवा पाण्याने साफ करून संपूर्णपणे स्वच्छ राहण्याचा प्रयत्न करा.

- खालील काही गोष्टीनंतर स्नान करणे हे सक्तिचे आहे.

  अ) मुलाचा जन्म (जेव्हा रक्त थांबते किंवा ४० दिवसानंतर)

  ब) मासिकपाळीच्यानंतर

  क) संभोग क्रिया केल्यानंतर

- आध्यात्मिक शुद्धतेसाठी स्वच्छ स्नानगृहात आंघोळ करा. जमिनीवर उडालेल्या पाण्यामुळे तुम्ही पुन्हा अस्वच्छ होता कामा नये.

अ) तुमच्या शरीरांवरील सर्व रक्त, वीर्य, शौच, लघवी आणि घाम इत्यादि सर्व साफ करून मगच स्नानाला सुरुवात करा.

ब) मग गुळण्या करा व तोंड स्वच्छ करा.

क) मग तुमच्या नाकपुड्या आतील मऊ भागापर्यंत स्वच्छ करा.

ड) मग तुमचे सर्व शरीर पाण्याने खळबळून धुवा. शरीराचा कोणताही भाग हा कोरडा राहाता कामा नये.

• जर तुम्हाला वरील तीनही परिस्थिती नसतील, तर तुम्ही स्वतः आध्यात्मिक दृष्टीने पुढीलप्रमाणे स्वच्छ राहा.

अ) एखाद्या स्वच्छ जागी बसा. जमिनीवर पडणारे किंवा मैदानात पडणारे पाणी ह्यांमुळे तुमचे कपडे अशुद्ध बनू नयेत.

ब) तुमच्या मनगटापर्यंत हात साफ धुवा. एकदा गुळण्या करा आणि तुमचे तोंड दोन वेळा पाण्याने धुवून टाका.

क) नाकपुड्या ह्या आतील मऊ अशा मांसल भागापर्यंत तीन वेळा साफ करा.

ड) संपूर्ण चेहरा पाण्याने तीन वेळा धुवा.

इ) तुमचे हात कोपरापर्यंत पुन्हा तीन वेळा धुवा.

फ) स्वच्छ ओला हात हा डोक्यावरून व केसांवरून सर्व धुळीकण निघून जाण्यासाठी डोक्याच्या पुढून मागे एकदा फिरवा.

ग) तुमचे पाय हे घोट्याच्या सांध्यापर्यंत तीन वेळा स्वच्छ करा.

• वरील प्रक्रियेला '**वझू**' असे म्हणतात. ह्या स्थितीमध्ये एक आध्यात्मिक कवच तुमचे संरक्षण करील व तुम्हाला अत्यंत शांत वाटेल. सर्व पवित्र पुस्तके ही वझू क्रियेनंतरच स्पर्श करून हाताळली पाहिजेत.

- **खालील गोष्टीमुळे वझू ही निरुपयोगी ठरते.**

  अ) लघवी करणे, शौचाला जाणे, वीर्य वा रक्त वाहू देणे.

  ब) उलटी (Vomiting)

  क) जखमेतील रक्तस्त्राव

  ड) झोपणे

**काम करण्याच्या ठिकाणाची स्वच्छता (Cleanliness of the Work place)**

- आपण प्रार्थना करण्यासाठी मंदिर, मशिद किंवा चर्च ह्यांमध्ये जाणे पसंत करतो. पण ईश्वर तेथे राहात नाही. तर आपण त्याच जागी जाणे का पसंत करतो? कारण असे आहे की, अशा जागा ह्या संपूर्णपणे स्वच्छ असतात व नियमित होणाऱ्या प्रार्थनांमुळे तेथील वातावरण हे ईश्वरी स्पंदनलहरीनी भारलेले असते व ज्यावेळी आपण त्याठिकाणी प्रवेश करतो. तेव्हा आपल्याला प्रसन्न वाटते आणि प्रार्थना करण्याची इच्छा निर्माण होते.

आपली काम करण्याची जागा ही सुद्धा एक प्रकारचे प्रार्थना करण्याचे स्थान आहे. आपल्या कुटुंबासाठी योग्य मार्गाने रोजीरोटी कमविणे हा एक महान प्रार्थना आहे. म्हणून आपण आपली कामाची जागा ही पूजनीय स्थळाप्रमाणे साफसूफ ठेवण्यासाठी योग्य ती काळजी घेतली पाहिजे.

- दारू पिणे, कामातूर करणारी आणि अश्लील छायाचित्रे ठेवणे, गाणी ऐकणे, प्रेमाचे चाळे करणे व वाईट शब्द वापरणे इत्यादि गोष्टी खरोखर टाळल्या पाहिजेत आणि सर्वसाधारणपणे ज्या गोष्टी आपण प्रार्थनेच्या ठिकाणी करीत नाही व ठेवीत नाही अशा गोष्टी व वस्तू ह्या काम करण्याच्या जागी पण अनुक्रमे करावयाच्या व ठेवायच्या नाहीत.

- तुमचे वातावरण अनुकूल असेल, तर पवित्र आत्मे आणि ईश्वरी शक्ति तुम्हाला मदत करू शकतील. कामाची जागा ही साफ

केल्यावर सकाळी आणि संध्याकाळी त्या जागेचे वातावरण स्वच्छ राखण्यासाठी सुगंधी अगरबत्ती जाळा.

- जेव्हा तुम्ही तुमच्या काम करण्याच्या जागी काम करण्यासाठी येता, तेव्हा प्रथम एक सुगंधी उदबत्ती पेटवा, प्रार्थना करून परमेश्वराकडे तुमची मनःशांति व भरभराट तसेच मानवजातीच्या कल्याणासाठी प्रार्थना करा व नंतर तुमच्या कामाला सुरुवात करा.

- जर तुम्ही स्वच्छ खाणे खाल्लेत, शारीरिकरीत्या स्वच्छ राहिलात, कामाची जागा साफ ठेवलीत, तुमचे काम प्रार्थना करून सुरू केलेत आणि तुमचे व्यवहार पद्धतशीरपणे व प्रामाणिकपणे आचरणात आणलेत. तर तुम्हाला व तुमच्या वारसदारांना कधीही उतरती कळा, जीवनात भोगावी लागणार नाही ह्याची खात्री बाळगा. हे शक्य आहे, कारण जो या जगावर राज्य करतो व संपूर्ण विश्वाचे नियंत्रण करतो, अशा शक्तिमान परमेश्वराचा तुम्ही दोरखंड घट्ट पकडून धरलेला आहे.

## :- अपयशाची सर्वसामान्य कारणे -:

- जर तुम्ही कपभर दुधात साखर घातलीत तर त्या दुधाची चव सुधारते. जर तुम्ही सुका मेवा दुधात टाकलात तर ती चव आणखीनच सुधारेल. जर तुम्ही केशर टाकलेत तर दुधाला सुगंधही चांगला होईल. पण ह्या सर्व गोष्टी घातल्यानंतर त्या दुधात जर तुम्ही लिंबाच्या रसाचा एक थेंब टाकल्यास काय होईल बरे? ते दुध आंबट होईल आणि तुम्हाला ते सर्व टाकून द्यावे लागेल.

- एखाद्या इलेक्ट्रॉनिक मंडलाची (Circuit) रचना करा. तज्ञ लोकांचे मार्गदर्शन घ्या, उत्कृष्ट दर्जाचे सुटे भाग खरेदी करा व अत्यंत आधुनिक अशा प्रयोगशाळेत त्यांची जोडणी (Assemble) करा. जेव्हा तुमचे इलेक्ट्रॉनिक मंडळ हे कार्य करणे चालू करेल त्यावर पाण्याचा एक थेंब टाका. त्यामुळे काय होईल? खंडित वीज प्रवाहामुळे (Short Circuit) सर्व वस्तू जळून जातील.

- एखाद्या विषयाचा संपूर्णपणे अभ्यास करा. त्यानंतर परीक्षेला बसा. सर्व प्रश्नांची उत्तरे ही उत्तमरीतीने लिहून काढा. फक्त तुमची ओळख दर्शविणारा अनुक्रमांक लिहिण्यात चूक करा. तर मग काय होईल? कदाचित तुमच्या गुणांच्या यादीमध्ये गुण जमा केले जाणार नाहीत.

- एखादी क्षुल्लक चूक ही सर्व प्रयत्नांवर पाणी फिरविते. तसेच यशाच्यासाठी संघर्ष करताना पण हे असे घडते. माणूस हा यशासाठी सर्व पद्धति आणि नियम ह्यांचे अनुसरण करतो. पण एखादी लहान चूक करतो जी त्याला किरकोळ वाटते किंवा महत्त्वाची वाटत नाही व तो सतत त्याच्या आयुष्यभर हा नेहमी अयशस्वीच होत राहातो तो त्याच्या नशीबाला दोष देतो पण त्याची स्वतःची चूक समजून घेण्यास अपयशी ठरतो.

पुढील दिलेल्या प्रकरणातील चुका ज्या केल्यामुळे मानव हा खऱ्या अर्थी कधीही यशवंत होणार नाही त्या अशा आहेत.

## *प्रकरण क्र. ३३*

# तीन भयंकर गुन्हे.

(The Three Great Sins)

आपण आपल्या भोवतालची जी दुनिया, निसर्ग आणि विश्व पाहातो हे साधारणपणे लक्षावधि वर्षे जुने आहेत. त्यांची या प्रदीर्घ कालावधीत अधोगति झालेली नाही व ते अजून कार्यक्षम आणि उत्कृष्ट स्थितीत आहेत. कारण त्यांची स्वतःची अशी संरक्षण व्यवस्था आहे. जेव्हा विनाशाची क्रिया घडते तेव्हा ते आपोआपच तो विनाश भरून काढण्याची पद्धत विकसित करते किंवा निर्माण करते. उदा. वीजेमुळे जंगले जळून जातात, वारा पुन्हा हा लांबच्या अंतरावरून बिया आणतो व पाऊस जंगलाची पुन्हा लागवड करतो.

आगीमुळे आजुबाजूच्या हवेतील ऑक्सिजन हा कमी होतो. हिरवी पाने पुन्हा तो Photosynthesis क्रियेने उत्पन्न करून ऑक्सिजनच्या कमतरतेची भरपाई करतात. त्याचप्रमाणे माणसाच्या आयुष्याची मर्यादा ही अंदाजे ७० वर्षे आहे. असे दीर्घ आयुष्य जगण्यासाठी निसर्गाने मानवी शरीरात अशीच एक संरक्षण पद्धत (Immune system) निश्चित केलेली आहे. जेव्हा शरीराच्या बाहेरून जीवाणू किंवा बॅक्टेरिया हे शरीरावर हल्ला करतात, तेव्हा शरीरातील पांढऱ्या रक्तपेशींचे प्रमाण आपोआप वाढते. त्यामुळे त्या जीवाणू किंवा बॅक्टेरिया यांच्याविरूद्ध लढा देतात व शरीराची जखम भरून काढतात.

जेव्हा कुत्रा हा जखमी होतो तेव्हा त्याची जखम पटकन भरून येत नाही. बऱ्याच वेळेला मी त्यांच्या जखमांमध्ये अळ्या पडलेल्या पाहिल्या आहेत. पण नंतर काही काळानंतर ही निसर्गाची संरक्षक पद्धति कुत्र्याची सडलेली जखम भरून काढते. काही कुत्रे मरतात पण बरेचसे वाचतात. आपण आपल्या रोजच्या जीवनात ही निसर्गाची जखम भरून काढण्याची क्रिया पाहातो व निरीक्षण करतो.

मानवी संस्कृति किंवा मानवी समाज हा मानवी शरीरासारखाच आहे. त्याच्याकडे सुद्धा स्वतःची संरक्षण पद्धति आहे. कंपनांची गुंतागुंतीची पद्धत (Complex system of Vibration) आणि विश्वाची सुव्यवस्थित नकारार्थी व होकारार्थी शक्तिही (Negative & positive energy of cosmos) अस्तित्वात असून ते कार्य करतात आणि समजण्यास आणि स्पष्टीकरणास कठिण आहे. ज्या विनाशकारी प्रसंगांमुळे मानवजातीची सुनियंत्रित शांत आणि प्रगतीमय जीवनशैली बिघडून जाते तो विनाशकारी प्रसंग हळुहळु मरतो. निसर्गाची गुंतागुंताची संरक्षण पद्धत ही अडथळे आणणाऱ्या घटकांचा जोर कमी करते व मानवाचे जीवन सुसंवादी, शांततामय आणि प्रगतिशील व बळकट करते.

ब्रिटनचे साम्राज्य हे बलवान आणि प्रबळ होते. कोणत्या देशाने ब्रिटनचा पराभव केला? कोणीही नाही. मग त्याच्या श्रेष्ठपणाला काय झाले? त्यांच्या साम्राज्याचे तुकडे तुकडे का झाले? प्रत्यक्षात त्यांनी स्वार्थी आणि दुष्टवृत्तिने जगावर राज्य केले. त्यांनी सामान्य माणसांवर अमानवी कायदे लादले. म्हणून प्रत्यक्षात पराभूत न होऊन सुद्धा निसर्गाने त्यांचे पंख कापले. आज युरोपच्या पश्चिम किनाऱ्यावर ब्रिटन हा एक साधा देश आहे.

ज्याचे बलवान सेनादल हे सर्व जगाचा कितीही वेळा नाश करण्यास पुरेसे होते, अशा सामर्थ्यशाली रशियाच्या बाबतीतही हेच सत्य आहे. रशियाचे विघटन होण्याच्यावेळी त्या सैन्याकडे स्वतःचे पोट भरण्याइतका पुरेसा अन्नसाठा नव्हता. रशियाचे तुकडे कोणी केले? हीच ती निसर्गाची संरक्षण योजना त्यासाठी कारणीभूत

झाली. रशियाचे कम्युनिस्ट नियम हे सुसंवादी, शांततामय आणि प्रगत समाज जीवनशैली ह्यासाठी समाजाला मदत करत नव्हते. त्यांनी धार्मिक प्रार्थनास्थळेही बंद केली, तसेच कष्ट करून मिळालेल्या संपत्तितून स्वतःची मालमत्ता बनविण्याचा अधिकार जनतेला नाकारला. तसेच भाषणस्वातंत्र्य आणि विचार व्यक्त करणे ह्यांवर बंदी घातली. तसेच मुक्त संचार करण्यास नकार दिला इत्यादि. म्हणून निसर्गाने पुन्हा त्यांना त्यांच्या पूर्वपदावर आणले. कुत्र्याची जखम जशी सुरूवातीला वाढते, वाईट स्थितीला जाते व शेवटी भरून येते. त्याचप्रमाणे सर्व सामर्थ्यवान राजे ज्यांनी ह्या पृथ्वीवर दुष्टपणाने व अमानवी रीतीने राज्य केले, त्यांनी सुरुवातीला काही ठराविक मर्यादेपर्यंत प्रगति केली व शेवटी त्यांचे विघटन झाले व ते अदृश्य झाले.

माणसाच्या व्यक्तिगत पातळीवरील रोजच्या जीवनात पण अशातऱ्हेचा कायदा काम करतो. जे शांतताप्रिय, सहनशील, प्रामाणिक, प्रेमळ व कष्ट करणारे आहेत व सर्वसाधारणपणे शांततेने राहतात व समाजाला शांतिने प्रगति करण्यासाठी व सुखाने राहाण्यासाठी मदत करतात, अशा लोकांनाच संरक्षण पद्धति भरभराटीसाठी मदत करते आणि जे लोक मानवी समाजात अडथळे आणतात ते कुत्र्याच्या सडलेल्या जखमेप्रमाणे, काही काळासाठी उन्नतिही करतात पण अखेर शेवटी त्यांची भरभराट नष्ट होते किंवा त्यांचा नाश होतो.

जर तुम्ही भ्रष्टाचारी, जातीयवादी किंवा गुन्हेगार असाल किंवा कुठल्याही मार्गाने समाजाला पिळून काढता व त्याचा फायदा करीत नाही, तर तुम्ही हे समाजरुपी शरीरातील जीवाणू किंवा बॅक्टेरिया सारखे आहात. ह्या जगाची योग्य ती संरक्षण पद्धत ही तुमच्याविरुद्ध काम करेल. काही तात्पुरत्या काळासाठी तुम्ही वाचाल किंवा भरभराटीला याल. पण अंतिम क्षणी तुमचे विघटन होईल व मरून जाल. आणि तुम्हाला सहजगत्या मिळालेली मालमत्ता वा संपत्ति ही शेवटी धुळीला मिळेल. म्हणून काळजी घ्या ! जर तुम्ही भ्रष्टाचारी, जातीयवादी व गुन्हेगारी वृत्तिचे असाल तर यशाचा नियम हा तुम्हाला कधीही मदत करणार नाही.

ईश्वर, पवित्र कुराणात सांगतो,

*"जे मानवजातीसाठी फायदा करून देणारे आहेत ते जमिनीच्या खालील भागात पावसाचे पाणी जसे थांबते, तसेच ते भरभराट घेऊन थांबतील व ज्यांच्यापासून समाजाला काहीही लाभ नाही ते पावसाच्या वाहत्या पाण्याच्या पृष्ठभागावर फेसाप्रमाणे धुवून नेले जातील." (पवित्र कुराण १३:१७)*

*प्रकरण क्र. ३४*

# आईवडिलांचे शाप

(Curse of Parents)

परमेश्वरानंतर आईवडिलांचे स्थान आहे. लहान मूल हे प्रत्यक्षात त्याच्या आईच्या रक्त आणि मांस ह्यापासून तयार होते. नऊ महिन्यांसाठी तो आईच्या शरीराचा एक भाग म्हणून राहातो व निसर्गाच्या उत्पादनाची क्रिया पूर्ण झाल्यावर वेगळा केला जातो. पण तरीसुद्धा पुढील २५ वर्षे तो पुन्हा त्यांच्या आईवडिलांवर अवलंबून असतो. निसर्गाने माणसाच्या वागणूकीची आज्ञावलि (सॉफ्टवेअर) अशा तऱ्हेने निर्माण केले आहे की आईवडिल हे त्यांच्या सुखापेक्षा त्यांच्या मुलांच्या सुखाला अधिक प्राधान्य देतात. ते प्रत्यक्षात त्यांचा रिकामा वेळ, आनंद, आराम व त्यांच्या तारुण्यातील सुवर्णकाळ ह्या सर्वांचा त्यांच्या मुलांना वाढविण्यासाठी त्याग करतात. हा ईश्वराचा संरक्षण करण्याचा आणि मानवजात पुढे चांगल्या तऱ्हेने चालू ठेवण्याचा एक मार्ग आहे.

ह्या प्रक्रियेतील दुसरा भाग म्हणजे नर-मादी जोडी ज्यांनी मुलाला जन्म दिला व त्याचे पालनपोषण केले. हे वयाच्या ६० व्या वर्षी निवृत्त होतात व पुढील सुमारे २५ वर्षे त्यांच्या मुलांवर अवलंबून राहतात. पुन्हा एकदा त्याच स्वर्गीय पद्धतिप्रमाणे मानवी जीवनाचे

संरक्षण करण्याच्या प्रक्रियेनुसार त्या मुलांचे आपल्या वयोवृद्ध मातापित्याची नीट देखभाल करणे हे एक कर्तव्य असते. जर त्याच्या कर्तव्यापासून तो दूर गेला, तर तो स्वर्गीय नियम आणि निसर्गाची पद्धत ह्यांपासूनही दूर जातो.

जर एखादी क्रिया ही जर विश्वाच्या नियमाला सुखकारक नसेल व निसर्गाच्या पद्धतिमध्ये अडथळा आणीत असेल, तर ह्या अडथळा आणणाऱ्या क्रियेच्या उगमाचा हा हळूहळू निसर्गमातेकडून शेवट केला जातो.

जो आपल्या आईवडिलांना नाकारतो व आपल्या कर्तव्यापासून दूर जातो तो निसर्गाच्या पद्धतिचे पालन करीत नाही. तो या जगात एक अडथळा निर्माण करणारा उगमस्थान आहे. निसर्गमाता त्याचे पंख छाटून टाकील तो आणि त्याची भरभराट हळूहळू लयास जाईल. तो समाजावर काहीही प्रभाव नसलेला असा एक सामान्य माणूस म्हणून मरण पावेल. त्यांचे अस्तित्व वा मृत्यू ह्यांनी मानवी समाजाला काही फरक पडणार नाही. जर तुम्हाला ह्या समाजात व जगात एक महत्त्वपूर्ण व्यक्ति म्हणून राहावयाचे आहे तर विश्वाच्या नियमाचे अनुकरण करा. ज्यांनी तुमची लहानपणी काळजी घेतली व प्रेम दिले अशा आईवडिलांची तुम्ही सेवा करा.

आपल्या शेवटच्या ग्रंथात ईश्वर सांगतो,

*"तुझ्या पालनकर्त्याने निर्णय दिलेला आहे की तुम्ही लोकांनी इतर कोणाचीही भक्ती करू नये परंतु केवळ त्यांची. आई-वडीलांशी सद्‌वर्तन करा, जर तुमच्यापाशी त्यांच्यापैकी कोणी एक अथवा दोघे वृद्ध होऊन राहिले तर त्यांच्यासाठी ब्र शब्ददेखील काढू नका व त्यांनी झिडकारुन प्रत्युतरदेखील देऊ नका व त्यांना झिडकारुन प्रत्युतरदेखील देऊ नका. तर त्यांच्याशी आदरपुर्वक बोला, आणि नरमी व द्‌यार्द्रतेने त्यांच्यासमोर नमुन रहा. आणि प्रार्थना करित जा की,"हे पालनकर्त्या, यांच्यावर द्‌या कर ज्याप्रमाने यांनी द्‌या व वात्सल्याने बालपणी माझे संगोपण केले."* (पवित्र कुराण१७:२३-२४)

*मुलाने त्याच्या वडिलांचा सहकारी* (Subordinate) *आणि आईपुढे आज्ञाधारक असले पाहिजे.* (अथर्ववेद ३:३०:२)

प्रेषित मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) म्हणाले,

*"जे लोक आपल्या म्हाताऱ्या आईवडीलांची सेवा करुन स्वर्ग मिळवत नाहीत, त्यांचे नाक हे धुळीला स्पर्श करुन राहील" (त्याचा तिरस्कार केला जाईल.)*

एकदा प्रेषित मुसाने ईश्वराला विचारले की, त्याचा स्वर्गामधील शेजारी कोण असेल. ईश्वराने जबाब दिला,"जो आपल्या अत्यंत कृश आणि वृद्ध आईची चांगली काळजी घेत आहे असा लाकूडतोड्या!" (लाकूडतोड्या हा प्रेषीत मुसा यांचा एक आज्ञाधारक होता.)

आईवडिलांची सेवा केल्याबद्दल खूप मोठे पारितोषिक मिळते व आज्ञा मोडणाऱ्यांना भयानक शाप मिळतो.

ज्यांच्यावर ईश्वराचा शाप आहे तो कसा यशस्वी होईल?

## *प्रकरण क्र. ३५*

# पाण्याचे थेंब

## (The Drops of Water)

- आफ्रिकेच्या जंगलात हजारो सिंह हे मुक्तपणे अन्य लाखो प्राण्यांबरोबर उदा. हरीण, हत्ती, झेब्रा व जंगली चतुष्पाद जनावरे इ. बरोबर फिरत असतात. काही थोडेच प्राणी सिंहांपासुन स्वतःचे संरक्षण करू शकतात व बाकी सर्व सिंहांकडून मारलेही जाऊ शकतात. तरी यानंतरही त्यांचे जीवन चालू असते आणि सर्व तऱ्हेच्या प्राण्यांची प्रजाती जंगलात पसरते. थोडक्यात म्हणजेच जीवन आणि मृत्यू ह्यांच्यामध्ये समतोलपणा किंवा स्थिरता असते. सिंह हे त्यांची भूक भागविण्यापुरतीच प्राण्यांची शिकार करतात. तो जास्त प्राणी मारीत नाहीत तसेच त्यांच्या मांसाचा साठापण करीत नाहीत. थोडक्यात एक मनुष्यप्राणी सोडला, तर प्रत्येक सजीव हा पृथ्वीवर ह्या ना त्या रितीने निसर्गाचा समतोलपणा राखण्यासाठी मदत करीत असतो व नैसर्गिक संपत्तिचा नाश करीत नाही वा फुकटही घालवीत नाही. म्हणून समतोलपणा हा ढळला जात नाही आणि हे निसर्गाचे चक्र सतत चालू राहाते.

- तीनशे वर्षांपूर्वी राजस्थान व हरियाना ही राज्ये घनदाट जंगलांनी भरलेली होती. तैमूरलंग ज्याने आक्रमण केले व दिल्लीची

लूट केली. तो आपल्या आत्मचरित्रांत असं सांगतो की, त्याचे सैनिक हे सतत १५ दिवस साप, हत्ती आणि माकडे ह्यांनी व्यापून टाकलेल्या घनदाट जंगलातून चालत दिल्लीला पोहोचत होते. पण आज तेथे जंगल नाही. उलट राजस्थान हे आज ओसाड वाळवंट झाले व ते दिवसेंदिवस वाढतच चालले आहे. ह्याचे कारण म्हणजे निसर्गाची अमूल्य देणगी जंगले ह्यांच्याकडे केलेले दुर्लक्ष, बेपर्वाई आणि नासधूस.

• भारतातील मारवाडी समाज जो गुजरात आणि राजस्थान भागात राहातो ह्यांच्यात बहुतेक व्यवसायिक मनोवृत्ति असलेले लोक आहेत. मोठमोठी व्यवसायिक व्यवस्थापने त्यांच्या मालकीची आहेत.

एक मारवाडी सद्‌गृहस्थ हा (Non ferrous metal) लोखंड नसलेल्या भंगाराचा व्यापारी होता. सुरुवातीला त्याचा धंदा जोरात चालला व त्याचे नशीब फळफळले. परंतु काही काळानंतर कोणत्याही कारणाशिवाय त्याची अधोगति सुरू झाली. त्याचा धंदा, मालमत्ता सर्व नाहिसे झाले व तो दिवाळखोर बनला. त्याला ह्याचे कारण समजले नाही म्हणून तो धार्मिक उपायांकडे वळला. त्याने त्याच्या धार्मिक गुरूशी सल्लामसलत केली, त्याची परिस्थिती त्याला सांगितली. त्याने गुरूला त्याच्या अधोगतिची कारणे विचारली आणि त्या अवस्थेतून बाहेर पडण्यासाठी काही उपाय विचारले. त्याच्या गुरूने कारण जाणून घेण्यासाठी ध्यान केले. तेव्हा त्याला कळून चुकले, की ईश्वराच्या देणगीची नासाडी केल्यामुळे मारवाड्याची ही अधोगति झाली होती. त्या मारवाडी सद्‌गृहस्थाने सर्व बाजूंनी व दिशांनी विचार केला पण आपण ईश्वराच्या कोणत्या देणगीची नासाडी करीत होतो ते त्याच्या काही लक्षात आले नाही.

तो मारवाडी रिकाम्या हाताने मुंबईला परत आला. त्याने रात्रंदिवस विचार केला, पण त्याला काही कारण समजू शकले नाही. जेव्हा एक दिवस तो आंघोळीसाठी तयारी करीत होता, तेव्हा त्याला त्याच्या प्रश्नाचे उत्तर सापडले. त्याच्या नळातुन प्रत्येक क्षणाला थेंब-थेंब पाणी गळत होते, तो ईश्वराच्या देणगीचा नाश करीत

होता. त्याने आपली चूक सुधारली व त्यानंतर त्याचा काळ बदलला. त्याचा धंदा पूर्ववत उत्तम चालायला आणि नफा द्यावयाला लागला.

- मी नवनीत प्रकाशनने प्रसिद्ध केलेले व डॉ. नितीन प्रकाश ह्यांनी फेंगशुईवर लिहिलेल्या पुस्तकाचा अभ्यास केला (ISBN ८१-२४३-०६५०-८) त्या पुस्तकांत पण पान क्र. ६२ वर मला असे आढळून आले की पाणी गळणारा नळ हा सकारात्मक शक्ति तसेच संपत्तिही वाहून नेतो आणि कमनशीब आणतो.

जेव्हा क्षुल्लक पाण्याचे थेंब जरी तुमची भरभराट वाहून नेत असतील, तर जेव्हा तुम्ही जास्त महत्त्वपूर्ण अशा ईश्वरी बक्षीसांचा उदा. पैसा, वेळ, तुमची शारीरिक व मानसिक शक्ति ह्यांचा नाश करत असता त्यावेळी काय होईल?

- आपण त्या वरील दोन उदाहरणांवर विश्वास ठेवू किंवा ठेवणार नाही पण हे सत्य आहे की, आपल्या गरजांपेक्षा कोणत्याही गोष्टीचा केलेला अतिरिकी वापर किंवा अतिरेकी खर्च हा स्वर्गीय जीवनाचा समतोलपणा आणि पृथ्वीवरील नैसर्गिक संपत्ति ह्यांच्यात बिघाड करू शकतो आणि कोणतीही गोष्ट जी अशा असमतोलपणाचा उगम आहे तिचा निसर्गमातेकडून योग्य ती कारवाई करून शेवट केला जातो.

जेव्हा तुम्ही उत्कर्षासाठी कष्ट करता आणि निसर्गमाता पण त्याला विरोध करीत नाही, त्यावेळी भरभराट तुमच्याकडे येईल. याऊलट जेव्हा तुम्ही उत्कर्षासाठी कष्ट करता आणि निसर्गमाता तुम्हाला विरोध करते, तेव्हा वैश्विक स्पंदने आणि शक्तिही तुम्हाला विरोध करतील व त्यामुळे तुम्हाला यशस्वी होणे हे अशक्यप्राय होऊन जाईल. म्हणून नेहमी नैसर्गीक संपत्ति वा स्त्रोत ह्यांचा गैरवापर करू नका. त्यात पैसा, पाणी, अन्न, वीज, तुमची शारीरिक वा मानसिक तसेच लैंगिक शक्ति व तुमचा वेळ इत्यादि गोष्टी असू शकतील. तुमच्या मूलभूत गरजांप्रमाणे त्यांचा वापर करा व तुमच्या जीवनात यशस्वी व प्रत्येक ठिकाणी भरभराट होण्यासाठी मध्यमवर्गीय

जीवनशैली ह्यांचे अनुकरण करा.(Use them according to your basic need and follow a moderate and middle path of lifestyle to succeed and prosper in your life)

पवित्र कुराण पण वरील तत्व हे साध्या शब्दात खालीलप्रमाणे सांगते.

*उधळपट्टी करु नका. कारण ईश्वराला उधळपट्टी करणारे व खर्चिक लोक ह्यांच्याबद्दल प्रेम नसते.* (पवित्र कुराण ६:१४२)

*"नातेवाईकाला त्याचा हक्क द्या आणि गरीब व वाटसरूला त्याचा हक्क. वायफळ, खर्च करु नका. वायफळ खर्च करणारे शैतानाचे बंधू होत, आणि शैतान आपल्या पालनकर्त्याशी कृत्घन आहे"* (पवित्र कुराण १७ : २६)

## सारांश (Summary)

जर तुम्ही पिंपामध्ये बालदीने पाणी टाकायला सुरूवात केलीत तर ते पिंप भरलाच पाहिजे ह्याची खात्री देता येत नाही. पण त्या पिंपाच्या तळाशी भोक नसेल तर तो नक्कीच भरला जाईल. त्याचप्रमाणे तुम्ही यशाच्या नियमांचे अनुकरण करण्यास सुरुवात केलीत तर तुम्ही यशस्वी व्हालच अशी काही खात्री देता येत नाही, पण जर तुम्ही अपयशाची कारणे टाळलीत तर नक्कीच यशस्वी व्हाल. जर तुमच्यामध्ये काही दोष वा उणीवा असतील तर तुमच्या यशाची संधि शून्य आहे. त्यापैकी काही उणीवा पुढीलप्रमाणे आहेत.

१) तुम्ही भ्रष्टाचारी, जातीयवादी व गुन्हेगारी वृत्तीचे असू नये.

२) तुमच्यावर तुमच्या आईवडिलांच्या शापांचा भार नसावा.

३) तुम्ही उधळपट्टी वा खर्चिक वृत्तिचे असू नये.

## *प्रकरण क्र. ३६*

# परीक्षेचा काळ

(The Divine Seasons)

• कोणत्याही वेळेला युरोप आणि अमेरिका ह्यांच्या दरम्यान ॲटलांटिक समुद्र ओलांडून जाणारी व आकाशात उडणारी सुमारे ४०० पेक्षा जास्त विमाने असतात. हवाई वाहतूक नियंत्रण त्या सर्वांना योग्य मार्गदर्शन करते व अंतराळात मध्यभागी एकमेकांशी टक्कर होऊ नये म्हणून त्यांचा हवाई मार्ग निश्चित करते. पुष्कळवेळी अमेरिकेकडून युरोपकडे गरम हवेच्या लाटा वाहतात. प्रत्येक वैमानिक हा त्या गरम हवेच्या प्रवाहात विमान चालविण्यास उत्सुक असतो. कारण त्यावेळी विमान उड्डाण करणे हे अत्यंत सुखकर असते व वैमानिक हे ऑटो पायलट बटन चालू करतात व आराम करतात. विमानसुद्धा कमी इंधन जाळते आणि त्याच्या ठरलेल्या ठिकाणी नियोजित वेळेच्या आधीच पोहोचते. उलटपक्षी खवळलेल्या (Turbulent air) हवेत ॲटलांटिक समुद्र ओलांडून जाणे मोठे कठिण काम असते. वैमानिकाला जागरूक राहावे लागते. विमान त्यावेळी जास्त इंधन वापरते व तेच अंतर जाण्यास जास्त वेळ लावते. परंतु योग्य तऱ्हेने चालविलेले आणि मार्गदर्शन केलेले विमान मग ते खवळलेले वा चांगले गरम हवेचे वातावरण असले तरी सुद्धा त्यांच्या मुक्कामाच्या जागी व्यवस्थित जाऊन पोहोचते.

• फलज्योतिष्यांनी (Astrologers) इजिप्तचा महान राजा रेमिसिसला असे आगाऊ भविष्य सांगितले होते की, इस्त्राईल जमातीत एका बालकाचा जन्म होईल व ते ईजिप्तच्या गुलामगिरीच्या बंधनातून इस्त्राईल माणसांची सुटका करील. रेमिसिसने ही घटना टाळण्याचे खूप प्रयत्न केले. रेमिसिसने नवीन जन्माला आलेल्या मुलांची हत्या केली. तसेच सर्व इस्त्राईल जमातीला गुलाम बनविले. पण त्याची शक्ति आणि सामर्थ्य ह्यांच्या जोरावर तो स्वतःचे विधिलिखित बदलू शकला नाही. प्रेषित मॉसेसचा इस्त्राईल जमातीत जन्म झाला व त्याने इस्त्रायलला ईजिप्तच्या गुलामगिरीतून स्वतंत्र केले आणि रेमिसिस हा नाईल नदीत बुडून गेला.

भविष्य सांगणाऱ्यांनी महाराजा कंसाच्या बाबतीत अशी भविष्यवाणी वर्तविली होती की, त्याच्या बहिणीचा मुलगा हा त्याच्या आयुष्याचा शेवट करील. कंसाने त्याची बहिण आणि मेहुणा ह्यांना तुरुंगात डांबून ठेवले, त्यांच्या सर्व मुलांची हत्या केली पण तो त्याचे विधिलिखित काही बदलू शकला नाही. भगवान श्रीकृष्णाने कंसाचा अखेरीस वध केला.

• मिलिटरीच्या रणगाड्याचे वजन सुमारे ४५ टन असते. तो प्रत्येक ताशी ७० मैल या वेगाने धावू शकतो तो ४५ अंशाचे उतरते पृष्ठभागही चढू शकतो. तो खडबडीत रस्ते, चिखल इतकेच काय तर विशेषतः अर्धवट पाण्याखाली बुडलेल्या स्थितीमध्येही धावू शकतो. त्या रणगाड्याचे उत्पादन झाल्यानंतर त्यांची निरनिराळ्या परिस्थितीत चाचणी घेतली जाते. त्याची संपूर्ण वेगासाठी अचानक ब्रेक व थांबणे ह्यांसाठी १०-१५ मीटर्समध्ये चाचणी होते. तसेच त्याच्या स्प्रिंगची तपासणी करण्यासाठी रणगाडा चालकाला तो रणगाडा कृत्रिम खडबडीत रस्त्यावर चालविण्यास सांगण्यात येते. तसेच चालकाला कठीण उतार चढणे, चिखल अंशतः जलमय स्थिती ह्यामध्ये रणगाडा चालविण्यास सांगितले जाते. ह्या सर्व चाचण्यांनंतर जर रणगाडा धडधाकट व चांगल्या काम करण्याच्या परिस्थितीत राहिला तरच त्याला सैन्यामध्ये कामगिरीसाठी सामावून घेतले जाते. अन्यथा ते त्या रणगाड्यास पुन्हा दुरुस्ती व सुधारणा करण्यासाठी परत पाठवितात.

- ईश्वराने पवित्र कुराणात असे सांगितले,

*"तेव्हा काय तुम्ही हे समजता कि तुम्ही सहजासहजी स्वर्गामध्ये दाखला व्हाल? वास्तविक अद्याप तुमच्यावर ते सर्वकाही ओढवले नाही जसे तुमच्या पुर्वीच्या लोकांवर ओढवले, त्यांच्यावर कठिण प्रसंग ओढवले आणि संकटे आली त्यांना हादरवून सोडले. इथपर्यंत कि प्रेषित आणि त्यांचे सोबती ज्यांनी ईमान धारण केले होते, ते म्हणू लागले ईश्वराची मदत केव्हा येईल? सावध व्हा ईश्वराची मदत जवळच आहे."* (पवित्र कुराण : २: २१४)

- ज्याप्रमाणे रणगाड्यांची कामगिरीवर जाण्यापूर्वी जोरदारपणे परीक्षा घेतली जाते. त्याचप्रमाणे प्रत्येक माणसाची ही ईश्वराकडून त्याच्या उरलेल्या जीवनमर्यादेच्या अखेरपर्यंत चाचणी घेतली जाईल. त्याची आयुष्यभर सतत परीक्षा घेतली जाईल व तीसुद्धा शिक्षण, व्यवसाय, नोकरी, संपत्ति, प्रेम, विवाह, मुलेबाळे, मालमत्ता व आरोग्य इत्यादि आघाड्यांवर परीक्षा घेतली जाईल. जसे राजा रेमिसिस आणि कंस ह्यांना त्याचे विधिलिखित जसे समजले होते. परंतु ते त्यात काही फेरबदल करू शकले नाहीत, त्याप्रमाणे तुम्हाला तुमचे भविष्य काही प्रमाणात जरी समजले तरीसुद्धा तुम्ही तुमचे भवितव्य आपल्या निवडीप्रमाणे बदलू शकणार नाही. आपले विधिलिखित बदलण्याचा फक्त एकच मार्ग आहे आणि तो म्हणजे खूप कष्ट करणे आणि नियमितपणे ईश्वराची प्रार्थना करून त्याच्याकडून मदत मिळविणे.

- *" परीक्षेचा काळ"* हा विषय पुस्तकांत समाविष्ट करून तुम्हाला आठवण द्यावीशी वाटते की, प्रत्येकाच्या आयुष्यामध्ये सुखाचे व उत्कर्षाचे मोठे काळ किंवा दुःखे, ताणतणाव, आर्थिक प्रश्न, आरोग्य व कौटुंबिक समस्या ह्या प्रसंगाना खूप प्रयत्न करून ते टाळण्याचे तसेच सोडविण्याचे प्रयत्न केले तरीसुद्धा हे प्रसंग येत राहाणारच. कारण मानवाची उदात्त कामे व चांगली वागणुक याची परीक्षा घेण्याची ईश्वराची ही एक पद्धत आहे आणि ती तुमच्या इच्छेनुसार बदलली जाणार नाही. म्हणून एकावेळी तुम्हाला सतत

कार्यरत राहून नशीबाची परीक्षा पास व्हावयाचे असते. तर दुसऱ्या जागी तुम्हाला एक गोष्ट लक्षात घ्यावयाची असते, की ही एक परीक्षा आहे व योग्य काळानुसार त्यात बदल होईल. प्रत्येकवेळी ती परीक्षा सारख्याच स्थितीची असणार नाही. म्हणून तुम्ही कधीही न संपणाऱ्या निराशकाळात मनाने खचून जाता कामा नये. रात्र संपून जाईल आणि सूर्य हा नक्की उगवेल आणि प्रकाश देईल. कारण ईश्वर सांगतो,

*"प्रत्येक अडचणीनंतर अनुकूलता आहे, प्रत्येक अडथळ्यानंतर सुखसोय आहे."* (पवित्र कुराण ९४ : ५-६)

• भगवद्गीता सांगते, "समय परिवर्तन-शील आहे." ह्याचा अर्थ असा आहे की, चांगला आणि वाईट काळ हे नेहमी बदलत असतात.

म्हणून ईश्वराचा परीक्षेचा काळ समजून घ्या व त्याप्रमाणे तयारी करा. ज्याप्रमाणे चांगले मार्गदर्शन केलेले विमान हे भयंकर हवामानात पण त्याच्या ठरलेल्या मुक्कामावर पोहोचते, त्याचप्रमाणे तुम्हीसुद्धा अशा बिकट परिस्थितीच्या वेळी आणि तुमच्या आयुष्यातील अंधारमय काळात देखील निश्चितपणे यशस्वी होणार आहात.

• ईश्वर सांगतो,

*"जे स्त्री आणि पुरुष सत्कर्म करतील आणि माझ्यावर श्रद्धा ठेवतील, तेव्हा मी त्यांना ह्या जगात पवित्र आणि सुखकारक रीतीने ठेवीन आणि त्यांच्या मृत्यूनंतर त्यांनी केलेल्या चांगल्या कामाचा त्यांना उत्कृष्ट मोबदला देईन."* (पवित्र कुराण १६ :९७सारांश)

*प्रकरण क्र. ३७*

# नावामध्ये काय आहे?

(What’s in Name)

• माझा मित्र श्री राजू कुमार हा स्टीलचा व्यापार (Small forging) 'जॉली ॲलॉयज' ह्या नावाखाली करीत होता. जास्त मिळकतीसाठी त्याने त्याचा मूळ व्यापार बदलून लहान स्टील घटक ठोकून बनविण्याच्या व्यापारात रुपांतर केले. त्याने त्याच्या कंपनीचे नाव हे आधुनिक असे वाटावे म्हणून "टॅक्सॉन" असे बदलले. त्याचे ग्राहक तर पूर्वीचेच होते. त्याचे उत्पादन चांगले होते. तसेच नवीन धंद्यात त्याची विक्रीही चांगली होत होती. परंतु काहीतरी विचित्र घडत होते. त्याला त्याची देणी (Payment) मिळत नव्हती. त्याच्या एका जुन्या गिऱ्हाईकाने राजूसाठी पुण्याहून मुंबईला त्याच्या एका मित्रामार्फत बँक ड्राफ्ट पाठविला. तथापि गावांकडून अत्यंत आणीबाणीचा संदेश मिळाल्यामुळे तो मित्र राजूला न भेटता त्या बँक ड्राफ्टसकट तात्काळ त्यांच्या जन्मगावी रवाना झाला. राजूला पेमेंट एक महिन्यानंतरच मिळाले. त्याचप्रमाणे त्याची अन्य देणीसुद्धा ह्या ना त्या कारणाने विलंबाने मिळत होती. त्यामुळे एक महिन्यानंतर राजूला त्याचा धंदा चालू ठेवणे अशक्य होऊन बसले. पण आपला धंदा बंद न करता राजूने त्याच्या व्यवसायाचे नाव पुन्हा 'जॉली

ॲलॉयज' असे बदलले. आता राजू हा पूर्वीचीच मांडणी आणि प्रयत्न ह्यांच्या जोरावर अपेक्षेपेक्षा जास्त भरभराट व्यवसायात करतो आहे.

• मी माझा उद्योगधंदा 'जनरल हायड्रोलिक' ह्या नावाने चालू केला. ईश्वराच्या मेहेरबानीने सर्व काही व्यवस्थित चालले होते. मी माझ्या कंपनीचे नाव हे धंद्याची निशाणी म्हणून नोंदणी करण्याचा प्रयत्न केला तेव्हा ते सर्वसाधारण नाव असल्यामुळे मी तसे करू शकलो नाही. म्हणून मी माझ्या कंपनीचे नाव 'हायड्रो शम्स मशिनरी' असे बदलले. अरेबिकमध्ये शम्स म्हणजे सूर्य व ते माझे वडिल शमसुद्दीन ह्यांच्या नावाचा संक्षेप होते. ह्या नावामुळे मात्र मला पूर्वी ज्या ऑर्डरी निश्चित म्हणून मिळाल्या होत्या त्यासुद्धा माझ्या हातातून गेल्या. माझ्या व्यावसायिक उलाढालीत प्रचंड घट झाली. मी अत्यंत बिकट परिस्थितीत होतो म्हणून पुन्हा मी माझ्या कंपनीचे नाव पूर्वीप्रमाणेच जनरल हायड्रोलिक असे ठेवले. त्यानंतर मात्र ईश्वराच्या कृपेने मला अशा समस्या परत कधीही निर्माण झाल्या नाहीत.

• मला तुम्हाला असा सल्ला द्यावासा वाटतो की, तुमच्या कंपनीचे एखादे विशिष्ट नाव निवडण्यापूर्वी ते नाव प्रायोगिक तत्वावर वापरून त्याचे परीक्षण करा, त्याचे परिणाम पाहा व मगच त्याचा वापर करा.

भविष्य आणि संख्याशास्त्र हा गुंतागुंतीचा आणि किचकट विषय आहे. म्हणून कधीही त्यांचा अभ्यास करू नका. जर तुम्ही केलात तर तुमची इच्छाशक्ती (Will Power), उत्साह व धाडस ही कोणतेही कठीण काम करण्यासाठी नाहिशी होऊ शकेल. अकबराने भारत देशावर सुमारे ५० वर्षे राज्य केले व तो अत्यंत महान व यशस्वी राजा होता. पण त्याचा बाप हुमायून हा अत्यंत अयशस्वी ठरला. त्याच्या अपयशाचे एक कारण म्हणजे तो कोणताही निर्णय घेण्यापूर्वी ज्योतिष्यशास्त्राच्या (Calculation)वर अवलंबून असे. त्यामुळे तत्काळ बहादुरीचे निर्णय घेण्याची क्षमता त्याच्याकडे नव्हती.

- म्हणून मी तुम्हाला ज्योतिष्यशास्त्र जाणकारांकडे जा असाही सल्ला देणार नाही. कारण कोणताही ज्योतिषी हा तुमच्या कंपनीचे योग्य ते नाव सुचविण्याइतका प्रवीण नसतो. जर भविष्य सांगणारे ज्योतिषी हे शुभ नाव सुचविण्यात तज्ञ असते किंवा उत्कर्षाचा मार्ग दाखविण्यात निपुण असते, तर त्यांनी त्यांच्या स्वतःच्याच व्यवसायाला चांगले शुभ नाव निवडले असते व लक्षाधीश झाले असते. परंतु ते आयुष्यभर निरर्थक भटकंती करत राहातात आणि ग्राहकाला त्यांच्या जाळ्यात पकडण्यासाठी मानसिक दबावतंत्राचा वापर करतात. म्हणून त्यांचा उपदेश ऐकू नका आणि तुम्ही स्वतःच एकाग्र राहा व परिस्थितीचे अवलोकन करा, प्रयोग करा आणि चांगले नाव शोधून काढा.

म्हणून पुष्कळ कष्ट करूनसुद्धा जेव्हा भरभराटीसाठी काहीही चांगल्या गोष्टी घडत नाहीत त्यावेळी तुमची कार्ययोजना व करावयाची कृति ह्यांच्यबरोबरच दुसऱ्या नावाच्या निवडीचाही विचार अवश्य करा.

### *प्रकरण क्र. ३८*

# वैश्विक शक्तिचा परिणाम

(Effect of Cosmos Energy)

- एक लोहचुंबक घ्या आणि तो दोरीने टांगा. जेव्हा मुक्तपणे टांगला की तो नेहमी उत्तर दक्षिण दिशेने सरळ राहील. त्या लोहचुंबकाचे लहानलहान मोडून तुकडे करा व त्याचा प्रत्येक तुकडा टांगा. त्या चुंबकाचा प्रत्येक तुकडा हा पूर्ण चुंबक असेल. व प्रत्येक टांगलेला तुकडा हा स्वतःहून उत्तरदक्षिण दिशेने सरळ राहील.

हे सर्व जग पुष्कळ प्रकारच्या ज्ञात आणि अज्ञात अशा चुंबकीय क्षेत्रांनी (Magnetic field) व वैश्विक शक्तिंनी (Cosmos energy) वेढलेले आहे. आणि लोहचुंबक हा पृथ्वीच्या चुंबकीय क्षेत्राच्या (Magnetic field of earth) दिशेत सरळ राहण्यासाठी स्वतःच उत्तरदक्षिण दिशेने सरळ राहातो.

- त्याचप्रमाणे पृथ्वीवरील प्रत्येक भुखंड (Plot) व प्रत्येक बांधकाम (Structure) ह्याला वैश्विक शक्तिचा होकारार्थी व नकारार्थी ध्रुव असतो. होकारार्थी शक्तिचा प्रवाह हा उत्तरपुर्व ध्रुवाकडून दक्षिणपश्चिम ध्रुवाकडे असतो. व नकारार्थी शक्तिचा प्रवाह हा

दक्षिणपश्चिम ध्रुवाकडून उत्तरपुर्व ध्रुवाकडे असतो. चुंबकीय शक्तिचा प्रवाह हा नेहमी उत्तर ध्रुवाकडून दक्षिण ध्रुवाकडे वाहात असतो. परंतु भुखंड व बांधकामाबाबतीत, ही वैश्विक शक्ति (Cosmos Energy) बांधकामाच्या मजबूत बाजूपासून कमजोर बाजूकडे वाहते. म्हणजे होकारार्थी ध्रुवाचे क्षेत्र जास्त असेल तर प्रवाह हा होकारार्थी ध्रुवाकडुन नकारार्थी ध्रुवाकडे वाहु लागेल. व नकारार्थी ध्रुवाचे क्षेत्र जास्त असेल तर प्रवाह हा नकारार्थी ध्रुवाकडुन होकारार्थी ध्रुवाकडे वाहु लागेल. म्हणुन ज्या ध्रुवाचे क्षेत्र जास्त असेल (होकारार्थी किंवा नकारार्थी) तोच परिणाम संपुर्ण भुखंड किंवा बांधकामावर असेल.

खालील आकृति तुम्हाला जास्त चांगली कल्पना देईल.




वर उल्लेख केलेल्या चौरस भुखंडात दोन्हीही शक्तिची क्षेत्रे ही संतुलित आहेत म्हणून कुठल्याही क्षेत्राचा (होकारार्थी किंवा नकारार्थी) विशेष असा काही सर्वसाधारण परिणाम दिसणार नाही.

पण वरील हाच भुखंड जर पुढीलप्रमाणे मोजमापात रुपांतरित केला,



दुसऱ्या भुखंडामध्ये नकारार्थी बाजू ही जास्त असल्यामुळे प्रवाह हा नकारार्थी क्षेत्राकडून होकारार्थी क्षेत्राकडे वाहु लागेल. म्हणुन ह्या भुखंडाला सर्वसामान्यपणे नकारार्थी परिणाम असेल.

होकारार्थी परिणाम हा उत्साह, चांगले आरोग्य, आनंदीपणा, विधायक विचार व संपुर्ण भरभराट आणतो तर नकारार्थी क्षेत्र हे त्याच्या विरूद्ध गोष्टी आणते.

- म्हणून जेव्हा तुम्ही तुमचे सर्व प्रयत्न करून देखील यशस्वी होत नसाल, तर ज्याठिकाणी काम करता त्या जागेची फक्त तपासणी करा. ते बांधकाम न तोडफोड करता त्याच्यात सुधारणा करण्याचे खूप मार्ग आहेत त्यासाठी तज्ञ सल्लाविशारदाचा (Consultant) सल्ला घ्या. वास्तूशास्त्र हे एक शास्त्र आहे. त्याचा धर्माशी काहीही संबंध नाही. म्हणून तुम्हाला मोकळा वेळ असेल तर छंद म्हणून त्याचा अभ्यास करा.

- होकारार्थी शक्तीही उत्तरपूर्वेकडून दक्षिणपश्चिमेकडे वाहते. हिंदू कुटुंबे हे त्यांचे घराचे दरवाजे उत्तर किंवा पूर्व दिशेला ठेवतात. ही प्रथा शक्ति क्षेत्राच्या वाहण्यावर आधारित असून धार्मिक विश्वासावर आधारभूत नाही. तसेच कार्यशाळा आणि कंपनीमध्ये ज्या यंत्रामध्ये उत्तर दिशेने वस्तू भरल्या जातात त्यांचा निकाल व उत्पादन हे दक्षिणेकडील दिशेने तोंड असणाऱ्या यंत्रापेक्षा जास्त चांगले असते. माझा व्यक्तिशः असा अनुभव आहे की, मी जेव्हा माझ्या ऑफिसमधील बसण्याच्या जागेची दिशा ही पश्चिमेकडून उत्तरदिशेकडे बदलली तेव्हा माझी कार्यक्षमता खुपच वाढली.

- जर तुम्ही एखाद्या अनियोजितपणे वसलेल्या शहराचा अभ्यास केलात तर तुम्हाला असे आढळून येईल की, पूर्व आणि उत्तर दिशेला तोंड असलेली दुकाने आणि उपहारगृहे ही पश्चिम व दक्षिण दिशेकडे तोंड असलेल्या दुकाने व हॉटेल ह्यांच्यापेक्षा जास्त विकसित झाली आहेत व चांगला धंदा करीत आहेत.

म्हणून जेव्हा तुम्हाला चांगली यंत्रे व कर्मचारी ह्यांची स्थापना केल्यानंतरही कमी उत्पादन मिळत असेल, तर त्यांची दिशा उत्तरेकडे करा किंवा वास्तुशास्त्राच्या सल्लागाराच्या सूचनेनुसार चांगले निकाल मिळण्यासाठी दिशाबदल करा.

पुष्कळ नुकसान करणारी उपहारगृहे व कंपन्या ह्या दिशा आणि त्यांच्या स्थानांची दिशा बदलल्यामुळे त्यांना खूप फायदा झाला आहे. तुम्ही सुद्धा तसा प्रयत्न करू शकता.

*प्रकरण क्र. ३९*

# स्थलांतर (देशांतर)

(Migration)

- अमेरिका, कॅनडा, ऑस्ट्रेलिया आणि न्युझीलंड हे सर्व प्रगत देश आहेत. पण त्या देशांतील किती लोक हे त्या देशात जन्म झालेले आहेत? हे प्रमाण ५ टक्क्यांपेक्षा सुद्धा कमी असेल कारण त्यापैकी बरेचजण हे युरोपमधून स्थलांतर करून आलेले आहेत.

मुंबई ही भारताची व्यापारविषयक राजधानी आहे. पण ज्यांनी ह्या व्यापारविषयक भरभराटीसाठी ह्या शहराला हातभार लावलेला आहे. त्यापैकी प्रत्यक्षात किती जण जन्माने ह्या शहराचे रहिवासी आहेत? हे प्रमाण १०% ह्यापेक्षा जास्त असू शकणार नाही कदाचित. कारण ९०% व्यापारी हे इतर राज्यांतील आहेत आणि ते मुंबईला स्थलांतरित झालेले आहेत. परंतु जे युरोपमधून देश सोडून बाहेर गेले किंवा मुंबईला स्थलांतर करून आले हे सुरूवातीला संपन्न नव्हते. पण त्यांनी ही भरभराट कष्ट करून व कामात स्वतःला अर्पण करून मिळविली.

- विजय टँक आणि व्हेसल लिमिटेड ही शुद्धीकरणाच्या (Refineries) क्षेत्रात मोठे प्रोजेक्ट करणारी अग्रगण्य कंपनी आहे. मी

त्यांना पुष्कळशा हायड्रोलिक प्रेसचा पुरवठा केला आहे. १९८०-८५ मध्ये लिबियामध्ये युद्ध झाल्यामुळे त्यांचा प्रोजेक्ट रद्द झाला आणि त्यांना सुमारे २४ कोटी रुपयांचा तोटा झाला होता. भारत देशात पण त्यांची खूप पिछेहाट झाली आणि ती कंपनी "आजारी समूह"(Sick unit) म्हणुन घोषित केली गेली. सतत दहा वर्षे ते त्यांच्या कंपनीच्या पुनरुज्जीवन व अस्तित्व ह्यासाठी धडपडत राहिले. पण सर्व प्रयत्न व्यर्थ झाले. त्यांच्यासाठी काहीही योग्य होत नाही असे वाटत होते. तेव्हा त्यांनी एक कडक निर्णय घेतला. मुंबईतच चिकटून राहण्यापेक्षा त्यांनी त्यांची मालमत्ता विकली आणि बडोद्याला स्थलांतर केले. त्या मालमत्ता विक्रीमधून मिळालेली संपत्ति व त्यांच्या कठिण परिश्रमांमुळे त्यांचे पुनरुज्जीवन झाले. आज ती कंपनी पूर्वीसारखीच स्वत:च्या क्षेत्रात अग्रेसर आहे.

- पक्षी आणि प्राणी हे अन्न आणि निवारा ह्यांच्या शोधात जेथे मिळेल त्या दूरच्या ठिकाणी स्थलांतर करतात व अत्यंत प्रतिकूल स्थितीत ही जगतात. स्थलांतर ही निसर्गाची एक जगण्याची आणि मानव प्राणीमात्रांच्या उत्कर्षासाठी एक विधायक पद्धत आहे.

पवित्र कुराण असे सांगते की,

*जे लोक आपणच स्वत:वर अत्याचार करित होते त्यांचे आत्मे जेव्हा दूतांनी कब्जात घेतले तेव्हा त्यांना विचारले की "तुम्ही या कसल्या दशेत गुरफटला होता? त्यांनी उत्तर दिले, "आम्ही पृथ्वीवर निर्बल व विवश होतो". दूतांनी सांगीतले की "ईश्वराची पृथ्वी विशाल नव्हती काय की तुम्ही देशांतर करून दुसरीकडे जावे? अशा लोकांचे ठिकाण नरक आहे.*

(पवित्र कुराण ४:९७)

- अर्थात ईश्वराची दुनिया ही मोठी, विशाल आणि सर्व तऱ्हेच्या संधींनी भरलेली आहे. ती संधी शोधणे ह्यासाठी तुमचा पुढाकार हा आवश्यक आहे. म्हणुन तुम्ही खूप प्रयत्न करून पण यशस्वी होत नसाल, तर सर्व आशा सोडून देऊन व पराभव स्वीकार करण्यापेक्षा दुसऱ्या जागी स्थलांतर करण्याचा विचार करा.

- माझा जन्म व बालपण वरळी येथे गेले. मुंबईच्या या पश्चिम भागात मी सुमारे ३२ वर्षे राहिलो. परंतु आजपर्यंत तरी एकाही कुत्र्याने माझ्याकडे बघून त्याची शेपटी हलविली नाही किंवा तो माझ्यावर भुंकला नाही. पण मी जेव्हा माझ्या उद्योगधंद्याजवळ भांडुपला जो मुंबईच्या उत्तरेकडील एक भाग आहे. तेथे स्थलांतर केल्यानंतर माझे संपुर्ण जीवनच बदलुन गेले. तेथे मला इतका मानसन्मान मिळाला कि मी ईश्वराकडे अशी प्रार्थना करतो की त्याने मला इतका मान देऊ नये जो मी पचवु शकणार नाही.

- काही बुद्धिमान असे सांगतात की, तुमच्या जन्मगांवी तुमच्याकडे कुटुंब, घर, आईवडिल, नातेवाईक, मित्र इत्यादि सर्व असतात. तुम्ही येथे अगदी आरामांत असता, तुमचे सामाजिक आणि वैयक्तिक जीवन ह्याचा आनंद उपभोगत असता, म्हणून तुम्ही जास्त कष्ट करीत नाही. परंतु नवीन ठिकाणी तुम्हाला शून्यांतून सर्व विकास करावयाचा असतो म्हणून तुम्ही खूप कष्ट करता आणि तुमचे सर्वोत्कृष्ट प्रयत्न करीत असता.

- स्थलांतरामुळे भरभराट होण्याचे एक अंधश्रद्धाळू कारणही आहे. तुमच्या जन्मगावी प्रत्येकजण तुम्हाला ओळखत असतो. जेव्हा तुम्ही दुसऱ्यांपेक्षा जास्त प्रगति करता तेव्हा त्यांना तुमचा मत्सर वाटतो. प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे वाईट नजरेने किंवा घातपात वा अन्य मार्गांनी ते तुमचे मानसीक खच्चीकरण करून तुमचे लक्ष दुसरीकडे वळवितात आणि तुमच्या उत्कर्षाच्या मार्गात अडथळा निर्माण करतात. तथापि नवीन ठिकाणी तुमच्याबद्दल किंवा तुमच्या भूतकाळाबद्दल कोणाला काहीही माहिती नसते. म्हणून कोणीही तुमच्याशी स्पर्धा करीत नाही वा तुमच्याबद्दल मत्सर वाटून घेत नाही. म्हणून तुम्ही उत्कर्षासाठी मोकळे असता.

म्हणून दीर्घ प्रयत्न करूनपण काहीही चांगले घडले नाही तर वेळ आणि धैर्य गमावू नका. चांगल्या ठिकाणी स्थलांतर करा. तेव्हा तुम्हाला ह्या ईश्वराचे महान आणि खूप उपलब्ध संधि असलेले जग दिसून येईल.

## सारांश (Summary)

• अशी कल्पना करा की, तुमच्याकडे जगातील सर्वोत्कृष्ट मोटारगाडी आहे व तुम्ही कुशल चालक आहात. पण जर तुम्हाला रस्त्याच्या मध्यभागी  मोठा खड्डा किंवा उंचवटा आढळला तर तुम्ही काय कराल?

तो खड्डा किंवा उंचवटा सहजरीतीने ओलांडून जाणे हा साधा सरळ शहाणपणाचा मार्ग आहे. तेथे तुमच्या गाडीच्या इंजिनाची शक्ति किंवा तुमचे गाडी चालविण्यातील नैपुण्य ह्याची जरूरी नाही. फक्त डावे किंवा उजवे वळण घ्या व हा अडथळा ओलांडून पुढे जा.

• तुम्ही खूप हुषार असाल, यशाच्या सर्व नियमाचे अनुकरण करीत असाल व सर्व तऱ्हेच्या अडथळ्यापासून काळजी घेत असाल तरीसुद्धा तुम्ही यशस्वी झाला नाहीत तर नशीबाशी कुस्ती करू नका विश्रांति घ्या, तुमचे कुठे अडते ह्याचे सूक्ष्म निरीक्षण करा व अडथळा दूर करून पुढे जा.

यशाच्या मार्गातील काही अडथळे पुढीलप्रमाणे आहेत :-

१) चुकीचे नाव. नाव बदला आणि मग फरक पाहा. (ह्या विषयाचा आकडेशास्त्राशी (Numerology) संबंध आहे.)

२) जर तुम्ही तुमच्या कामाच्या ठिकाणी नकारात्मक शक्ति क्षेत्रात काम करीत असाल तर वास्तुशास्त्र पद्धतीने त्यात सुधारणा करा.

३) तुमच्या सभोवतालच्या लोकांच्या मत्सरी वृत्ति, तसेच अन्यायी कायदा, राजकारणी लोकांकडून छळवाद, पोलिस आणि गुन्हेगार,कच्चा मालाची कमतरता आणि विद्युतशक्ति ह्यांचाही त्रास तुम्हाला होत असेल तर चांगल्या ठिकाणी स्थलांतर करा. ईश्वराचे जग हे फार मोठे क्षेत्र आहे.

४) लक्षात ठेवा की, तुमच्या आयुष्याच्या काही काळामध्ये तुम्हाला त्रास हा भोगावा लागणारच आहे. तो तुमची चूक

किंवा अन्य काही कारण ह्यामुळे नव्हे, तर विपरीत अवस्थेमध्ये तुमच्या कार्याची तपासणी करणारी ईश्वरी पद्धतही कारणीभूत आहे.

अशा परिस्थितीचे नीट अवलोकन करा व समजून घ्या. अगदी वाईट काळात देखील तुम्ही जर तुमच्या योग्य मार्गानेच ठामपणे जात राहिलात, तर तुम्ही या जगात नुसते यशस्वीच नव्हे तर मृत्युनंतरच्या जीवनात पण यशस्वी व्हाल. म्हणून परीक्षेचा काळ हा समजून घ्या आणि धीर खचू देऊ नका.

*प्रकरण क्र. ४०*

# आध्यात्मिक अडथळ्यांवर कशी मात करावी?

(How to Overcome the Spiritual Obstacles)

- मी माझे पदवीपर्यंतचे शिक्षण १९८३ मध्ये पूर्ण केले. तथापि ७६ टक्के गुण हे बी.ई. (मेकॅनिकलच्या) शेवटच्या वर्षीही मिळवून सुद्धा कृश व्यक्तिमत्त्व व शरीरप्रकृति यामुळे मला पुढे ३ वर्षांपर्यंत चांगल्या नामवंत कंपन्यांमध्ये नोकरी मिळू शकली नाही. एका साध्या कारखान्यात मी हैड्रॉलिक्सचा काही अनुभव घेतला. त्यावेळी हैड्रोलिक्स (Technology) हे भारतामध्ये नवीनच तंत्रज्ञान असल्यामुळे फक्त थोडेच लोक त्यामध्ये जाणकार होते. म्हणून मी वर्कशॉपमधील माझी नोकरी सोडली आणि स्वतःची सल्ला देणारी (Consultancy firm) कंपनी काढली.

- श्री.बी.एम.पटेल कार्याध्यक्ष, हिंदुस्थान ॲलायीज मॅन्युफॅक्चरिंग कं. लि. ह्यांचा माझ्यावर विश्वास होता. त्याबद्दल मी त्यांचा अत्यंत ऋणी आहे. मी त्यांना जेव्हा एक्स्ट्रूशन प्रेसचा (Extrusion Press) नमुना आराखडा दिला त्यावेळी ते म्हणाले,"तुम्ही माझ्यासाठी सोल्डर वायर एक्स्ट्रूशन प्रेस बनवा. मी तुम्हाला आर्थिक साहाय्य करीन." त्यांनी सुमारे २५ मशिनसाठी ऑर्डर नोंदविली. ती

ऑर्डर माझ्या कंपनीच्या २ वर्षापुढीलही उत्पादन व निर्मिति ह्यांच्या क्षमतेपेक्षा जास्त होती.

जसवंतसिंगाचा वाईट अनुभव मला आल्यामुळे मी श्री. बी. के. पंत नावाच्या सद्गृहस्थाशी संपर्क साधला व त्यानी मला त्यांचे आवार माझी यंत्रे बनविण्यासाठी वापरण्यास पूर्ण परवानगी दिली त्याबद्दलचा मी त्यांचा अत्यंत ऋणी आहे.

त्यानंतर पुढील सुमारे चार वर्षे माझ्या प्रगतिचा आलेख हा सतत वाढतच गेला. ह्या काळात मी माझे स्वतःचे वर्कशॉप खरेदी केले. माझे लग्न झाले, मी गाडी घेतली, माझ्या घराचे नूतनीकरण केले वगैरे वगैरे. तसेच मी औद्योगिक मासिके, जर्नल्सस् ह्यामध्ये जाहिरात केली व त्यामुळे मला भारत पेट्रोलियम कार्पोरेशन लिमिटेड आणि विजय टँन्क्स अँड व्हेसल लिमिटेड इत्यादि नामवंत व प्रसिद्ध कंपन्यांकडून ऑर्डरी मिळाल्या.

- त्यानंतर १९९०-९१ मध्ये माझ्या आयुष्यात अचानकपणे काही विचित्र घटना घडल्या.

    १) मी हातांतील मागण्या (ऑर्डर) योग्य वेळेत पुऱ्या करू शकलो नाही. (पुष्कळश्या अनपेक्षित आणि विचित्र समस्येमुळे)

    २) जेव्हा मी मागण्या (ऑर्डर) कशातरी पुऱ्या केल्या तेव्हा ग्राहकांनी मालाचा ताबा घेतला नाही.

    ३) जेव्हा त्यांनी माल नेला तेव्हा त्यांनी शक्य तेवढी जास्तीत जास्त उधारी ठेवली किंवा माझ्या देण्यांपैकी (Payment) काही थोडेसेच पैसे दिले.

    ४) गिऱ्हाईकांनी नेहमी शिल्लक रक्कम ही लुबाडण्याचा प्रयत्न केला.

    ५) माझ्या कंपनीची एकंदर उलाढाल ही २० टक्क्यांपर्यंत खाली आली.

६) जेव्हा नवीन गिऱ्हाईक येई, ते माझी यंत्रे पाहून प्रभावी होत आणि ताबडतोब मागणी (ऑर्डर) नोंदविण्याची इच्छा व्यक्त करीत पण जेव्हा ते माझ्या कार्यालयातून बाहेर जात तेव्हा त्यांचे मन आणि निर्णय हा बदलत होते.

७) माझी तब्येत अकस्मातपणे बिघडली.

मला अत्यंत आश्चर्य वाटले आणि अशारितीने जास्त काळ धंदा करणे शक्यच नव्हते. माझ्या बाबतीत काय झाले होते? माझ्या काही हितचिंतकानी मला आध्यात्मिकरितीने इलाज करण्याचा सल्ला दिला.

मी अर्धा डझनाहून जास्त उपचार करणाऱ्या तज्ञांना व महाराजांना भेटलो. माझी तब्येत व मनस्थिती थोडीफार सुधारली. पण पुढील ३ वर्षे माझ्या कंपनीचे उत्पादन हे बंद होण्याच्या स्थितीत राहिले.

- त्या दयाळू परमेश्वराला अखेरीस माझ्याबद्दल दया वाटली. जेव्हा मी फूटपाथवरून सहजपणे चालत होतो, तेव्हा माझ्या नजरेला एक पुस्तक दिसले त्याचे नाव 'आसान रिझक' असे होते. मी ते पुस्तक ताबडतोब खरेदी केले. त्या पुस्तकामुळे माझे व्यावसायिक जीवन हे पुन्हा पूर्णपणे बदलून गेले.

- 'रिझक'ह्या शब्दाचा खरोखर अर्थ 'अन्न' असा आहे. सर्वसाधारण याचा अर्थ ईश्वराचा प्रत्येक बाबतीत कृपाप्रसाद असा आहे. ज्यामध्ये अन्न, निवारा, कुटुंब, व्यवसाय व सामान्य उत्कर्ष ह्यांचा समावेश आहे. आसान म्हणजे सोपा किंवा सोयीचा. 'आसान रिझक' ह्याची सहज किंवा सोयीस्कर असा ईश्वरी कृपाप्रसाद अशीही व्याख्या केली जाते.

- ह्या पुस्तकांत प्रगतीच्या आड येणारे अडथळे कसे दूर केले जातात व भरभराट कशी वाढते ह्यासंबंधीच्या प्रार्थना दिल्या आहेत.

माझ्या वाचकांच्या सोयीसाठी मी आसान रिझक व अन्य काही पुस्तकांतील प्रार्थना खाली देत आहे.

**या प्रकरणाच्या शेवटी दिलेल्या श्लोकांचे महत्व असे आहे.**

**श्लोक क्र. १ आणि २**

जेव्हा जेव्हा प्रकाश असेल तेव्हा सावली ही असेलच. जेव्हा तुम्ही चांगल्या कामात गुंतवणूक करता, तेव्हा दुष्ट शक्ति ह्या तुम्हाला निश्चितच समस्या निर्माण करतात. हातातील कामावर लक्ष केंद्रित करण्यासाठी व मानसिक एकाग्रता भंग होण्यापासून सुरक्षित राहाण्यासाठी आणि ईश्वराची मदत मिळविण्यासाठी हा श्लोक सर्व प्रार्थना आणि कार्यालयीन काम सुरू करण्यापूर्वी पठण केला जातो.

पुष्कळवेळा असे पण घडते की आपण जे काही खातो त्याने आपले समाधान होत नाही. जर तुम्ही जेवणाच्या आधी वरील श्लोकाचा पाठ म्हटलात तर जेव्हा जेवण संपेल तेव्हा तुम्ही समाधानी झालेले असाल.

**श्लोक क्र. ३ (तसबीह)**

देवदुत हे कधी अन्न खात नाहीत जेव्हा त्यांना भूक लागते तेव्हा ते वरील श्लोक शक्ति मिळविण्यासाठी म्हणतात. श्लोक क्र. ३ हा पाठ करण्यास अतिशय सोपा आहे. त्याला मोठ्या कृपादृष्टीची किंमत असून तो श्लोक ईश्वराला अतिशय खूष करणारा आहे.

**श्लोक क्र. ४ (सूरह हम्द)**

कुराणामध्ये स्वर्गीय खजिन्यातून आलेले दोन श्लोक आहेत. श्लोक क्र. ४ हा त्यापैकी एक आहे. मुळात हे श्लोक ईश्वराने लोकांना, त्याची उपासना कशी करावी ह्यासाठी प्रगट करून दाखविले आहेत. त्याच्यामध्ये चार आध्यात्मिक परिणाम आहेत.

१) जे नियमितपणे ह्याचे पठण करतात ते कर्जापासून मुक्त

असतात.

२) आजारपणापासून दूर राहातात

३) दुष्ट शक्तिंपासून त्यांचे रक्षण केले जाते.

४) व त्यांना खूप संपत्ति मिळते.

**श्लोक क्र. १०**

ह्या श्लोकात सांत्वन करणे, तणावमुक्ति आणि काळजी कमी करण्याचा प्रभाव आहे. जेव्हा तुम्ही अतिशय तणावग्रस्त आणि काळजीत असता त्यावेळी वरील श्लोक हा तुम्हाला शारीरिक, मानसिक आणि आध्यात्मिकरीत्या फायदा करून देईल.

**श्लोक क्र. १२ (सूरह अहद)**

ह्या श्लोकाचे पठण म्हणजे ईश्वराची उत्कृष्ट प्रार्थना आहे. ह्यामुळे जास्त कृपादृष्टीचा लाभ होतो. ह्या श्लोकांचे फक्त तीन वेळाच पठण केल्यानंतर आपल्याला संपूर्ण कुराणाचे वाचन केल्यानंतर होणाऱ्या कृपाप्रसादाएवढा परिणाम मिळतो. जेव्हा ईश्वराच्या कृपेच्या पाऊसाचा वर्षाव तुमच्यावर होऊ लागतो तेव्हा तुम्ही खूप संपत्ति जमवू लागता. म्हणून तुमच्या सोयीनुसार सूर्योदय आणि सूर्यास्त ह्यांच्यापूर्वी तुम्हाला जितके वेळा शक्य होईल तेवढ्या वेळेस ईश्वराचे आभार मानण्यासाठी हा श्लोक म्हणा.

**श्लोक क्र. १३ (दरूद)**

आपण हा श्लोक प्रेषितांची आध्यात्मिक शक्ति वाढण्यासाठी प्रार्थनेपूर्वी आणि प्रार्थनेनंतर म्हणतो. हा श्लोक दरूद म्हणून प्रसिद्ध आहे. मूलतः दरूद म्हणजे ईश्वराची प्रार्थना. पण त्या प्रार्थनेमध्ये आपण प्रेषितांवर ईश्वराच्या कृपेसाठी प्रार्थना करतो.

**श्लोक क्र. १४**

काही वेळा हृदयावर खूप दाब पडला आहे व काळजीने

आपल्याला वेढून टाकले आहे, अशी भावना निर्माण होते म्हणून अशा घुसमटीपासून सुटका होण्यासाठी तुमच्या उजव्या हाताचा पंजा तुमच्या ह्रदयावर ठेवून श्लोक क्र. १४ हा शंभरवेळा पठण करा. पठण केल्यानंतर तुमच्या पंजांवर फुंकर मारा व ती तुमच्या चेहरा आणि छाती ह्यांवर फिरवा. जर ईश्वरावर पूर्ण श्रद्धा ठेवून व ह्या श्लोकाचा अर्थ लक्षात घेऊन जर त्याचे पठण केले तर हा श्लोक अत्यंत परिणामकारक आहे.

**आपण दरूदचे पठण का करतो?**

- आपण पत्राची सुरुवात नेहमी प्रिय महोदय (डिअर सर) किंवा प्रिय बाईसाहेब (डिअर मॅडम) अशी करतो आणि पत्राचा शेवट आपला विश्वासू (युवर्स फेथफुली) किंवा आपला हितचिंतक (युवर्स सिन्सिअरली) असा करतो. जरी आपण हे शब्द लिहिले नाही, तरी पलीकडचा माणूस संदेश समजून घेईल. पण ह्या शब्दांमुळे पत्राचा परिणाम जास्त वाढतो. तसेच प्रार्थनेच्या सुरुवातीला आणि शेवटी म्हटलेले दरूद हे प्रार्थनेचा परिणाम वाढविते.

- ईश्वर हजारो प्रेषितांना निरनिराळ्या युगात व विभिन्न ठिकाणी पाठवितो. त्यापैकी काही हे नोहा (मनू किंवा हजरत नूह) (अलैहि सलाम) अब्राहम (अबि राम किंवा हजरत इब्राहिम) (अलैहि सलाम), मॉसेस (अलैहि सलाम), येशु ख्रिस्त (येशू मसिहा, हजरत इसा) (अलैहि सलाम) आणि गौतम बुद्ध इत्यादि असतात. त्यांनी ईश्वराचा संदेश आणि धर्माचे नियम हे त्या विशिष्ट काळी हे त्या समाजासाठी आणले.

- या वर्षी छापलेल्या चलनी नोटांवर सध्याच्या रिझर्व बँक ऑफ इंडियाच्या गर्व्हनरची स्वाक्षरी असते. जर गव्हर्नर बदलला तर नोटेवरील नाव आणि सही सुद्धा बदलेल. राष्ट्रपती ए.पी.जे. अब्दूल कलाम हे लोकसभेने मंजूर केलेल्या सर्व ठराव मसुद्यांवर सह्या करतील. या नंतर जर दुसरा राष्ट्रपती निवडला गेला तर नवीन राष्ट्रपतीचे नाव व सही ही अधिकृत स्वाक्षरी म्हणून मानली जाईल. त्याचप्रमाणे धर्माच्या बाबतीत घडत असते.

- दरुद म्हणजे कृतज्ञता व्यक्त करणारे शब्द (आभार). संदेशवाहक हा ईश्वराचा संदेश आपणाकडे पोहोचवितो. आपल्याला योग्य मार्ग दाखविला म्हणून आपण त्यांचे त्याबद्दल ऋणी आहोत. आपण त्यांनी केलेल्या उपकाराची फेड प्रत्यक्षरीत्या करू शकत नाही म्हणून आपण ईश्वराकडे त्या संदेशवाहकांवर व त्यांच्या साथीदारांवर कृपादृष्टी करण्यासाठी प्रार्थना करतो ह्या आभारप्रदर्शक प्रार्थनेला दरूद असे म्हटले जाते.

- हजरत इब्राहीमच्या (अबि राम) काळी लोक त्यांचे नाव दरूदमध्ये समाविष्ट करीत होते. तर हजरत मूसांचे अनुयायी त्यांचे नाव दरूदमध्ये समाविष्ट करीत होते. त्याचप्रमाणे सर्व संदेशवाहकांची नावे त्यांच्या ठराविक काळात प्रार्थनेमध्ये समावेश केली जात होती. आपण सध्या अंतिम प्रेषित मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) यांच्या काळात आहोत. म्हणून त्यांच्या नावाचा उल्लेख दरुदमध्ये केला जातो.

- प्रेषित हे मरतात, पण त्यांची शरीरे ही थडग्यात विघटन पावत नाहीत. सर्व संदेशवाहक आणि साधूचे (किंवा संतपुरुषांचे) आत्मे हे त्यांच्या मृत्यूनंतर ईश्वराची प्रार्थना करण्यासाठी व स्वर्गात विश्रांती घेण्यासाठी मुक्त राहातात. येशू ख्रिस्तासारखे संदेशवाहक हे त्याच्या भौतिक (Physical) शरीरासकट स्वर्गात आहेत.

- जेव्हा आपण आपले माता, पिता, आजी, आजोबा, शिक्षक आणि गुरू ह्यांच्या प्रति आदरभाव व्यक्त करतो. त्याबदलात ते सर्व त्यांच्या शुभेच्छा व आर्शिवाद आपल्याला देतात. त्याचप्रमाणे जेव्हा आपण दरूदच्या रुपात संदेशवाहकाचे आभार मानतो. तेव्हा तेही आपल्याला आर्शिवाद देतात व ईश्वराकडे भरभराटीसाठी प्रार्थना करतात. जे लोक संदेशवाहकांसाठी (प्रेषितांसाठी) प्रार्थना करतात, असे लोक ईश्वरालाही प्रिय आहेत. आपल्या दरुदच्या बदल्यात परतावा म्हणून संदेशवाहक जे आशीर्वाद आणि प्रार्थना देतात. ती आपल्या उत्कर्षासाठी आपण केलेल्या प्रार्थनेची शक्ति वाढवितात व ती जास्त परिणामकारक करण्यास कारणीभूत ठरतात.

म्हणून आपण प्रार्थनेपूर्वी व प्रार्थनेनंतर दरूदचा पाठ म्हटल्यास त्याचा जास्त चांगला प्रभाव पडेल.

**हे श्लोक कसे म्हटले पाहिजेत?**

स्वतः औषधोपचार करणे हे आरोग्यास अत्यंत घातक आहे. हे श्लोकही औषधासारखेच आहेत. जर तुम्ही योग्य त्या पद्धतीने अनुकरण केले नाही तर तुमचे आयुष्य हे नाश पावेल व त्याचा वाईट परिणाम माझ्यावरही होईल. कारण ह्या श्लोकांची मी तुम्हाला ओळख करून दिली आहे. म्हणून हे श्लोक वापरण्यापूर्वी पुढील काळजी घ्या.

**१)** स्वतः स्वच्छ राहा. (प्रकरण ३२ स्वच्छतामध्ये सांगितल्याप्रमाणे)

**२)** हे श्लोक म्हणताना स्वच्छ अशा खोलीमध्ये राहा. तसेच त्या खोलीत कुठल्याही व्यक्तिचे किंवा धार्मिक व्यक्तिचे छायाचित्र असता कामा नये.

**३)** तुमच्या मानसिक वृत्तिची काळजी घ्या. तुमची मनोवृत्ति ही स्वतःच्या आणि मानवजातीच्या कल्याणासाठी असली पाहिजे. ज्या भरभराटीसाठी तुम्ही धडपड करीत आहात तिने कोणालाही हानी पोहोचता कामा नये.

**४)** तुम्ही एकावेळी एकाच पवित्र ग्रंथातील श्लोकाचे पठन करा.म्हणजेच एका पवित्र ग्रंथातील श्लोकांचे दुसऱ्या पवित्र ग्रंथातील श्लोकांत मिश्रण करू नका.

**५)** ह्या श्लोकांचा अपमान करू नका. सर्व धार्मिक पुस्तकांतील ईश्वरी श्लोकांबद्दल गंभीर व आदरपूर्वक राहा. कारण ते सर्व एकाच ईश्वराने निर्माण केलेले आहेत. फक्त त्याची भाषा वेगळी आहे.

**६)** अरेबिक भाषा ही उच्चारण्यास अत्यंत कठिण आहे.

जर आपण तिचा योग्य उच्चार केला नाही तर तिचा अर्थ लगेच बदलतो. अरेबिक भाषा ठाऊक नसलेला नवीन वाचक हा उच्चारात चुका हमखास करणारच, म्हणून श्लोकांचा योग्य तो आध्यात्मिक परिणाम मिळण्यासाठी हे श्लोक म्हणताना त्याचा खरा अर्थ मनात ठेवा लक्षात घ्या. ह्यामुळे तुम्हाला नकारात्मक परिणाम वा ईश्वराचा क्रोधह्यांना सामोरे जावे लागणार नाही.

हे ह्या पुस्तकातील पवित्र श्लोक आहेत. म्हणून हे पुस्तक अश्लिल कादंबऱ्या व सिनेमाची मासिके ह्यांच्यापासून दूर ठेवा. जर तुम्हाला असे करणे कठिण जात असेल तर श्लोक असलेली पाने फाडून घ्या आणि त्यांची योग्य ती विल्हेवाट लावा. म्हणजेच एखाद्या मुसलमानाकडे ती कबरस्थानात पुरण्यासाठी ताब्यात द्या किंवा सन्मानपूर्वक त्यांचे समुद्र वा नदी ह्यांत विसर्जन करा आणि जर तेही शक्य नसेल तर सन्मानपुर्वक ते जाळुन टाका.

**भरभराटीच्या प्रार्थनेसाठी तयारी**

१) सहा ते आठ तास झोप मिळण्यासाठी लवकर झोपी जा.

२) सूर्योदयापूर्वी सकाळी लवकर उठा.

३) बाथरूममध्ये जा, स्नान करा. (ह्यापुढे गुळण्या आणि नाकपुड्या साफ करणे ह्यांचा आध्यात्मिक फायदा होण्यासाठी तुमच्या स्नानात समावेश करा) शारीरिक आरोग्यासाठी जेवढे शक्य होईल तेवढे उपाशीपोटी पाणी प्या व सकाळी फिरावयास बाहेर पडा.

४) शक्यतोवर एकटे जाण्याचा प्रयत्न करा त्यामुळे तुम्ही बोलणे हे टाळू शकाल.

## उत्कर्ष वाढविणारी पहिली प्रार्थना

१) सकाळी फिरावयास बाहेर पडताना श्लोक क्र. १ एक वेळा म्हणा.

२) श्लोक क्र. २ एक वेळा म्हणा.

(वरील दोन्ही श्लोक हे प्रत्येक प्रार्थनेपूर्वी आणि कुठल्याही विधायक कार्याची सुरुवात करण्यापूर्वी पठण करा.)

३) श्लोक क्र. ३ शंभरवेळा पठण करा.

४) ही पहिला उत्कर्ष वाढविणारी अगदी सोपी प्रार्थना आहे व त्यासाठी फक्त ५ ते १० मिनिटे लागतात.

५) ह्या प्रार्थनेसाठी उत्कृष्ट व जास्त परिणामकारक वेळ ही सूर्योदयापूर्वी आहे.

## भरभराट वाढविणारी दुसरी प्रार्थना

१) श्लोक क्र १ एकदा म्हणा.

२) श्लोक क्र. २ एकदा म्हणा.

३) श्लोक क्र १३ म्हणजेच दरूदचे तीन वेळा पठण करा.

४) श्लोक क्र. ४ हा एकेचाळीस वेळा म्हणा.

५) श्लोक क्र. १३ एक वेळा म्हणा.

६) सुरुवातीला तुम्हाला ते पुस्तकांतून वाचण्याची गरज भासेल. परंतु हळूहळू तुम्ही ते लक्षात ठेवू शकाल. त्यामुळे ४१वेळा म्हणण्यासाठी फक्त दहा मिनिटे लागतात.

७) सकाळच्या अर्धा तास फिरण्यातून तुमची प्रार्थना पुरी होईल चांगल्या स्वच्छ ठिकाणी फिरण्याची काळजी घ्या. जेव्हा कचऱ्याच्या ढिगाऱ्याजवळून जात असाल तेव्हा प्रार्थना पठण बंद करा. तसेच मध्ये बोलणे बंद करा.

८) वरील प्रार्थना तुम्ही तुमचे शयनगृह (बेडरूम) किंवा जर सकाळी बाहेर फिरावयाला न गेल्यास कुठेही करू शकता.

## भरभराट वाढविणारी तिसरी प्रार्थना

जेव्हा तुम्ही तुमच्या कार्यालयात पोहोचता, तुमच्या खुर्चीवर आदरभावाने बसा व शांतताभंग टाळण्यासाठी तुमचा मोबाईल फोन व टेलिफोन ह्यांना बंद ठेवा.

१) श्लोक क्र. १,२ आणि १३ एकदा म्हणा.

२) श्लोक क्र. ४ एक वेळ म्हणा

३) श्लोक क्र. १२ तीन,सहा किंवा नऊ वेळा म्हणा

४) श्लोक क्र. १३ चे पुन्हा पठण करा.

५) त्यानंतर म्हणा,"हे ईश्वरा! हे श्लोक म्हणताना मी ज्या काही चुका केल्या असतील, त्याबद्दल मला क्षमा करा व माझ्या प्रार्थनेचा स्वीकार करा व ज्यांचा तुझ्यावर विश्वास आहे, असे आत्मे आणि मानव त्यांना ह्या प्रार्थनेचे कृपाप्रसाद पाठवून द्या". त्यानंतर तुमच्या भरभराटीसाठी व ईश्वराच्या आर्शिवादासाठी ईश्वराकडे स्वतःच्या भाषेत प्रार्थना करा.

७) अगदी शेवटी श्लोक क्र. १३ पुन्हा एकदा म्हणा.

८) त्यानंतर तुमच्या तळहातावर फुंकर मारा व ती तुमच्या चेहऱ्यावरून फिरवा.

९) चाळीस दिवसानंतर तुम्हाला तुमच्या जीवनात परिणामकारक फरक आणि सुधारणा झालेली दिसून येईल.

१०) भरभराटीसाठी शेवटची चौथी प्रार्थना किंवा पुण्याचे

कार्य म्हणजे देणगी. प्रत्येक महिन्याला तुम्ही काही संपत्ति ही अनाथाश्रम किंवा तुमच्या परिवारांतील आणि समाजातील गरीब लोकांना दान केली पाहिजे.

म्हणून पहिल्या प्रयत्नांत तुम्हाला काही परिणाम जाणवणार नाही. कारण तुमच्या पठण केलेल्या श्लोकात शक्ति नसते.

जसे अंडी ही फुटून पिल्लू बाहेर पडण्यापूर्वी उबवण्यास पुष्कळ वेळ घेतात. जेव्हा चुंबक हा साध्या लोखंडी तुकड्यावर पुष्कळवेळा वारंवार घासल्यास त्या लोखंडाच्या तुकड्याला चुंबकाचे गुणधर्म प्राप्त होतात. काही चमत्कार घडविण्यापूर्वी संत आणि ऋषिमुनी हे दशकानुदशके प्रार्थना करतात.

त्याचप्रमाणे ईश्वरी श्लोक ह्या अद्‌भुत गोष्टी घडवून आणतील ह्यात वादच नाही. पण तुम्हाला ते पहिल्याच दिवशी किंवा पुढील दिवशी मिळणार नाहीत. जर तुम्ही तळमळीने कमीत कमी चाळीस दिवस वरील मार्गाचे अनुकरण केले तर तुम्हाला होकारार्थी परिणाम जाणवु लागेल. म्हणून चिकाटी धरा आणि पुढे चला.

- जर तुम्ही अत्यंत चिंताग्रस्त असाल व तुमच्या समस्येवर काहीही उपाय नसेल तर तुमचे डोळे बंद करा आणि अशी कल्पना करा की तुम्ही मोकळ्या जागेत आकाशाखाली उभे आहात आणि ईश्वराकडे मदत मागत आहात व त्यासाठी विनंति करीत आहात व श्लोक क्र. १० हा १५ मिनिटे म्हणा. पंधरा मिनिटानंतर तुम्हाला ताजेतवाने, आत्मविश्वास व मोकळे वाटेल. एखादेवेळी तुमचा प्रश्न हा दुसऱ्या दिवशी सुटणार नाही. परंतु तुम्ही ह्या श्लोकाचे वारंवार पठण केलेत, तर तुमची समस्या तरी सोडविली जाईल किंवा ईश्वर हा तुम्हाला अन्य मार्ग सुचविल.

- जर तुमच्या कामाचे स्वरूप हे कंटाळवाणे व खडतर स्वरूपाचे असेल व जर तुम्ही संध्याकाळपर्यंत थकून जात असाल आणि तुम्हाला सकाळी ताजेतवाने वाटत नसेल तर झोपण्यापूर्वी 'वझू' क्रिया करा आणि खालीलप्रमाणे पठण करा.

श्लोक क्र. १६ - ३३ वेळा
श्लोक क्र. १७ - ३३ वेळा
श्लोक क्र. १८ - ३४ वेळा

त्यानंतर तुमच्या तळहातावर फुंकर मारा. ती तुमच्या सर्व शरीरभर पसरवा. त्यानंतर कोणाशीही एक शब्द न बोलता झोपावयास जा. सकाळी उठल्यावर (इन्शा अल्लाह) तुम्हाला ताजेतवाने व उत्साही वाटेल.

- जर तुम्ही तुमच्या आयुष्यात निराश झालेला असाल आणि जर कोणताही निर्णय तुम्ही घेऊ शकत नसाल. किंवा खुपच अडचणींनी त्रस्त असाल तेव्हा श्लोक क्रं. २० सकाळी उठल्यांनतर १०० वेळा पुर्ण लक्ष केंन्द्रीत करून म्हणा.

काही दिवसानंतर तुम्हाला मन शांत झाल्यासारखे वाटेल आणि योग्य निर्णय घेण्यासाठी तुमचे मन तयार असेल.

**श्लोक क्र.१ आणि २**

| | |
|---|---|
| अऊज़ु बिल्लाहि मिनश्शैता नीर्रजीम.<br>बिस्मिल्लाहिर्रहमानिर्रहीम | मी धिःकारलेल्या सैतानापासून ईश्वराकडे आश्रय मागतो.(पवित्र कुराण १६:९८)<br>कृपावंत आणि दयावंत ईश्वराच्या नावाने. (पवित्र कुराण १:१) |

**श्लोक क्र. ३ (तस्बीह)**

| | |
|---|---|
| सुबहानल्लाहि वबिहम्दिहि | महिमा ईश्वरा करीता व प्रशंसा ईश्वरा करीता आहे |
| सुबहानल्लाहिल अज़ीम | महिमा सर्वश्रेष्ठ ईश्वरा करीता आहे. |

**श्लोक क्र. ४ (सूरह हम्द)**

| | |
|---|---|
| अल्हम्दु लिल्लाहि रब्बिल आलमीन. | स्तवन फक्त ईश्वरासाठीच आहे. जो सर्व सृष्टीचा रब (पालनकर्ता) आहे. |
| आर्रहमानिर्रहीम. | एकमात्र कृपावंत आणि दयावंत, |
| मालिकि यौमिद्दीन. | निर्णयाच्या दिवसाचा स्वामी आहे. |
| इय्या कनअबुदु व इय्या कनस्तईन. | आम्ही तुझीच बंदगी (भक्ति) करतो आणि तुजपाशीच मदत मागतो. |
| इह्दिनस् सिरातल् मुस्तकीम. | आम्हाला सरळ मार्ग दाखव. |
| सिरातल्लज़ीना अन्अम्ता अलैहिम. | त्या लोकांचा मार्ग ज्यांना तू अनुग्रहित केलेस. |
| ग़ैरिल मग़ज़ूबि अलैहिम् वलज़्ज़ाल्लीन.(**पवित्र कुराण १:१-७**) | (ते असे लोक आहे) जे कोपग्रस्त झाले नाहीत व जे मार्गभ्रष्ट नाहीत. |

| **श्लोक क्र. १०**<br>या हय्यो या कय्यूमो<br>बिरहमतिका अस्तग़िस. | हे चिरकाळ जिवंत राहणाऱ्या, हे सदासर्वदा कायम राहणाऱ्या,<br>(हे ईश्वर) तुझ्या दयाकृपेची याचना करतो. |
|---|---|
| **श्लोक क्र. १२ (सूरह अहद)** | सांगा, तो ईश्वर आहे एकमेव. |
| कुल हु वल्लाहु अहद. अल्लाहुस्समद | ईश्वर सर्वांपासून निरपेक्ष आहे आणि सर्व त्याचे गरजवंत आहेत. |
| लम यलिद वलम युलद | न त्याची कुणी संतती आहे आणि न तो कुणाची संतती. |
| वलम यकुल् लहु कुफुवन अहद | आणि कुणी त्याच्या समान नाही. |

(पवित्र कुराण ११२:१-४)

| **श्लोक क्र. १३ (दरूद)**<br>सल्लल्लाहू अला मुहम्मद<br>सल्लल्लाहु व अलैहि वसल्लम | ईश्वरातर्फे दया कृपा असो मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) वर.<br>दया कृपा असो त्यांच्या कुटुंबियांवर शांति सलामती असो. |
|---|---|

**श्लोक क्र. १४**

| अला बिज़िक्रिल्लाहि तत्मयिन्नल कुलूब | जाणून असा की ईश्वराच्या स्मरणाने हृदयांना संतोष समाधान लाभते. (पवित्र कुराण १३:२८) |
|---|---|

**श्लोक क्र. १६**

| सुबहानल्लाह | महिमा प्रशंसा फक्त ईश्वरा करिता |
|---|---|

**श्लोक क्र. १७**

| अलहम्दु लिल्लाह | सर्व प्रशंसा फक्त ईश्वरा करिता |
|---|---|

**श्लोक क्र. १८**

| अल्लाहु अकबर | ईश्वर सर्वश्रेष्ठ आहे. |
|---|---|

**श्लोक क्र. २०**

| या रहीम<br>या हादी | हे अंत्यत दयाळू.<br>हे मार्गदर्शन करणारे |
|---|---|

## भाग क्र. ६

ह्या पुस्तकात आपण धार्मिक शिकवण आणि ईश्वरावर विश्वास ह्या गोष्टींना अतिशय महत्त्व दिले आहे. पण ईश्वर हा कोण आहे? आपण त्याच्यावर दृढ श्रद्धा निर्माण होण्यासाठी ईश्वराला शास्त्रीय रीतीने आणि धार्मिकरीत्या नीट समजून घेऊ या.

*प्रकरण क्र. ४१*

# ईश्वर हा कोण आहे?

(Who is God?)

**हिंदु धर्माच्या मते**

१) *महान परमेश्वर हा ह्या पृथ्वी आणि आकाश ह्यांचा स्वामी आहे. हे ईश्वरा ! आम्हाला मदत कर.*

*"महोदिवः प्रथिव्यध्च सम्राट नो भवत्विन्द्र ऊती"*

(पवित्र ऋग्वेद १: १९ : ७)

२) *ईश्वराने प्रत्येक प्राणीमात्राला निर्माण केले.*

*"प्रजा पति जर्नयति प्रजा रुमा."* (अथर्व वेद १ : १०० : १)

३) *"हे परमेश्वरा! तू ह्या विश्वाच्या सुरुवातीपासून आहेस आणि तुला प्रत्येक गोष्टीचे ज्ञान आहे."*

*"तवमग्ने प्रथमो अडिरस्तमः"* (पवित्र ऋग्वेद २:३१:१)

४) *"त्याचे प्रत्येक गोष्टीवर नियंत्रण आहे."*

*विश्वस्य मिषतो वशी।* (ऋग्वेद २ : १९० : १०)

## मुस्लिम धर्माच्या मते

१) *काय तुम्हाला ठाऊक नाही कि पृथ्वी आणि आकाशामध्ये ईश्वराचे अधिपत्य आहे आणि त्याच्याशिवाय अन्य कुणीही तुमची काळजी घेणारा व मदत करणारा नाही?* (पवित्र कुराण २ : १०७)

२) *तो जो पृथ्वी व आकाशाचा स्वामी आहे ज्याने कोणाला पुत्र बनविलेले नाही, साम्राज्यामध्ये ज्याच्याबरोबर कोणीही भागीदारी नाही, ज्याने प्रत्येक वस्तु निर्माण केली.* (पवित्र कुराण २५ : २)

३) *पृथ्वी व आकाशाच्या राज्यांचा स्वामी तोच आहे, जीवन प्रदान करतो व मृत्यू देतो, आणि प्रत्येक गोष्टीला समर्थ आहे. तोच आदिही आहे आणि अंतिमसुद्धा. आणि प्रकटही आहे व अप्रकटसुद्धा आणि त्याला प्रत्येक गोष्टीचे ज्ञान आहे.* (पवित्र कुराण ५७ : ३)

४) *ईश्वराचे त्याच्या सर्व प्राणीमात्रांवर संपूर्ण नियंत्रण आहे.*

(पवित्र कुराण ६ : १८)

५) *तो ईश्वर आहे ज्याच्या व्यतिरिक्त कोणी उपास्य नाही. अदृश्य आणि दृश्य सर्व गोष्टींना जाणणारा तोच मेहरबान व दयावान आहे. तो ईश्वरच आहे ज्याच्या व्यतिरिक्त कोणी उपास्य नाही, तो बादशाह आहे अत्यंत पवित्र, सर्वस्वी शांती अभयदान करणारा, निगाहबान, सर्वांवर प्रभावी आपली आज्ञा बळाने लागु करणारा आणि मोठाच बनुन राहणारा, पवित्र आहे. ईश्वर त्या अनेकेश्वरवादापासून जे हे लोक करित आहेत. तो ईश्वरच आहे जो निर्मितीची योजना आखणारा आणि अमलात आणणारा व त्यानुसार रंगरूप देणारा आहे. त्यांच्यासाठी सर्वोत्तम नावे आहेत. प्रत्येक वस्तू जी आकाशात व पृथ्वीत आहे त्याचे पावित्र्यगान करीत आहे, आणि तो जबरदस्त व बुद्धीमान आहे.*

(पवित्र कुराण ५९ : २२ : २४)

## असे किती ईश्वर आहेत?

## मुस्लिम धर्मानुसार

१) पवित्र कुराण सांगतो, *"हा आहे ईश्वर तुमचा पालनकर्ता, कोणीही ईश्वर त्याच्या व्यतीरिक्त नाही, प्रत्येक वस्तूचा निर्माता. म्हणुन तुम्ही त्याचीच भक्ती करा आणि तो प्रत्येक वस्तुचा रक्षणकर्ता आहे"* (पवित्र कुराण ६ :१०२)

## हिंदु धर्मानुसार

१) उपनिषद सांगते, *"अन्य कोणाच्याही भागीदारीशिवाय तो एकटा आहे."*

*"एकम् एवम् अद्धितीयम"* (छांदोग्य उपनिषद ६ : २ : १)

२) ऋग्वेद सांगतो,

*"हे श्रद्धावान व विश्वास ठेवणाऱ्यांनो! ईश्वराशिवाय दुसऱ्या कोणाचीही पूजा करु नका. तो फक्त एकमेवच आहे."* (ऋग्वेद ८:१:१)

३) हिंदू वेदांताचे ब्रह्मसूत्र सांगते, *"ईश्वर हा एकच आहे. त्याच्याशिवाय अन्य कोणीही, कधीही, एक लहानसा अंश देखील नाही."*

*"एकम ब्रह्म द्धितीय नास्तेः नेह ना नास्ते किंचन।"*

४) अथर्व वेद सांगतो, *"जो माणसांच्या अंतःकरणात (वा हृदयात) प्रवेश करतो आणि ज्याला त्यांची रहस्ये माहित असतात असा परमेश्वर हा एकच आहे.* (अथर्व वेद १० : ९.२९)

## शिख धर्मानुसार

श्री गुरू ग्रंथसाहिबाच्या पहिल्या ग्रंथाच्या जीपोजीच्या पहिल्याच श्लोकात *"फक्त एकाच ईश्वराचे अस्तित्व आहे. जो खरा निर्माता आहे. त्याला भय आणि तिरस्कार नाही. त्याचा जन्म झालेला नाही. तो अनादि आहे आणि कायमस्वरूपी आहे. तो महान आणि द्यावान आहे".*

प्रार्थना म्हणताना शिख लोक उच्चार करतात.

"वाऽ हे गुरू" ह्याचा अर्थ खरा एक परमेश्वर असा होतो.

## पारशी धर्मपंथानुसार

पारशी लोक त्यांच्या ईश्वराला 'अहुरा माझदा' ह्या नावाने हाक मारतात. त्यांचा धार्मिक ग्रंथ दासातिर सांगतो, *"ईश्वर हा एकच आहे आणि कोणीही त्याच्या बरोबरीचा नाही.*

## खिस्ती आणि यहुदी धर्मानुसार

पवित्र बायबल सांगते,

१) *हे इस्त्रायलच्या बालकांनो ! ऐका आपला मालक ईश्वर आहे आणि तो एकच आहे.* (पवित्र बायबल ६ : ४)

२) *मीच तुमचा ईश्वर आहे आणि माझ्याखेरीज अन्य कोणीही तुमचे रक्षण करू शकणार नाही.* (पवित्र बायबल ४३ :११)

३) *मीच फक्त तुमचा ईश्वर आहे व माझ्याशिवाय अन्य दुसरा कोणताही परमेश्वर नाही.* (पवित्र बायबल ४६ :९)

४) *आपला अधिपति आपला ईश्वर हा एकच आहे.*

(डिओटीरोनॉमी ६ : ४ मार्क १२ : २९ : ३२)

५) *तुमचा मालक ईश्वर आहे व त्याची प्रार्थना करा व फक्त त्यालाच तुम्ही तुमची धार्मिक सेवा देऊ करा.* (मॅथ्यू ४ :१०)

६) *तुम्हाला ह्या गोष्टी दाखविल्या गेल्या त्यामुळे तुम्हाला कदाचित समजले असेल की आपला ईश्वर एकच आहे व त्याच्याशिवाय दुसरा कोणीही नाही. त्याची नोंद ह्या आणि आपल्या हृदयात असे ठेवून द्या की, ईश्वर हा वर स्वर्गात आणि खाली पृथ्वीवर (सर्व ठिकाणी) देखील एकच आहे व त्याखेरीज अन्य कोणीही नाही.* (डिओटीरोनॉमी ४ : ३५ : ३९)

## परमेश्वर कशासारखा दिसतो?(How God Looks Like?)

## इस्लाम धर्मानुसार

१) *सृष्टीतील कोणतीही वस्तू त्याच्या समान नाही, तो सर्वकाही ऐकणारा व पाहणारा आहे.* (पवित्र कुराण ४२ : ११)

२) *दृष्टी त्याला पाहू शकत नाही, पण तो दृष्टीला पाहत असतो. तो अत्यंत सुक्ष्मदर्शी व जाणकार आहे.* (पवित्र कुराण ६: १०३)

३) *" ईश्वर आकाश व जमीनीचा (तेज) प्रकाश आहे. त्याच्या तेजाची उपमा अशी की एक ताक आहे ज्यात दिवा ठेवलेला आहे. आणि दिवा एका कंन्दीलमध्ये आहे आणि कंन्दील एवढा स्वच्छ आहे कि जसा मोती किंवा चमकणारा तारा! आणि त्या दिव्यात अशा पवित्र झाडाचे तेल आहे जसे जैतुन, जे न पुर्वेचे आहे न पश्‍चिमेचे. आणि त्यातील तेल आगीच्या स्पर्शाशिवाय जळण्यास तयार आहे.*

*आणि प्रकाशच प्रकाश होत आहे. ईश्वर आपल्या तेजाने ज्याला ईच्छील त्याला सत्याचा मार्ग दाखवील. आणि ईश्वर समजण्यासाठी उदा. देतो, आणि त्याला सर्वकाही माहीत आहे."* (पवित्र कुराण २४ : ३५)

## पवित्र पुस्तकांमधील आणखी काही संदर्भ -

१) *एकदा प्रेषित मूसा यांनी ईश्वराकडे असे आग्रहपूर्वक सांगितले की, "हे पालनकर्त्या! मला सक्षम दृष्टी दे की मी तुला पाहावे." त्याने फर्माविले, तू मला पाहू शकत नाहीस, बरे तर त्या समोरील पर्वताकडे पहा, जर तो आपल्या जागी स्थिर राहिला तर अलबत तू मला पाहू शकशील."म्हणुन त्याच्या पालनकर्त्याने जेव्हा पर्वतावर तेज प्रगट केले तेव्हा त्याला चक्काचुर केले आणि मुसा (स.) घेरी येऊन कोसळला. जेव्हा शुद्धीवर आला तेव्हा म्हणाला पवित्र आहे तुझे अस्तित्व, मी तुझ्यापाशी पश्चाताप व्यक्त करतो. आणि सर्वप्रथम श्रद्धा ठेवणारा मी आहे".* (पवित्र कुराण ७ :१४३)

२) *पर्वताच्या माथ्यावर मूसा यांना प्रकाश दिसला. ते तेथे अग्नि आणण्यासाठी म्हणून गेले. जेव्हा ते शिखरावर पोहोचले तेव्हा ईश्वराने मूसाशी संभाषण केले आणि त्यांना प्रेषितपद बहाल केले.* (पवित्र कुराण २०:१०)

३) *आठवण करा जेव्हा तुम्ही मूसाला सांगितले होते की, आम्ही तुमच्या सांगण्यावर कदापि विश्वास ठेवणार नाही जोपर्यंत आमच्या डोळ्यांनी उघडपणे ईश्वराला (तुझ्याशी बोलताना) पाहात नाही. त्यावेळी एका कडकडाटाने तुम्हाला गाठले आणि तुम्ही अचेत होऊन कोसळलात. परंतू आम्ही तुम्हाला पुन्हा सचेत उभे केले जेणेकरून या उपकारानंतर तरी तुम्ही कृतज्ञ राहाल.* (पवित्र कुराण २:५५-५६ )

## हिंदू धर्मानुसार -

१) *"त्याचे कोणाशीही साम्य नाही; डोळे त्याला पाहू शकत नाहीत."* (सावेत सावात्रा उपनिषद, प्रकरण ४ : १९ : २०)

२) *"तो शरीराशिवाय आणि शुद्ध आहे."* (यजुर्वेद ४० : ८)

३) *"कुठलीही मुर्ती त्याच्याशी साम्य दर्शविणार नाही."*(यजुर्वेद ३२:३)

४) *ईश्वर हा शरीराशिवाय, जखमेशिवाय, शुद्ध आणि चांगली दृष्टी असलेला असा प्रकाशमान प्रकाश आहे. त्याचे प्रत्येक गोष्टीवर नियंत्रण असून तो स्वयं आधारशील आहे तो अनंत काळासाठी राजा आहे.*
(यजुर्वेद संहिता, लेखक राल्फ आय एच ग्रिफिथ, ८९ : ५३८)

शिख धर्म हा ईश्वराला एक ओंकार असे म्हणतो ह्याचा अर्थ कुठलेही शरीर वा आकार ह्यांच्याशिवाय ईश्वर असा आहे.

पारशी धार्मिक पुस्तक दासातिर हे सुद्धा शरीरविरहित व आकाराशिवाय ईश्वर असेच त्याचे वर्णन करतो

पवित्र बायबलनुसार

*"माझ्याशिवाय अन्य कोणीही ईश्वर नाही. तुम्ही माझी मुर्ती बनवू नका. आकाशात, जमिनीत किंवा पाण्यात माझ्यासारखा कोणीही नाही. म्हणून तुम्ही कोणापुढेही गुढगे टेकू नका किंवा त्यांच्यामुळे प्रभावित होऊन जाऊ नका. मीच तुमचा खरा ईश्वर आहे."* (पवित्र बायबल, इक्झोडस २० : ३ - ५६)

२) *"ह्या विश्वाचा मीच फक्त प्रकाश आहे."*
(पवित्र बायबल, जॉन ८: १२)

## त्याची वैशिष्ट्ये काय आहेत?(What are His features?)

## पवित्र कुराणानुसार

१) सर्वांना असे जाहिरपणे घोषित करा

*सांगा, तो ईश्वर आहे एकमेव. ईश्वर कोणावरही अवलंबुन नाही आणि सर्व त्याचे गरजवंत आहेत. न त्याची कुणी संतती आहे आणि न कोणाची संतती. आणि कुणी त्याच्या समान नाही.* (पवित्र कुराण ११२ : १-४)

२) *जे काही दासाच्या समक्ष आहे त्यालाही तो जाणतो आणि जे काही दासाच्या समक्ष आहे त्यालाही तो जाणतो आणि जे काही त्यांच्यापासून अदृश्य आहे त्यालाही तो जाणतो आणि त्याच्या माहितीपैकी कोणतीही गोष्ट त्याच्या बुद्धिकक्षेत येऊ शकत नाही याव्यतीरिक्त की एखाद्या गोष्टीचे ज्ञान तो स्वत:च त्यांना देऊ इच्छित असेल. त्यांचे राज्य आकाश आणि पृथ्वीवर पसरले आहे.* (पवित्र पुराण २ : २५५)

३) *पृथ्वीवर आणि आकाशात जे काय अस्तित्वात आहे. त्याची संपूर्ण माहिती ईश्वराला आहे व त्याला प्रत्येक गोष्ट माहित आहे."*

(पवित्र कुराण ५ :९७)

४) ईश्वर म्हणाला,

*"आकाशात व पृथ्वीमध्ये जे काही आहे ते सर्व ईश्वराचे आहे. तुम्ही आपल्या मनांतील गोष्टी प्रगट करा अथवा लपवा ईश्वर कोणत्याही परिस्थितीत तुमच्याकडून त्यांचा हिशेब घेईल."* (पवित्र कुराण २ :२८४)

५) ईश्वर म्हणाला,

*"मी तुमच्या मानेच्या शिरेपेक्षा अगदी जवळ आहे."*

(पवित्र कुराण ५० : १६)

## पवित्र वेदांच्या मते -

१) *"सर्व दिशा ह्या त्याच्यासाठी आहेत."*

(पवित्र ऋग्वेद ४-१३-१०)

२) *"ईश्वराची नजर सर्व दिशांना आहे. त्याचा चेहरा सर्व दिशामध्ये आहे."* (पवित्र ऋग्वेद ३-८१-१०)

३) *"आकाश किंवा आकाशातून पडणारा पाऊस ह्यापैकी कोणीही ईश्वराला झाकून टाकू शकत नाही."* (पवित्र ऋग्वेद १४-५२-१)

४) *"परमेश्वरा ! तुच एकमेव आहेस व तुला कोणाहीपेक्षा जास्त माहिती आहे."* (पवित्र ऋग्वेद २-३१-१)

५) *"तू सर्व सामर्थ्यवान असल्याने कृतीवीर आहेस. तो चांगल्या स्वभावाच्या लोकांच्या इच्छा पूर्ण करतो. तो अधिपति राजा आहे. तो सर्वज्ञ सर्वशक्तिमान आहे. तो सर्व तऱ्हेच्या प्रशंसाना लायक आहे. तो सर्व सन्मानांचे मूळ उद्दिष्ट आहे. तो श्रीमंत आहे. तो प्रत्येक गोष्टीचा निर्माणकर्ता आहे व त्याला प्रत्येक गोष्टीचे ज्ञान आहे."* (पवित्र ऋग्वेद २ : १ : ३)

६) *तो सामर्थ्यवान असल्यामुळे शक्तिचे उगमस्थान व आधारस्तंभ आहे. तो एकमेव असा आहे की जो तरतूदी करतो. तो परोपकारी आहे तो प्रेमाने काळजी घेणारा आहे. जो त्याची प्रार्थना करतो ईश्वर त्याचे रक्षण करतो.* (पवित्र ऋग्वेद २ : १ : ६)

७) *ईश्वर हा सर्वामध्ये महान आहे.* (पवित्र ऋग्वेद २ : २८४)

८) *तो ह्या जगाचा निर्माता आहे. तो पूर्व आणि पश्चिम, वरती आणि खाली सर्वत्र आहे.* (पवित्र ऋग्वेद २ : १९०-१०)

९) *"मी अगदी तुमच्या जवळच आहे व तुमचा रक्षणकर्ता आहे."* (पवित्र ऋग्वेद १ -२४-५)

१०) *तो हा असा आहे ज्याला ऐकण्यासाठी कानाची जरुरी नाही तरीपण तो श्रवणशक्तिचे उगमस्थान आहे हे तुम्हाला माहिती आहे का? तो ब्रह्म आहे."* (उपनिषद)

११) *"या विश्वाचा परमेश्वर फक्त एकच आहे. तो प्रत्येक सजीव गोष्टीचा आत्मा आहे. तो जीवनाच्या प्रत्येक भागात सर्वव्यापी आहे. तो सर्व क्रियांना दिशा दाखवतो तो सर्वांच्या वरचा आहे तो प्रत्येकाचे आश्रयस्थान*

*आहे. तो सर्वकाही पाहतो. त्याला सर्व माहित असते. त्याला कुठल्याही रोगाची भिती लागू होत नाही."* (शेताष्वतार उपनिषद प्रकरण ६, मन्तर - ११)

१२) *"त्याचे कोणीही पोषण करण्याची जरुरी नाही. पण तो मात्र प्रत्येकाचे पालनपोषण करतो."* (ऋग्वेद २०-१६४-१)

१३) *"तो स्वतः खात नाही पण प्रत्येकाचे पोषण करतो."*
(पवित्र ऋग्वेद २०- १६४-१)

१४) *कुठल्याही ईश्वराला आईवडिल वा अधिपति नाहीत."*
(स्वेतस्वत्र उपनिषद ६-९) (भाग २, पान २६३)

१५) *त्याची कोणतीही आकृती नाही, कुठलाही डोळा त्याला पाहू शकत नाही. जे त्याला मनाने व अंतःकरणाने पाहातात त्यांना तो अमर करतो."* (स्वेतस्वत्र उपनिषद ४ :२०)

१६) *"त्याचा कोणापासूनही जन्म झालेला नाही, तो फक्त प्रार्थना करण्याच्याच पात्रतेचा आहे. त्याची काही मुर्ती नाही. तो अतिशय वैभवशाली आहे."* (यजुर्वेद : भाषांतरकार देवीचंद (एम.ए) पान ३७७)

१७) नागेंद्र नाथ बासू ह्यांनी संपादित केलेल्या विश्वकोशाच्या दुसऱ्या भागातील काही श्लोक.

**इति अल्लोपनिषदांतील श्लोक**

| | |
|---|---|
| आदल्ला बूक मेककम<br>अल्लबूक निखादकम।।४।। | ह्या श्लोकाचे भाषांतर करता येणे शक्य झाले नाही. |
| अला यज्ञन हुल हुत्वा अल्ला।<br>सूर्य चंद्र सर्वनक्षत्र।।५।। | याग युगापासून ईश्वराची प्रार्थना केली जाते. सूर्य चंद्र आणि तारे हे ईश्वरामुळे आहेत. |
| अल्लो ऋषीणां सर्व दिव्यां इंद्राय<br>पूर्व माया परमंतरिक्षा।।६।। | ईश्वर हा ऋषिंचा (संताचा) आहे. तो इंद्रापेक्षाहि महान आहे व ह्या अंतरिक्षपेक्षाही रहस्यमय आहे. |
| अल्लः पृथिव्या आंतरिक्षम् विश्वरुपम।।७।। | ईश्वर हा पृथ्वी, आकाश व विश्वाच्या सर्व वस्तुमध्ये दृश्यमान आहे. |

| | |
|---|---|
| इल्लांकबर इल्लांकबर इल्ला<br>इल्लतलेति इल्लल्ला।।८।। | ईश्वर हा महान आहे, ईश्वर हा महान आहे<br>कोणीही त्याच्या तोडीचा नाही |
| ओम अल्ला इल्लल्ला अनादि। | ओम म्हणजे अल्लाह. आपण त्याची<br>सुरुवात आणि शेवट<br>ह्याचा अंदाज करू शकत नाही.<br>आपण दुष्टांपासून रक्षण करण्यासाठी<br>अशा ईश्वराची प्रार्थना करतो. |
| हे स्वरुपाय अथर्वण शामा<br>हुद्री जनाम पशून सिद्धान:<br>जलवरान् अदृष्टं कुरु कुरु फट।।९।। | हे ईश्वर! दुष्ट गुन्हेगार, धार्मिक लोक जे लोकांची दिशाभूल करतात. त्यांचा नाश कर आणि पाण्यातील नुकसान करणाऱ्या किटांणुपासुन (Evil Creature of Water) आमचे रक्षण कर. |
| असुरसंहारिणी हुँ ह्रीं अल्लो।<br>रसूल महंमदकबरस्य अल्लो | ईश्वर हा दुष्ट शक्तिंचा नाश करणारा आहे<br>मुहम्मद हा महान ईश्वराचा प्रेषित आहे. |
| अल्लाम इल्लतलेति इल्ललला।।१०।। | ईश्वर हा ईश्वर आहे. त्याच्यासारखा दुसरा<br>कोणीही नाही. |

१८) गोरखपूर येथून गीता प्रेसने प्रकाशित केलेले 'कल्याण' मध्ये त्यांच्या 'उपनिषदांक' ह्या खास अंकामध्ये २२० उपनिषदांचा उल्लेख केलेला आहे. ह्या २२० उपनिषदात अल्लोपनिषद ह्याचा संदर्भ १५ व्या ठिकाणी आहे. डॉ. वेदप्रकाश उपाध्याय ह्यांनी पण आपल्या प्रदीप प्रकाशनने १९८९ मध्ये प्रसिद्ध केलेल्या 'वेदिक साहित्य एक विवेचन' ह्या पुस्तकात अल्लोपनिषदाचे वर्णन केले आहे.

## शिख धर्माच्या श्री गुरू ग्रंथसाहिबानुसार

१) ईश्वर हा कर्तार (निर्माता), साहिब (प्रत्येकाचा अधिपति), अकाल (कायमस्वरूपी), सतनाम (धार्मिक वृत्तीचा), परवारदिगार (मनात काळजी घेणारा) रहिम (दयाळू) करीम (परोपकारी) असा आहे.

## पारशी धर्माच्या दासातिर या ग्रंथाच्या मते

ईश्वर हा एकच आहे. कोणीही त्याच्या तोडीचा नाही. त्याला सुरुवात नाही ना शेवट ! त्याला आई वा वडिल नाहीत किंवा त्याला पत्नी वा मुलगा नाही. त्याला शरीर नाही व आकार नाही. त्याला डोळे पाहू शकत नाहीत. किंवा मन त्याचा विचार करू शकत नाही त्याला समजू शकत नाही त्याची कल्पना करू शकत नाही. आपण कल्पना करतो त्यापेक्षा तो खूप पटींनी महान आहे. आपण स्वतःजवळ असतो त्याहिपेक्षा तो आपल्या जास्त जवळ आहे.

पारशी धर्माच्या अवेस्ता, गाधा आणि यानसा ह्या ग्रंथानुसार भगवान (अहुरा माझदा) हा जनक, सर्वापेक्षा महान, कायमस्वरूपी व उदार आहे.

## ईश्वर काय सांगतो? (What God Says?)

### पवित्र बायबल ग्रंथामध्ये

१) *तुम्ही स्वतःच्या पुजेसाठी कोणतेही चित्र बनवू नये आणि मुर्तीही बनवु नये. तुम्ही त्यांच्यापुढे वाकता कामा नये वा त्याची सेवा करण्यास प्रवृत्त होऊ नये."* (पवित्र बायबल, मॅट्ट - ४:१०)

२) *"लहान बालकांनो ! मूर्तिपुजेपासून तुमचे रक्षण करा !"* (पवित्र बायबल, जॉन - ५:२१)

३) *चांगले काही मिळवण्याची इच्छा करा. वाईट ईच्छा बाळगु नका. त्यामुळे तुम्ही योग्यप्रकारे जगु शकाल.* (पवित्र बायबल, आमोस - ५:१४)

४) *अधिपति मालक, ईश्वराची प्रार्थना करा. फक्त त्याचीच सेवा करा.* (पवित्र बायबल, मॅट्ट - ४:१०)

५) *सर्व मानवांबरोबर शांततेने राहा.* (पवित्र बायबल, रोम १२:१८)

६) *मला हाक मारा व मी तुम्हाला प्रतिसाद देईन.* (पवित्र बायबल, जेर - ३३:३)

७) *वाईट गोष्टीपासून दूर राहा व नेहमी चांगल्या गोष्टी करा.*
(पवित्र बायबल, पीस - ३४:१४)

८) *ईश्वरावर विश्वास ठेवा.* (पवित्र बायबल, मार्क - ११:२२)

९) *ज्या लोकांना त्यांचा ईश्वर माहित आहे ते बलवान असले पाहिजेत.* (पवित्र बायबल, डॅन - ११:३२)

१०) *तो माझ्यावर विश्वास ठेवील तर जास्त चांगली कामे करील.* (पवित्र बायबल, जॉन - १४:१२)

११) *डुकराचे मांस खाऊ नका.*
(पवित्र बायबल,लेव्हीकटूस -११:७:१० डुयरिरोनॉमी १४:८)

१२) *दारू पिऊ नका* (पवित्र बायबल, प्रॉव्र्हबस् - २०-१, युफेसियन्स ५ :१८)

**पवित्र कुराणामध्ये,**

१) *वस्तूस्थिती अशी आहे की ईश्वराने श्रद्धावंताकडून स्वत: त्यांना व त्यांच्या मालमत्तेला स्वर्गाच्या मोबदल्यात खरीदिले आहे*
(पवित्र कुराण ९ : १११)

२) *मोठ्या पापांपासून दूर राहा, तर ईश्वर तुमच्या लहान चुकांबद्दल पण क्षमा करेल* (पवित्र कुराण ४ : ३१)

३) *प्रेमळ आईपेक्षा ईश्वर हा त्याच्या प्राणीमात्रांवर ९९ पट जास्त प्रेम करतो.* (हादिस)

४) *ईश्वर आणि त्याच्या पैगंबराच्या आज्ञा पाळा व आपसांत भांडु नका. नाहीतर तुमच्यात दुर्बलता येईल व तुमचा वचक नाहीसा होईल. संयम राखा. निश्चितच ईश्वर संयमी लोकांबरोबर आहे.*
(पवित्र कुराण ८: ४६)

५) *वस्तुस्थिती अशी आहे की जो कोणी अपराधी बनून आपल्या पालनकर्त्याच्या ठायी हजर होईल त्याच्यासाठी नरक आहे की जिच्यात तो जिवंतही राहणार नाही व मरणारही नाही.*
(पवित्र कुराण २० : ७४)

६) *पृथ्वीवरील आयुष्य हा एक वेळ घालविण्याचे साधन व एक खेळ आहे. मृत्यूनंतरचे जीवन हे शाश्वत जीवन आहे.*
(पवित्र कुराण २९ : ६४)

७) *जर ईश्वर लोकांना एक दुसऱ्याकरवी हटवीत नसता तर मठ, चर्च, मस्जिदी आणि सिनेगॉग ज्यांत ईश्वराचे नाव मोठ्या प्रमाणात घेतले जाते, सर्व उद्ध्वस्त केली गेली असती. ईश्वर जरूर त्या लोकांना सहाय्य करील जे त्याला सहाय्य करतील. ईश्वर मोठा शक्तिशाली आणि जबरदस्त आहे.* (पवित्र कुराण २२ : ४०)

८) *उपकार कर ज्याप्रकारे ईश्वराने तुझ्यावर उपकार केले आहेत आणि जमिनीवर उपद्रव माजविण्याचा प्रयत्न करु नकोस. ईश्वराला उपद्रवी (दंगलखोर) लोक आवडत नाहीत.* (पवित्र कुराण २८:७७)

९) *हे श्रद्धावंतानो तुम्ही पूर्णपणे इस्लामध्ये दाखल व्हा. आणि शैतानाच्या पाऊलवाटेचे अनुकरण करू नका. तो तुमचा उघड शत्रु आहे.*
(पवित्र कुराण २ : २०८)

## पवित्र वेद व भगवदगीता ह्यामध्ये सांगितले आहे.

१) *ज्यांची बुद्धिमत्ता आणि विचारशक्ति ही भौतिक मिळकतीच्या वासनेने भरलेली आहे हे एका ईश्वरापेक्षा दुसऱ्याच्या समोर गुढगे टेकतात. नंतर ते त्यांचा स्वतःचाच पूजा करण्याचा मार्ग बनवितात*
(भगवद्गीता प्रकरण ७, श्लोक २०)

२) *जे एका ईश्वरापेक्षा अन्य दुसऱ्याची पूजा करतात ते अज्ञानाच्या अंधःकारात बुडून जातात.* (पवित्र ऋग्वेद ८ : १:१)

३) *परमेश्वर हा एकच आहे. फक्त त्याचीच प्रार्थना करा.*

(पवित्र ऋग्वेद ८ : १:१)

## चिनच्या तत्वज्ञानांतील ईश्वराची कल्पना

चिनी तत्त्वज्ञ ताओ त्सू ह्याने त्याच्या पुस्तकांत ताओ टी चिंग ह्यामध्ये पुष्कळ तत्त्वज्ञानांचा उल्लेख केला आहे. ज्यांचे पुष्कळ लेखकांनी अनुवाद केलेले आहेत. त्यापैकी काहींची संक्षिप्त वर्णने पुढीलप्रमाणे आहेत.

### ताओ म्हणजे कसे ! (Tao means How)

ताओ म्हणजे कसे काय? गोष्टी कशा घडतात? गोष्टी कशा कार्य करतात? सर्व निर्मितीच्या मागे ताओ हे एक प्रमुख तत्व लपलेले आहे. ताओ म्हणजे परमेश्वर आहे. ताओची व्याख्या केली जाऊ शकत नाही. कारण ते प्रत्येक गोष्टीला लागु पडते. तुम्ही त्याच्यासंदर्भात काहीतरी म्हणुन त्याची व्याख्या करू शकत नाही. जर तुम्हाला तत्वाची व्याख्या करता आली तर ते ताओ नाही.

ताओ हे एक तत्व आहे. निर्मिती ही उलटपक्षी एक प्रक्रिया आहे. म्हणजेच त्यामध्ये पुढील तीन गोष्टी आहेत. तत्व आणि प्रक्रिया, कसे आणि काय !

सर्व निर्मितींची उकल ताओमुळे होते. त्याशिवाय दुसरा अन्य मार्ग नाही. ताओची व्याख्या केली जाऊ शकत नाही पण ताओ हे समजु शकते. त्यासाठीची पद्धत म्हणजे ध्यानधारणा वा चिंतन. किंवा काय घडले आहे ह्याची जाणीव असणे. काय घडले आहे ह्याची जाणीव झाल्यानंतर मला ती गोष्ट कशी घडणार आहे ह्याची जाणीव होऊ लागते. मला ताओचे ज्ञान होऊ लागते.

काय घडणार आहे ह्याची जाणीव करून घेण्यासाठी मी मोकळ्या मनाने लक्ष द्यावयास पाहिजे. मी माझी आवडनिवड वा प्रवृत्ति दूर ठेवली पाहिजे. आवडनिवड ह्याबद्दल अभिमान असणाऱ्यांना फक्त त्यांच्याच आवडीचे योग्य असणाऱ्या गोष्टी दिसतात.

ध्यानसाधना पद्धत ही खरोखरच चांगले काम करते. कारण तत्व आणि प्रक्रिया ह्या एकमेकांपासून अलग करता येणे अशक्य

आहे. सर्व प्रक्रिया ह्या त्यांच्यामागील तत्वांचे ज्ञान देतात. म्हणजेच मला ताओ म्हणजे काय ते माहित होऊ शकते. मला ईश्वराची ओळख होऊ शकते.

ताओ समजून आल्यानंतर गोष्टी कशा घडतात ह्याचे मला ज्ञान होते.

तथापि ताओ हे कोणावरही अवलंबून नसते -

**ताओ ही एक वस्तू नाही**

तुम्ही जितके शक्य असेल तेवढे खोल खोल खणत जा. पण तुम्हाला ताओ ही नाव असलेली वस्तू (गोष्ट) किंवा परमेश्वर मिळणार नाही. ताओ हा एक पदार्थ नाही. ताओ हे एक तत्व किंवा नियम आहे. ताओ म्हणजेच कसे.

सर्व तऱ्हेच्या गोष्टी ह्या ताओनुसार वागतात. पण ताओ त्यांच्याप्रमाणे वागत नाही. ताओ हे कधीही पदार्थ किंवा प्रक्रिया नसते.

ताओ हा सर्व गोष्टींचा नियम आहे, सर्व प्रसंगाचा व घटनांचा कायदा आहे. ताओ हा सर्व निर्मितीचा सर्व सामान्य पाया आहे.

निर्मितीमध्ये गोष्टी आणि प्रसंग ह्यांचा समावेश असतो. सर्व गोष्टी आणि प्रसंग हे कंपनशील आहेत. कंपनामध्ये पूर्ण विरूद्ध किंवा विरूद्ध गुणधर्म असणाऱ्या ध्रुवाचा समावेश आहे. विरूद्ध गुणधर्माचे ध्रुव एकमेकांशी सहकार्य करतात किंवा ते निरनिराळ्या प्रमाणात संघर्ष करतात.

सर्व प्रकारच्या घटना आणि गोष्टी मग त्या सहकार करणाऱ्या वा विरोध करणाऱ्या असोत, सुखकारक वा प्रक्षुब्ध करणाऱ्या असू देत, त्या त्यांचे रूप धारण करतात व ताओच्या तत्वानुसार आकार घेतात.

परंतु ताओ हा काही कंपने वा स्पंदने निर्माण करणारा प्रसंग

नाही. ताओ हा असा नाही उदा. आवाज. ताओला विरूद्ध विरोधी गुणधर्म असणारे गुणधर्म नाहीत. ताओ हा एकमेवच आहे.

मला जितकी माहिती आहे त्यानुसार ताओच्या पुर्वी कोणीही नव्हता. ताओला कुणीही जन्म दिलेला नाही. ईश्वराची कोणीही निर्मिती केली नाही.

**ताओ काय आहे आणि काय नाही?**

पुढील गोष्टी की ज्या ताओ नाहीत

१) ताओ ही एक वस्तू वा गोष्ट नाही.

२) हा एक प्रकारचा आवाज किंवा अन्य कंपनभवन नाही.

३) त्याचे तुकड्यामध्ये विभाग होऊ शकत नाही.

४) त्याच्यात बदल घडुन येत नाही.

५) त्याला पातळ करता येत नाही किंवा त्याच्यात वाढ करता येत नाही.

६) त्याचा कोणी सहकारी किंवा पूरक नाही.

**ताओ म्हणजे काय ते पुढे दिले आहे**

१) तो एकमेव आहे.

२) तो प्रत्येक गोष्ट निश्चित करणारा आहे.

४) तो प्रत्येक गोष्टीचा नियम आहे.

अत्यंत स्पष्ट आणि उपयुक्त असा शब्द जो मला ताओसाठी माहीत आहे तो म्हणजे कसे ! कारण सर्व गोष्टी कशा घडतात ह्यांचे ताओ हे मुलतत्व आहे. ताओला जरी आकार किंवा गुणधर्म नसले तरी नीट लक्षात ठेवा की, ताओ हे सदैव सगळीकडे आहे.

अशी कल्पना करा की, अमर्यादेपणाला (किंवा अनंताला)

चार पातळ्या आहेत. मानव हे एका दृष्टीने अमर्यादित आहेत. पृथ्वी ही अनंत आहे. वैश्विकशक्ति ही अमर्यादित आहे. ताओ हा पण अनंत आहे. जरी या चारांपैकी प्रत्येक जण हे जरी अमर्यादित असले तरी पहिले तीन हे चौथ्यावर अवलंबून आहेत.

मानव हे पृथ्वीवर अवलंबुन असतात. पृथ्वी ही वैश्विकशक्तिवर अवलंबून आहे. वैश्विकशक्ति ही ताओवर अवलंबून आहे.

पण ताओ हा कोणावरही अवलंबून नाही.

## ईश्वराकडून निर्मिती (ईश्वरी पुस्तकांच्यानुसार)

१) *"तो जो पृथ्वी व आकाशाचा स्वामी आहे. ज्याने कोणाला पुत्र बनविलेले नाही, साम्राज्यामध्ये ज्याच्याबरोबर कोणीही भागीदार नाही, ज्याने प्रत्येक वस्तू निर्माण केली"* (पवित्र कुराण २५ : २)

२) *परमात्म्याने (ईश्वराने) प्रत्येक प्रजा (सजीव) निर्माण केले.* (पवित्र अथर्व वेद १-१९-७)

३) *ज्याअर्थी तो निर्मितीत निष्णांत आहे. तो तर जेव्हा एखाद्या वस्तूचा संकल्प करतो तेव्हा त्याचे काम फक्त एवढेच की तिला आज्ञा द्यावी की अस्तित्व धारण कर, आणि ती अस्तित्वात येते* (पवित्र कुराण ३६ :८२)

४) *मानवाला त्याने चिखलमातीपासून बनविले आणि जिन्नला अग्नीच्या ज्वालापासून निर्माण केले.* (पवित्र कुराण ५५ : १४)

## काही शास्त्रीय वस्तुस्थिती आणि आकडेवारी (Some Scientific Facts & Figure)

१) प्रकाश हा ३००००० किलोमीटर/प्रति सेकंद या गतिने प्रवास करतो. त्या वेगाने त्याने एका वर्षात प्रवास केलेल्या अंतराला एक प्रकाशवर्ष असे म्हणतात. दुसरा सूर्य (आपल्या सौर मालिकेतील सूर्य सोडून) हा आपल्यापासून सुमारे ४ प्रकाशवर्ष अंतरावर आहे.

२) आपल्याला विश्वाच्या अचूक आकारमानाची कल्पना नाही. असे कित्येक तारे आहेत त्यांचा जन्म जरी कित्येक लाख वर्षापूर्वी झाला असेल. तरी त्यांचा प्रकाश हा आता आपल्याकडे पोहोचतो आहे. म्हणून शास्त्रज्ञ असा तर्क करतात की लाखो वर्षापूर्वी पृथ्वी आणि विश्व यांचा जन्म झाला असेल. तसेच आपल्या विश्वाचा किनारा हा लक्षावधि प्रकाशवर्षे दूर असण्याची शक्यता आहे.

३) वस्तुमान आणि शक्ति (Mass and Energy) ह्या रुपांतरित होतात. शास्त्रज्ञ आईनस्टाईनने ह्या रुपांतराचे नियमन करणारे सूत्र सादर केले. ते पुढीलप्रमाणे आहे.

$E = mc^२$

ज्यामध्येE= (Energy generated)निर्माण झालेली शक्ति

V = (Speed of Light)प्रकाशाची गति

M = (Mass)वस्तुमान

४) आपल्या बुटाच्या तळव्याला चिकटलेल्या धूळीच्या कणाचा आपण आकार मोजू शकतो. त्याचा आकार हा आपण आकड्यामध्ये लिहू शकतो आणि त्याचे आपल्या शरीराशी गुणोत्तर मिळवू शकतो. परंतु आकड्यामध्ये आपण आपल्या विश्वाचे आकारमान वर्णन करू शकत नाही ना आपण आपल्या जगाचे विश्वाशी गुणोत्तर प्रमाण सांगू शकत नाही. विश्वाच्या अफाट आकाराशी तुलना करताना आपले जग हे इतके लहान आहे (म्हणजेच नगण्य आह), त्याचे आपण वर्णन करू शकत नाही. आपल्या बूटाला चिकटलेला धुळीकण आपल्या तुलनेत खुप छोटा आहे. त्याचप्रमाणे विश्वाची व जगाची तुलना केली तर ही पृथ्वी इतकी छोटी आहे कि असुन नसल्यासारखी आहे.

## ईश्वराविषयीचे निष्कर्ष

निरनिराळी धार्मिक पुस्तके, शास्त्रीय शोध, निरीक्षणे व निरनिराळ्या बुद्धिमान लोकांशी चर्चा केल्यानंतर आपण असा निष्कर्ष

काढतो की,

- ईश्वर हा एकच आहे.
- त्याला आकार नाही.
- तो ह्या संपूर्ण सृष्टीपेक्षा मोठा आहे.
- तो ह्या विश्वाच्या मूळ आणि रहस्यमय शक्तिचा उगमस्थान आहे. जे आपण स्पष्टपणे समजु शकलो नाही किंवा व्यक्तही करू शकलो नाही.
- त्याची दृष्टी ही ह्या विश्वाच्या प्रत्येक व सर्व गोष्टीमधून आरपार जाते (हे सर्व विश्व त्याला पारदर्शक आहे.)

## ईश्वराने केलेली निर्मिती

वस्तुमान व शक्ति (Mass and Energy) ह्यांचे रुपांतर होते. ईश्वराने ह्या जगाची उत्पत्ति ही एखाद्या शक्तिपासून केली असावी. कारण जेव्हा त्याला काही निर्माण करावयाचे असते तेव्हा म्हणतो,"होऊ दे." व ती वस्तू त्याची इच्छा व आज्ञा ह्यांच्यानुसार घडून येते. अशातऱ्हेच्या स्पष्ट उत्पादन प्रक्रियेशिवाय झालेला निर्मितीचा प्रकार हा फक्त शक्तिच्या रूपांतरामुळेच शक्य आहे.

## त्याचा सर्वशक्तिमानपणा (His Omnipresence)

### कल्पना क्र. १

जेव्हा आपण टयुबलाईटचे स्विच दाबतो तेव्हा तो प्रकाश पसरवितो. टयुबलाईट हा एक शक्तिचा लहान स्त्रोत आहे. म्हणून टयुबलाईटने फेकलेला प्रकाश हा अत्यंत क्षीण असतो व तो सनग्लासव्दारे (Sun-glass) अडविला जाऊ शकतो. परंतु वेल्डींगमधील (Welding) प्रकाशाच्या शक्तिची पातळी एवढी मजबुत असते कि ती (Sun-glass) ने ही अडवली जात नाही. म्हणुन (Welding) मधुन निघणारे अल्ट्राव्हायोलेट किरण अडविण्यासाठी विशेष प्रकारच्या

काचेची जरुरी असते.

एक्स-रे किरणांची शक्ति पातळी ही त्याहूनही जास्त आहे व ते वेल्डिंग ग्लासनेही अडविले जाऊ शकत नाहीत. तसेच मानवाचे मांसही त्यांना रोखू शकत नाहीत. ते फक्त हाडासारख्या जड पदार्थांनी अडविले जातात.

युरेनियमपासून निघालेले किरणोत्सर्जि किरण(Radioactive rays) ज्यांचा वापर अणुभट्टीमध्ये (Atomic plants) केला जातो. ह्यांची शक्तिची मर्यादा ही इतकी प्रचंड असते की, ते मानवी शरीराची हाडे, लाकडी पार्टिशन्स आणि विटांच्या भिंती इत्यादीच्या मधून आरपार जाऊ शकतात. ही किरणे रोखण्यासाठी ३ फुट जाडीची शिश्याची भिंत बांधावी लागते. म्हणून जितकी शक्तिची पातळी जास्त असते तितकीच किरणांची शक्ति जास्त असते तेवढीच किरणे जास्त खोलवर आत जाऊ शकतात.

मोहिनीविद्येमध्ये (Hypnotism) जेव्हा एखादा खंबीर इच्छाशक्तिचा माणूस हा जेव्हा दुसऱ्या कमी इच्छाशक्ति असलेल्या व्यक्तिच्या डोळ्यात पाहातो, तेव्हा तो दुसऱ्या व्यक्तिच्या कमजोर मेंदूवर ताबा मिळवितो व कमजोर व्यक्ति ही मोहिनीविद्यानिपुण व्यक्तिच्या आज्ञांचे अनुकरण करू लागते.

मी नुसत्या डोळ्यांच्या नजरेने टक लावून टेबलावर नाणे फिरविताना एका व्यक्तिला पाहिले आहे. पुष्कळ योगी आणि ऋषि ज्यांची कुंडलिनी जागृत होते, ते सुद्धा त्यांच्या डोळ्यांच्या नजरेच्या कटाक्षावर वस्तू हलवू शकतात. वरील दोन उदाहरणावरून मी असे समजतो की, प्रकाशाप्रमाणेच माणसाची दृष्टी किंवा नजर ही सुद्धा प्रकाशकिरणांसारखी आहे व त्यामध्ये प्रकाशकिरणांप्रमाणे किंवा विद्युतचुंबकीय लाटा किंवा सूर्यप्रकाश इत्यादि ह्यांच्याप्रमाणे शक्ति आहे जी अजूनही आपण शास्त्रीय दृष्टीकोनातून समजू शकलेलो नाही.

ह्या विश्वात महान ईश्वर हा मूलभूत आणि प्रचंड शक्तिचे उगमस्थान आहे. त्याच्या नजरेला प्रचंड अशा शक्तिची पातळी

आहे, जी ह्या विश्वाची प्रत्येक गोष्ट व सर्वांमधून आरपार जाऊ शकते. किरणोत्सर्गि (Redioactive) वस्तूमधुन प्रकाशकिरण हा शिशाच्या जाड्या भिंतीमुळे अडविला जाऊ शकतो. पण ईश्वराची नजर एवढी शक्तिशाली असते कि कोणीही रोखून धरू शकत नाही. हे सर्व विश्व ईश्वराला पारदर्शक आहे.

ईश्वर म्हणाला,

*"तुम्ही तुमच्या अंतःकरणांत काहीही उघड केलेत वा लपविलेत तरी त्याला(ईश्वराला) त्याची माहिती असते."* (पवित्र कुराण २:२८४ सारांश)

ईश्वर म्हणाला,

*"मी तुमच्या मानेच्या मुख्य रक्तवाहिनीपेक्षा तुमच्या अत्यंत जवळ आहे."* (पवित्र कुराण ५० :१६ सारांश)

तो पुढेही म्हणाला,

*"तुम्हाला तुमच्या स्वतःबद्दल माहिती असण्यापेक्षा मला तुमच्याबद्दल जास्त जाणीव आहे."* (पवित्र कुराण ६७ : १४ सारांश)

त्याची दृष्टी ही आपल्यामधून जात असल्यामुळे आपण ईश्वराला पारदर्शक आहोत. त्याला आपल्या प्रत्येक पेशी न पेशी माहित आहे, आपल्या शरीराचा प्रत्येक अणु व परमाणु त्याला ठाऊक आहे. आपल्या हृदयाचा प्रत्येक ठोका, आपल्या मनातील प्रत्येक विचार ह्यांची ईश्वराला माहिती आहे. खरोखरच तो आपल्या रक्तवाहिन्यांपेक्षा आपल्या जास्तच जवळ आहे. त्याला सर्व गोष्टीचे ज्ञान आहे. या विश्वात आकार घेणारी प्रत्येक घटना त्याच्या आज्ञेनुसारच कधीही आणि कुठेही घडु शकते. म्हणुन तो सर्वत्र उपस्थित आहे असे आपण म्हणु शकतो.

**स्पष्टीकरण क्र. २**

आईनस्टाईनचा दुसरा सिद्धांत असे सांगतो की, जेव्हा एखाद्या वस्तूची गति ही प्रकाशापेक्षा जास्त वाढते उदा. ३००००० किमी/

सेकंद पेक्षा जास्त वाढते तेव्हा त्या वस्तूसाठी वेळ हळुहळु धीमी होते. जास्त चांगल्या तऱ्हेने समजून घेण्यासाठी आपण अंतरिक्षप्रवास विमान व त्याच्या केबीनमध्ये असलेले भिंतीवरील घड्याळ ह्यांचे उदाहरण घेऊ या. असे समजा की अंतरिक्षप्रवास विमानाला प्रकाशाच्या गतीपेक्षा जास्त वेगाने जाण्याची क्षमता आहे व घड्याळ हे त्याच्या केबिनमध्ये भिंतीला घट्ट बसविलेले आहे.

जेव्हा अंतरिक्षविमान हे प्रकाशाच्या वेगाच्यापेक्षा कमी वेगाने प्रवास करते तेव्हा भिंतीवरील घड्याळ हे त्यांच्या नियमित गतीने काम करील. जेव्हा अंतरिक्ष विमानाचा वेग हा प्रकाशाच्या वेगाच्याहि पुढे जातो तेव्हा भिंतीवरील घड्याळ हळूहळू चालू लागते व एका अमर्याद वेगाला (Infinite speed) ते घड्याळ पूर्णपणे बंद पडेल. म्हणजेच त्या विमानातील कोणाचेही वय वाढणार नाही किंवा कोणतीही वस्तु जुनी होणार नाही.

सुरुवातीला असा विचार केला गेला की, प्रकाशाला फक्त सात रंग (Spectrum) आहे. त्यानंतर असा शोध लागला की, दुसऱ्या प्रकारच्या प्रकाशाचे अस्तित्व पण आहे. उदा. इन्फ्रारेड व अल्ट्राव्हायोलेट. त्यानंतर आणखी अन्य प्रकारच्या किरणांचा शोध लागला उदा. एक्स-रे किरण आणि किरणोत्सर्गि मुलद्रव्यांपासून (Radio active elements) निघणारे किरण. ही शोधाची प्रक्रिया अजून संपलेली नाही व अजूनही पुष्कळ प्रकारच्या किरण व लाटा ह्यांचा शोध घेणे बाकी आहे. त्यापैकी काही सर्वसाधारण किरण म्हणजे, दृष्टीचे किरण, विचारशक्तिचे किरण इत्यादि. नजर आणि विचार हे दोन्हीही प्रकाशाच्याच गतीने प्रवास करतात वा त्यापेक्षाही जास्त गती दोघांची असू शकेल.

मन आणि हृदय विद्युतशक्तिवर काम करतात. मनात निर्माण होणारे विचार हे विद्युतशक्तीचाच प्रकार आहेत. म्हणुन एखाद्याच्या मनातील विचार हे दूर असलेल्या व्यक्तिकडे पाठविले जातात. पण अशा तऱ्हेच्या शक्तिचा अजून शोध घेणे बाकी आहे व तिची व्याख्याही करता येत नाही.

वरील शास्त्रीय तपशीलाच्या संदर्भात तत्वज्ञ आणि विचारवंत असे सांगतात की, ईश्वर हा एक तऱ्हेची शक्ति किंवा प्रकाश आहे ह्यात वादच नाही. तथापि त्या (ईश्वराच्या) प्रकाशाची गति व स्वरूप हे अजून ठाऊक नाही. त्याचा वेग कदाचित अमर्यादित (Infinite) असू शकेल. म्हणून समय त्याच्यासाठी थांबला आहे. म्हणून तो त्याच अवस्थेत सुरुवातीपासून अनंतकाळ आहे व त्याच अवस्थेत पुढे ही शाश्वत राहिल. म्हणून तो कधीही जन्माला आलेला नाही वा तो कधीही मरणार नाही.

असे समजा की, विश्वाचा व्यास हा ६००००० किलोमीटर्सचा आहे. त्याच्या मध्यबिंदूपासून सुरू होणारा प्रकाश हा विश्वाच्या टोकाला एका सेकंदात पोहोचेल (३००००० कि.मी./प्रति सेकंद ह्या गतीने)

त्याचप्रमाणे ईश्वराच्या (दृष्टी किंवा प्रकाश) यांनाही अमर्याद गति आहे. तो विश्वातील कोणत्याही ठिकाणी शून्य वेळात जाऊन पोहोचतो. म्हणून तो सर्वठिकाणी सर्व वेळी आहे. म्हणूनच तो सर्वव्यापक (विश्वव्यापक) आहे.

(वरील विधाने विचारवंत व तत्वज्ञ यांची अनुमाने आहेत. ईश्वराबद्दल अचूक माहिती ईश्वराशिवाय कोणालाच नाही)

**आत्मा (The Soul)**

ईश्वराने धूर नसलेल्या (Smokeless fire) आगीपासून जिनची निर्मिती केली. जिन हा विद्युतशक्तिप्रमाणे झटका (शॉक) देऊ शकतो. जिन हा कोणताही आकार धारण करू शकतो. जिन हा मानवप्राण्याचा ताबा घेऊ शकतो. पण जेव्हा ते नियंत्रण करू शकत नाहीत. तेव्हा त्या मानवाला काहीही फरक भासत नाही. पण जेव्हा जिन ताबा घेतात त्यावेळी ती ताबेदार व्यक्ति ही जिनच्या हुकूमानुसार कार्य करते.

जो माणूस प्रत्यक्ष मृत्यूच्या वेळेआधीच एखादा अपघात होऊन

मरतो. अशा मृत व्यक्तिचा आत्मा हा काहीवेळा लोकांना त्रासदायक ठरतो व जिन ज्याप्रमाणे करतात त्याचप्रमाणे तो आत्माही अन्य व्यक्तिंच्या शरीराची मालकी (ताबा) आपल्याकडे घेतो. जिन हे धूर नसलेल्या अग्निपासून बनलेले आहेत. त्याचप्रमाणे मानवी आत्मा हा पण अशा तऱ्हेच्या एखाद्या शक्तिपासून बनलेला असेल.

पवित्र कुराण सांगतो,"आत्मा हा 'अम्रे-रब्बी' आहे" (पवित्र कुराण १७ : ८५) अरेबिक भाषेमध्ये अम्र म्हणजे आज्ञा वा हुकूम; रब्ब म्हणजे ईश्वर. म्हणजेच आत्मा हा ईश्वराची ऑर्डर किंवा कमांन्ड आहे. मी असे समजतो की, मानवाचा आत्मा हा एक प्रकारच्या शक्तिचा प्रकार आहे. जसे आपण कंम्प्युटरला प्रॉग्रॅम करून विषेश काम करून घेतो. त्याचप्रमाने प्रत्येक जीवाच्या निर्मितीपुर्वीच ईश्वराने त्याच्या आत्म्यामध्ये आवश्यक आज्ञांचे योजनाबद्ध (सॉफ्टवेअर) निश्चित केलेले असते.

काही तऱ्हेचे मासे हे पारदर्शक अंडी घालतात. अंडी घातल्यानंतर ते साधारणपणे एक आठवडाभर त्या अंड्यांवर लक्ष ठेवतात. अशावेळी अंड्याच्या विकासाच्या निरनिराळ्या अवस्था ह्यांचे निरीक्षण व व्हिडीओ रेकॉर्डिंग केले जाऊ शकते. त्या आठवड्याच्या शेवटी लहान माशाचे हृदय ठोके देणे चालू करते जे आपण अंड्याच्या बाहेरून पाहू शकतो. पूर्ण वाढ झाल्यावर जेव्हा अंडे फुटते व लहान मासा बाहेर येतो तेव्हा त्याला पोहोणे, शिकार करणे वा लपणे ह्यांची शिक्षण देण्याची जरुरी भासत नाही. माशाला तिच्या जन्माच्यावेळीच सर्व गोष्टी ठाऊक असतात त्याचप्रमाणे अंडे फोडून बाहेर आलेल्या छोट्या कासवाला पण माहित असते की, त्याला सुरक्षित राहाण्यासाठी समुद्राकडे रांगत जावयाचे आहे.

त्या माशाच्या हृदयाचे ठोके कशामुळे चालू असतात? त्यांना लपणे व शिकार करण्याचे शहाणपण कोण देते? त्यांच्या आत्म्यामधील बंदिस्त केलेले व ईश्वराच्या आज्ञा असलेली आज्ञावली (सॉफ्टवेअर) ज्याच्यामुळे ते (मासे) हे जन्मानंतर कुठल्याही शिक्षणाच्या साधनाचा आधार न घेता वागतात व काम करतात (ही माझी वैयक्तिक मते

आहेत. याबद्दल अचुक माहीती ईश्वरालाच आहे).

## माझ्यामधील ईश्वर (The God within me)

हजरत मंसूर हे संत होते. ते संपूर्णपणे ईश्वराची प्रार्थना आणि ध्यान ह्यांमध्ये एवढे गुंतून गेले होते कि त्यांचे स्वत:च्या बोलण्यावरील नियंत्रण सुटले होते. एके दिवशी त्याने म्हटले कि,'अनल हक' ह्याचा अर्थ 'मी ईश्वर आहे' ते असे म्हणाले म्हणुन त्यांना मृत्यूदंडाची शिक्षा झाली व त्यांचे मुंडके उडविले गेले.

ध्यानधारणा आणि असंख्य प्रार्थना ह्यामुळेच अन्य बरेच संत असेच सांगतात,"आत्मा हा परमात्मा आहे किंवा परमात्मा हा त्यांच्यामध्ये आहे." त्याची कारणे पुढे दिलेली आहेत.

- देवदूत हे अन्न ग्रहण करीत नाहीत. त्यांना जेव्हा अशक्तपणा वाटतो तेव्हा ते ईश्वराच्या नावाचे पठण करतात व शक्ति आणि ताकद प्राप्त करून घेतात.

- आत्मा हा एक प्रकारची शक्ति आहे. म्हणून सतत केलेल्या प्रार्थनेमुळे त्यांचे शुद्धीकरण होते व त्यांची शक्ति वाढत जाते. अशा अवस्थेत मानवाला शरीराच्या बाहेरची अनुभूती होते. त्याला त्याचा आत्मा आकाशात प्रवास करीत आहे व प्रकाशातून जात आहे ह्याची जाणीव होते.

- प्रेषितांना ईश्वराच्या आज्ञा ह्या पुष्कळ मार्गानी मिळतात. त्यातील एक मार्ग असा आहे की कोणीतरी त्याच्या हृदयातुन मोठयाने सांगत आहे जेव्हा संत ईश्वराची प्रार्थना करतो आणि काही कृपाप्रसादासाठी विनंती करतो तेव्हा त्याला त्याचे उत्तर त्याच्या अंतःकरणात मिळते. ह्याला 'इलहाम' असे म्हणतात. ईश्वराकडून आलेल्या संदेशवहन शक्तिची पातळी खुपच जास्त असते. म्हणुनच शेवटचे संदेशवाहक मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) ह्यांना जेव्हा पवित्र श्लोक ईश्वराकडुन मिळत होते तेव्हा त्यांना कडाक्याच्या थंडीमध्येसुद्धा घाम फुटत असे. या परिस्थितीत काही शारीरिक,

मानसिक व आध्यात्मिक ताकदीने कमजोर अशा संतांचे स्वतःवरचे नियंत्रण जाते. म्हणुन संताना जेव्हा ईश्वराच्या संदेशवहनाच्या शक्तिचा आभास होतो. तेव्हा काही वेळा ते बेसावध होतात. तर काही वेळा अज्ञानामुळे ते असा दावा करतात की, मी परमेश्वर आहे किंवा ईश्वर माझ्यातच आहे.

जेव्हा प्रेषित मूसा यांनी ईश्वराला उघड्या डोळ्यांनी पाहाण्याचा हट्ट धरला तेव्हा ईश्वर असे म्हणाला की, "*मुसा! तु माझे तेज सहन करु शकणार नाहीस.*" तथापि कायमच्या हटवादीपणामुळे जेव्हा ईश्वराने स्वतःचे स्वरूप थोडेसेच प्रगट केले, तेव्हा प्रेषित मूसा हे बेशुद्ध झाले व तुर पर्वताचे तुकडे तुकडे झाले. मानवप्राणी हे ईश्वराला शारीरिक रुपात बघण्यास अत्यंत कमजोर आहेत. हे अखंड विश्व ज्याचे टोक हे कित्येक लक्षावधि प्रकाशवर्षे दूर आहे ते सुद्धा ईश्वराला मर्यादा घालू शकले नाही. तर मानवप्राणी हा ईश्वराला स्वतःकडे कसा सामावून घेऊ शकेल?

जेव्हा आपले हृदय व आत्मा हा शुद्ध होतो तेव्हा आपल्या हृदयामधून आपण ईश्वराशी थेट संपर्क करू शकतो. जेव्हा आपण त्याची प्रार्थना व विनवणी करतो. तेव्हा आपल्या अंतःकरणात त्याचे उत्तर मिळते. ईश्वर हा आपल्याजवळ आहे पण आपल्यामध्ये नाही.

ईश्वर म्हणाला,

*"मानवप्राण्याला ईश्वराशी थेट संवाद साधणे शक्य नाही. पण फक्त इलहाम किंवा पडद्यामागून किंवा संदेशवाहक ह्यांच्यातर्फेच साधता येईल. ईश्वर हा उदात्त आणि सर्वज्ञानी आहे."* (पवित्र कुराण ४२:५१)

**ईश्वराचा परिवार (Family of God)**

चार आंधळ्या माणसांना हत्तीचे वर्णन करा असे सांगण्यात आले.

पहिल्या आंधळ्याने हत्तीच्या पायांना स्पर्श केला व म्हणतो,"हत्ती हा झाडाच्या खोडासारखा आहे."दुसरा आंधळा हत्तीच्या

शेपटीला स्पर्श करतो आणि सांगतो,"हत्ती हा चाबूकासारखा आहे." त्याचप्रमाणे तिसरा व चौथा आंधळा हत्तीच्या निरनिराळ्या भागांना स्पर्श करतात व त्यानुसार हत्तीचे वर्णन करतात.

आपण सर्वजण त्या चार आंधळ्यांपासून काही वेगळे नाही आहोत. जेव्हा आपल्याला ईश्वराचे वर्णन करा असे सांगितले गेले, आपण त्याला मानवी स्वभावानुसार कुटुंब व मुलगा असे रूप दिले. जसे आपणास असते तसे. कारण आपण आपल्या स्वभावाच्यापलीकडे विचार करू शकत नाही.

हे विशाल विश्व विचारात घ्या आणि ह्या ईश्वराच्या महान राज्यांत आपली बिनमहत्त्वाची उपस्थिती विचारात घ्या. आपले अस्तित्व हे ह्या जगात बुटाच्या तळव्यावर चिकटलेल्या धूळीकणाच्याही इतके तोडीचे नाही. जेव्हा ईश्वराला एखादी गोष्ट निर्माण करावयाची असते तेव्हा फक्त म्हणतो होऊ दे ! व ती गोष्ट ईश्वराच्या इच्छेप्रमाणे आकार धारण करते. जर ईश्वराला पृथ्वीवरील सर्व मानव हे योग्य मार्गाने जावे असे वाटले असते, तर त्याने फक्त 'ज्ञानी व्हा' असे नुसते म्हटले असता पृथ्वीवरील प्रत्येक मानवप्राणी हा थोर गौतमबुद्धाप्रमाणे ज्ञानी झाला असता.

मानवजातीला योग्य मार्ग दाखविण्यासाठी वा शिकविण्यासाठी ईश्वराकडे असा सोपा पर्याय उपलब्ध आहे तर तो स्वतः पृथ्वीवर जन्म का घेतो किंवा त्याच्या पुत्राला पृथ्वीवर का पाठवतो? व त्याच्या अफाट साम्राज्यामध्ये पृथ्वीसारख्या क्षुल्लक ग्रहावर स्वतः वैयक्तिकरीत्या त्रास घेण्याची त्याला गरज आहे का?

आपण म्हणतो की ईश्वराला मुलगा आहे किंवा त्याने पृथ्वीवर जन्म घेतला इत्यादि, कारण आपण ईश्वराची महानता व त्याचे महान साम्राज्य ह्याची कल्पना करू शकत नाही वा समजू शकत नाही. जर आपण त्याला आणि त्याच्या महान साम्राजाला समजून घेतले तर आपण तसे बोलणारच नाही.

जेव्हा सैनिकाची मिलिटरीमध्ये भरती होते, तेव्हा त्याला

प्रशिक्षण घ्यावे लागते आणि तसेच निरनिराळ्या खडतर चाचण्या उदा.उडी मारणे, मारामारी, कुंपणाखालून रांगणे व सूर मारणे इत्यादि ह्या उत्तीर्ण व्हावयास लागतात. ह्या परीक्षा देताना उमेदवाराला ताण, दुःख व थकवा वाटतो पण परीक्षेची प्रक्रिया ही क्लेशदायक आहे. सरकार हे प्रशिक्षक उपलब्ध करते ज्यामुळे शिपायाला परीक्षेसाठी चांगले प्रशिक्षण मिळते. तथापि प्रशिक्षक (Coach) किंवा परीक्षक (Examiner) हे स्वतः ती परीक्षा देऊन त्या शिपायाला पात्र करण्यासाठी कधीही गुंतून जात नाहीत.त्या शिपायाला स्वतःची पात्रता स्वतःच सिद्ध करावी लागते.

हे जग हा एक मानव प्राण्यांसाठी परीक्षेचा हॉल आहे. प्रत्येक मानवाला त्याच्या आयुष्यामध्ये त्याला शाश्वत मुक्ति किंवा स्वर्गप्राप्ति मिळण्यापूर्वी पुष्कळशा परीक्षा द्याव्या लागतात. ही एक क्लेशदायक क्रिया आहे. ईश्वर हा मानवांना योग्य तो मार्ग समजून घेण्यास व परीक्षा उत्तीर्ण होण्यासाठी शिक्षकांना (प्रेषितांना) पाठवून त्यांना मदत करतो. प्रत्यक्ष ईश्वर हा स्वतः कधीच परीक्षेच्या सभागृहात मदत करण्यास येत नाही किंवा त्याच्या शिक्षकांना (प्रेषितांना) वाटेल त्या मार्गाने मदत करण्यास मज्जाव करतो. प्रत्येकाला ही परीक्षा स्वतःच एकट्याने उत्तीर्ण व्हावे लागते. ईश्वर हा परीक्षेच्या निकालाप्रमाणे त्या विद्यार्थ्याचे (मानवाचे) भवितव्य ठरवितो. ज्या कोणीही संत, प्रेषित वा अवतार इत्यादींनी मानवतेची शिकवण दिली हे सर्व मानवप्राणीच होते. ते फक्त योग्य दिशा दाखवू शकतात. ते मुक्ति किंवा स्वर्ग देऊ शकत नाहीत. प्रत्येकाने यशस्वी होण्यासाठी योग्य त्या मार्गानेच चालले पाहिजे. जर आपण ईश्वराला सोडून अन्य कुणाचीही प्रार्थना केली तर ते आपल्याला शाश्वत मुक्ति देऊ शकत नाहीत. कारण ती गोष्ट त्यांच्या हातात नसते. फक्त ईश्वराकडेच अंतिम अधिकार असतात.

आपल्या घरात पुष्कळशी विद्युत उपकरणे असतात. जी एका स्त्रोताकडून २४० व्होल्ट एसी विजेच्या प्रवाहावर काम करतात. त्यांना दुसऱ्या अन्य उगमाकडून दुसरी शक्ति देण्याचा प्रयत्न करा.

उदा. २४० व्होल्ट (D.C Current) प्रवाह. तर काय होईल? सर्व उपकरणे जळून जातील. जर ते दोन प्रकारच्या व दोन शक्तिच्या स्त्रोतावर काम करूच शकणार नाही, तर हे विश्व दोन ते तीन प्रकारची तत्वे किंवा शक्ति स्त्रोत ह्यांच्याबरोबर कसे कार्य करील? दोन प्रकारच्या शक्ति किंवा दोन तऱ्हेची तत्वे ही असूच शकणार नाहीत. ह्या विश्वाच्या सुलभ कार्य चालू राहण्यासाठी नियंत्रण करणारी फक्त एकच शक्ति असावी लागते आणि ती फक्त एकच आहे. ती एकमेव शक्ति म्हणजे ईश्वर होय.

**ईश्वराने मानवप्राण्याची निर्मिती का केली?**(Why God Created humanbeing)

अवतरीत पुस्तकात ईश्वर असे सांगतो,

*"मी मानवप्राणी आणि जिन्न यांची निर्मिती माझ्या भक्तीसाठी केली."* (पवित्र कुराण ५१ : ५६)

ईश्वराची सतत प्रार्थना करणारे लाखो देवदूत आहेत तर असे असताना ईश्वराने मानवप्राणी व जिन्न ह्यांची निर्मिती त्याच्या प्रार्थनेसाठी का केली? कारण देवदूत हे अशा रीतीने निर्माण झालेले आहेत की, त्यांना पाप करण्याची इच्छा नाही, व ते ईश्वराचा आदेश न पाळण्याचा विचार करीत नाहीत. जी गोष्ट करण्यास बंदी आहे अशा गोष्टी ते कधीही करणार नाहीत. तसेच देवदुत हे अन्नग्रहण करीत नाहीत. जेव्हा त्यांना कमजोरपणा वाटतो तेव्हा ते ईश्वराच्या नावाचे पठण व त्याची स्तुति करतात आणि शक्ति प्राप्त करून घेतात.

उलटपक्षी मनुष्य हा कपटी स्वभावाचा आहे. त्याच्या वासनेची तहान कोणीही भागवू शकत नाही. त्याला पाप करणे प्रिय वाटते. त्याच्या गरजेच्या पलीकडे संपत्ति गोळा करण्यासाठी तो सर्व तत्त्वांचा त्याग करतो. पण जेव्हा अशी कपटी स्वभाव व व्यस्त वेळापत्रक असलेली व्यक्ति प्रार्थनेसाठी वेळ काढते व ईश्वरापुढे लोटांगण घालते तेव्हा ती एक महान घटना होते. म्हणूनच परमेश्वर हा

भाविक देवदूतांच्या प्रार्थनांपेक्षा अशा मानवांच्या प्रार्थनांचे जास्त कौतुक करतो.

ईश्वराने सांगितले,

*"आम्ही तुम्हा मानवापैकी प्रत्येकासाठी एकच शरीअत (जीवनाचा कायदा) व एकच कार्यप्रणाली निश्चित केली. जर तुमच्या ईश्वराने इच्छिले असते तर तुम्हा सर्वांना एकच लोकसमुह बनवू शकत होता. परंतु त्याने हे यासाठी केले की जे काही त्याने लोकांना दिले आहे त्यात तुमची परीक्षा घ्यावी. म्हणून चांगुलपणात एक दुसऱ्यापेक्षा सरस ठरण्याचा प्रयत्न करा. सरतेशेवटी तुम्हा सर्वांना ईश्वराकडेच परत जावयाचे आहे, मग तो तुम्हाला सत्यस्थिती दाखवून देईल."* (पवित्र कुराण ५ :४८)

वरील सर्व श्लोकांवरून आपण असा निष्कर्ष काढतो की, ज्या ईश्वरानेच ह्या जगात भिन्न संस्कृति आणि मानवी समुदाय ह्यांची निर्मिती केलेली आहे म्हणून आपण सर्वांनी एका जातीची व धर्माची श्रेष्ठता ही दुसरी जात व धर्म ह्यांच्यावर सिद्ध करून न दाखविता चांगले काम करण्यासाठी मनापासून घाई केली पाहिजे.

# भाग क्र. ७

## अखिल विश्वाची भरभराट

जातीय द्वेष हा मानवाच्या दुःखाचे एक प्रमुख कारण आहे व अज्ञान हेच ह्या जातीय द्वेषाचे मूळ कारण आहे. जेव्हा लोक हे दुसऱ्या धर्माची शिकवण समजून घेत नाहीत तेव्हा ते त्या धर्माच्या लोकांना चुकीचे आहेत असे मानतात व त्यांचा तिरस्कार करतात.

आपल्याला सर्व भरभराट आणि संपत्ति मिळाली तरीही आपल्याला या हिंसात्मक जगात आपण सुखी आहोत असे वाटणार नाही. म्हणून ह्या विश्वाच्या उत्कर्षासाठी व आपल्या मनशांतीसाठी आपण शांतता आणि सहनशीलता हा संदेश ह्या जगात पसरवूया. या पुस्तकाचा शेवटचा भाग हा मी विश्वाच्या भरभराटीसाठी अर्पण केला आहे.

आपण थोडक्यात निरनिराळ्या धर्माच्या श्रद्धा (वा निष्ठा) ह्यांचा अभ्यास करू. त्याचप्रमाणे ह्या विश्वात प्रेषितांचे अवतार घेण्याची सर्व पद्धत, नवीन धर्माची ओळख व मानवतेची शिकवण ह्या साऱ्या गोष्टी समजून घेणार आहोत.

*प्रकरण क्र. ४२*

# निरनिराळ्या धर्माचे आकलन

(Understanding Various Religions)

**सर्व धर्मांची मूलभूत रचना (Basic Structure of all Religions)**

सर्व धर्मांमध्ये बऱ्याचशा गोष्टी ह्या समान आहेत व काही बाबतीतच मतभिन्नता आहे, ज्या प्रत्येक वैयक्तिक धर्मात खास करून असतात. म्हणून सर्व प्रथम आपण सर्व धर्मांत समान गोष्टी काय आहेत. त्यांचा अभ्यास करू म्हणजे त्यांचा वारंवार उच्चार करण्याची गरज भासणार नाही.

**१) स्वर्ग (Heaven)**

सर्व धर्मांचा असा विश्वास आहे की, जे ईश्वरावर श्रद्धा ठेवतात, ज्यांची जीवनातील वागणूक चांगली असते, जे पाप करणे टाळतात, दानधर्म करतात आणि नियमितपणे प्रार्थना करतात ते मरणानंतर नक्कीच स्वर्गलोकात जातील. स्वर्गातील विलासी आयुष्य हे मानवप्राण्यांच्या कल्पनेच्याही पलीकडचे आहे.

**२) नरक (Hell)**

सर्व धर्म असे मानतात की, जे पापे करतात, ध्येयविरहित जीवन जगतात, वाईट मार्गांनी पैसा कमवितात, अन्य मानवांना त्रास देतात व प्रार्थना करीत नाहीत इत्यादि. अशा लोकांना अग्निच्या तुरुंगात शिक्षा दिली जाते ज्याचे नाव नरक आहे.

### ३) न्याय निवाड्याचा दिवस (The Judgment day)

सर्व धर्मांचा असा विश्वास आहे की, एखाद्या दिवशी सर्व जगाचा विनाश होईल. हिंदू धर्मामध्ये त्या दिवसाला प्रलय असे म्हणतात.

### ४) वागणूकीचे नियम (Code of Conduct)

पुढील वागणूकीचे नियम हे सर्व धर्मात सारखे आहेत.

**काय करू नये**

१) अन्य निष्पाप माणसांना छळणे व ठार मारणे

२) जबरदस्तीने दुसऱ्याच्या मालमत्तेचा कब्जा घेणे

३) अनैतीक लैगिक संबध (व्यभिचार)

४) खोटे बोलणे

५) चोरी करणे व लाच देणे, घेणे

६) जुगार

७) भौतिक व चैनीच्या जीवनात पूर्णपणे रमून जाणे

**काय करावे**

१) स्वच्छता आणि वैयक्तिक आरोग्य

२) नियमित दानधर्म आणि गरीबांना अन्न देऊन पोषण करणे

३) सहनशीलता व अहिंसा

४) खरेपणा

५) ईश्वरावर श्रद्धा आणि नियमित प्रार्थना

६) मानवतेच्या योग्य मार्गावर चालणे व इतरांनाही तसा उपदेश करणे

## न्याय निवाड्याचा दिवस (The Judgment day)

## शास्त्रीय तपशील व आकडेवारी (Scientific Facts and Figure)

सूर्यामध्ये सतत एकत्रीकरणाची (Fusion) प्रक्रिया चालू असते. हेलियम वायूचे दोन अणु एकत्र येतात व एक जोडउत्पादन तयार करतात. या प्रक्रियेमध्ये प्रकाश आणि उष्णता(Light & heat)निर्माण होते. जी पृथ्वीला व अन्य ग्रहांना मिळते. तेल आणि पेट्रोल हे पृथ्वीच्या अंतःर्भागात मर्यादित प्रमाणात आहेत व काही कालावधिनंतर त्यांचा साठा संपून जाईल, त्याचप्रमाणे हेलियम वायु हा सूर्यामध्ये मर्यादित स्वरुपात आहे व तो काही काळानंतर संपुष्टात येईल. शास्त्रज्ञांचा असा तर्क आहे की, त्या गोष्टीला खूप वेळ लागेल पण ते केव्हा होईल ह्याचे कोणीही आगाऊ भविष्य वर्तवू शकत नाही.

जेव्हा हेलियम हा संपून जातो व एकत्रीकरण थांबते, तेव्हा सूर्य हा थंड होत जाण्यास सुरुवात होईल आणि सूर्य व त्याभोवतालच्या अन्य ग्रहांच्या नाशाची क्रिया चालू होईल. एकत्रीकरणाची क्रिया थांबल्यानंतर सुर्य हा थंड होऊन त्याचे रूपांतर गुलाबी रंगाच्या गॅसच्या बॉलमध्ये (चेंडुमध्ये) होईल. तसेच हळुहळु गॅसच्या चेंडुचा आकार एवढा वाढेल कि त्यात मंगळ, बुध, शुक्र, पृथ्वी व पृथ्वीच्या पलीकडील ग्रहांचा समावेश होईल. तो अशा स्थितीत प्रदीर्घ काळ राहिल व त्यानंतर आकुंचन पावण्यास सुरुवात करील आणि नंतर घनरूप पदार्थ किंवा Black holes बनेल. जेव्हा सुर्यातील गॅस हा पृथ्वीला गिळतो, त्यावेळी पृथ्वीवर कुठेही अंधार राहणार नाही व सतत दिवसासारखे वातावरण पुष्कळ काळासाठी टिकुन राहील.

पृथ्वी ही आपल्या गुरुत्वाकर्षणाच्या शक्तिमुळे सर्व वस्तू आपल्या केंद्रबिंदूकडे आकर्षून घेते. जेव्हा प्रचंड सूर्याचा गोळा हा पृथ्वीला गिळतो, तेव्हा सूर्याची गुरुत्वाकर्षणाची शक्ति ही पृथ्वीच्या गुरुत्वाकर्षणाच्या दाबाला तोलून धरील किंवा त्याला तटस्थ करील व त्यामुळे पृथ्वीवरील सर्व वस्तू ह्या जसे अंतराळवीरांना आकाशात वजनविरहित वाटते तशा वजनविरहित वाटतील. त्यामुळे पृथ्वीवर प्रत्येक गोष्ट ही तरंगू लागेल किंवा पुढे लोटली जाईल. ज्याप्रमाणे

रॉकेटच्या कॅबिनमधील वस्तू तरंगतात किंवा ढग आकाशात तरंगतात. त्याप्रमाणे पृथ्वीवरील प्रत्येक गोष्ट ही तरंगू लागेल.

• १३ फेब्रुवारी २००७ साली नासाने एक छायाचित्र (बातमीपत्र क्र. एस टी एस एल २००७-०९) "सूर्यासारख्या दिसणाऱ्या रंगीत ताऱ्याचा अंत" ह्या शीर्षकाखाली प्रसिद्ध केले होते. (या पुस्तकाच्या मागील Back cover page वरील छायाचित्र पाहावे)

नासाच्या हबल स्पेस टेलिस्कोपने हे छायाचित्र घेतले होते ते सूर्यासारख्या दिसणाऱ्या ताऱ्याचे रंगीत अंतिम यात्रा (Last hurrah) दाखविते; ज्याचे शास्त्रीय नाव हे एनजीसी २४४० आहे. त्या ताऱ्याचा गॅस बाहेर पसरत आहे. ज्यामुळे ताऱ्याच्या उरलेल्या भागाभोवती रेशीमकीड्याच्या कोशासारखे आवरण तयार झाले. त्या मरणाऱ्या ताऱ्यामधील वस्तु अल्ट्राव्हायोलेट किरणांनी चमकतात. छायाचित्राच्या मध्यभागी जो पांढरा ठिपका आहे तोच जळलेला तारा आहे. आपला सूर्य देखील असाच संभाव्यपणे जळून जाईल. छायाचित्रांतील रंग हे ताऱ्यातील वस्तु जळाल्याने बाहेर दिसतात. निळा रंग हा हेलियम, हिरवा हा ऑक्सीजन व लाल रंग हा नैट्रोजन व हैड्रोजन ह्यांच्या ज्वलनामुळे हे रंग दिसतात.

एन जी सी २४४० वरील छायाचित्र व जास्त माहितीसाठी खाली दिलेली वेबसाईट पहा.

http:/hubblesite.org/news/२००७/०९

## धार्मिक पुरावे आणि आकडेवारी

१) **न्यायनिवाड्याचा दिवस कधी येईल ते फक्त ईश्वरालाच ठाऊक असते.** (पवित्र कुराण ७:१८७)

२) न्यायनिवाड्याच्या दिवशी आकाश हे गुलाबासारखे गुलाबी रंगाचे असेल. (पवित्र कुराण ५५:३७)

३) (पृथ्वीचे गुरूत्वाकर्षण नष्ट होईल आणि) डोंगर हे ढगांप्रमाणे किंवा कापसासारखे तरंगतील. (पवित्र कुराण ७०:९)

४) **न्यायनिवाड्याचा दिवस म्हणजेच कयामतीचा दिवस हा ५०००० वर्षांच्या बरोबरीचा असेल. (५०००० वर्षे पृथ्वीवर कोठेही रात्र होणार नाही)** (पवित्र कुराण ७०:४ सारांश)

५) (न्यायनिवाड्याच्या दिवशी सूर्य हा डोक्यांच्या जरा वरती असेल आणि) पृथ्वी ही तापलेल्या तांब्याप्रमाणे तांबडी असेल. (पवित्र कुराण ७०:८)

६) **न्यायनिवाड्याच्या दिवशी ईश्वर हा प्रत्येक माणसाच्या हिशेबाचे खाते (पाप व पुण्य) तपासून बघेल व त्याचे वा तिचे काम आणि केलेली कृति ह्यांवर त्यांच्या नशीबाचा फैसला करील.**

## निष्कर्ष : (Conclusion)

• धार्मिक पुस्तकांत प्रलयाच्या दिवसाचे जे वर्णन केलेले आहे, आज शास्त्रीय पुरावे तेच सिद्ध करतात.

## जैन धर्म

• जैन धर्माच्या परंपरानुसार जो धर्माचा उपदेश करतो त्यांना तीर्थंकर असे म्हणतात. वर्धमान महावीर (५९९ बी.सी. ते ५७२ बी.सी.) हे जैनांचे चौवीसावे तीर्थंकर होते.

• वर्धमान महावीर हे सिद्धार्थ आणि त्रिशाला ह्यांचे पुत्र होते. व त्यांच्यापुढे आयुष्यांतील सर्व सुखे हात जोडून उभी होती. तथापि किचकट धार्मिक विश्वास, बळी परंपरा व अंधविश्वास, जातीच्या पायावर आधारलेले भेदाभेद व समाजातील घसरलेली तत्त्वे ह्यामुळे वर्धमान हे समाधानी नव्हते. म्हणून त्यांनी घर सोडले व ध्यानसाधनेसाठी दूर निघून गेले. वीस वर्षांच्या ध्यानसाधनेनंतर त्यांना खरे ज्ञान प्राप्त झाले.

• त्यांनी जगाला खालील पाच तत्वे दिली ज्यांना पंचमहाव्रते म्हणतात. पंचमहाव्रते त्याचा अर्थ पाच महान प्रतिज्ञा किंवा वचने होय.

१) **अहिंसा** म्हणजे कोणीहि कधी हिंसा करू नये. कोणत्याहि

सजीव प्राण्याला छळू नये किंवा ठार मारू नये.

२) **सत्य** (खरेपणा) म्हणजे प्रत्येकाने नेहमी संभाषण करतांना आणि वागतांना खरेपणाचा अवलंब केला पाहिजे.

३) **अस्तेय** म्हणजे कोणीहि दुसऱ्याच्या मालकीची वस्तू हिरावून घेऊ नये.

४) **ब्रह्मचर्य** म्हणजे प्रत्येकाने स्वच्छ पवित्र आयुष्य (वैषयिक नव्हे) जगले पाहिजे.

५) **अपरिग्रह** म्हणजेच आपल्या गरजेपेक्षा जास्त कोणत्याहि गोष्टीचा साठा करू नये.

- सामान्य माणसांना त्यांची तत्वे नीट समजावण्यासाठी त्यांनी खालील नियम आखून दिले ज्यांना मूळगूण असे म्हणतात.(वागणूकीचे मूलभूत नियम)

१) कोणीहि मांसाहार करू नये.

२) कोणीहि मद्यपान करू नये.

३) कोणत्याहि सजीवाला हानी पोहोचता कामा नये.

४) कधीही खोटे बोलू नये.

५) कधीही चोरी करू नये.

६) स्त्रियांना नेहमी मान दिला पाहिजे.

७) वस्तू आणि अन्नधान्य ह्यांचा कधीही साठा करू नये.

- वर्धमान महावीर यांनी त्रि-रत्नांचही वर्णन केले आहे, ज्यांचे प्रत्येकाने आचरण केले पाहिजे. (त्रि-रत्न म्हणजे तीन रत्ने)

१) सम्यक चरित्र म्हणजे योग्य वागणूक

२) सम्यक दर्शन म्हणजे योग्य तत्वज्ञान

३) सम्यक ज्ञान म्हणजे योग्य ज्ञान.

• वर्धमान महावीरांनी अहिंसेचा जोरदार प्रचार केला, त्यांनी जातिभेद नाकारले. तसेच त्यांनी असे घोषित केले की, स्त्रियांना प्रायश्चित्त घेणे, ज्ञान प्राप्त करणे व सर्वसंगपरित्याग करणे ह्यांचा अधिकार आहे.

महावीरांची मुख्य शिकवण ही सर्व सजीवांवर प्रेम करणे ही होती. दया आणि संयम ठेवा. स्वतः जगा व दुसऱ्यांना जगू द्या.

**बुद्ध धर्म**

१) गौतम बुद्धाचे खरे नाव सिद्धार्थ असे होते (५६३ ते ४८७ बी.सी.). त्याच्या वडिलांचे नाव शुद्धोधन व आईचे नाव मायादेवी होते. त्याच्या पत्नीचे नाव यशोधरा व मुलगा राहुल. ते एक राजकुमार होते व त्याच्या तरुणपणापर्यंत ते एका सर्व दुःखे आणि अश्रू ह्यांपासून दूर असलेल्या अशा एका आलिशान राजवाड्यात राहात होते. तथापि जेव्हा ते सामान्य नागरिकांच्या संपर्कात आले तेव्हा मानवी जीवनातील दुःखाश्रु पाहून त्यांचे मन अस्वस्थ झाले. मानवजातीला ह्या दुःखापासून दूर करण्याची ईच्छा त्यांच्या मनात निर्माण झाली. त्यांनी ध्यानसाधनेसाठी घर सोडले आणि १२ वर्षाच्या ध्यानसाधनेनंतर गया येथे त्यांना खरे ज्ञान मिळाले.

२) गौतमबुद्धांना जीवनातील चार सत्याची जाणीव झाली, ती चार सत्ये पुढील प्रमाणे :-

- दुःख
- अश्रूंचे (दुःखाचे) कारण
- दुःख निवारण करण्याची शक्यता
- दुःख दूर करण्याचा मार्ग

३) प्रत्येक मानवाला जीवनात दुःख हे सहन करावेच लागते. कारण मानव हा बऱ्याच गोष्टींची हाव धरतो व जेव्हा त्याला त्या गोष्टी मिळत नाहीत तेव्हा तो दुःखी होतो. म्हणून दुःखावर विजय

मिळविण्यासाठी एखाद्याला त्याच्या आवडीच्या गोष्टी मिळविण्याच्या इच्छेवर ताबा ठेवावा लागतो. शुद्ध वागणूक हा इच्छेवर नियंत्रण करण्याचा व दु:खावर विजय मिळवण्याचा एक मार्ग आहे.

४) गौतमबुद्धांनी अष्टांगमार्गाचा (आठ कलमी कार्यक्रम) ह्याचा शुद्ध वागणूक व दुःखावर जय मिळविण्यासाठी प्रचार केला

- सुयोग्य वृत्ति (Proper attitude)
- संतुलित विचारसरणी (Balanced thinking)
- संतुलित बोलणे (Balanced speech)
- योग्य क्रिया (Proper action)
- योग्य उपायांनी उपजीविकेसाठी कमाई
(Earning liveli hood through proper means)
- योग्य व्यायाम (Proper exercise)
- योग्य स्मरणशक्ति (Proper memory)
- योग्य समाधि (Proper Samadhi)

५) गौतमबुद्धाने वागणूकीच्या संबंधी पाच नियमांचा प्रचार केला. ज्यामुळे लोकांना अष्टांगमार्गाचे अनुकरण करण्यास त्यांची मदत झाली.

१) अहिंसा (Non-violence)

२) दुसऱ्याच्या मालकीचे आहे ते घेण्यापासून परावृत्त राहाणे (अस्तेय)(Refraining from taking what belongs to others)

३) वैषयिक इच्छांवर नियंत्रण (Control over carnal desires)

४) खरेपणा (Truthfulness)

५) मादक पदार्थ न घेणे (Not taking intoxicants)

ह्या वरील पाच नियमांना पंचशील असे म्हणतात.

## हिंदू धर्म

हिंदू धर्म हा जगातील सर्वात जुना असा धर्म आहे. तो सुमारे ४००० वर्षे जुना आहे. ह्या धर्मात पुष्कळ धार्मिक पुस्तके व धार्मिक व्यक्ति आहेत. अगदी सहज सोप्या शब्दांत आपण हिंदु धर्माची ओळख खालीलप्रमाणे करून देऊ शकतो.

- हिंदू धर्माचे मूळ नाव हे सनातन धर्म आहे.
- अन्य धर्मात असल्याप्रमाणेच हिंदू धर्मात नरक, स्वर्ग आणि न्यायनिवाडा दिवस (प्रलय) ही संकल्पना आहे.
- वेद जे हिंदुधर्माची पवित्र आणि अस्सल किंवा विश्वसनीय धार्मिक पुस्तके आहेत. ही धार्मिक पुस्तके ईश्वराचे वर्णन अशाप्रकारे करतात. तो एकमेव आहे, तो आकाररहीत आहे. त्याने जन्म घेतलेला नाही व कोणालाही जन्म दिलेला नाही. व त्याच्यासारखा दुसरा अन्य कोणीही नाही.
- हिंदूधर्मामध्ये पुष्कळ धार्मिक पुस्तके आहेत. आपण त्यांचे पुढीलप्रमाणे वर्णन करू या :-

हिंदू धर्मातील पुस्तकांचे मुख्यतः दोन प्रकारात विभाजन केले गेले आहे.

### १) श्रुति २) स्मृति

श्रुति म्हणजे जे प्रगट झालेले, ऐकलेले आहे, ज्यांचे आकलन झालेले आहे व ज्यांना समजून घेतले गेलेले आहे.

बुद्धिवंताच्या मते श्रुति हे ईश्वराकडुन आलेले आहेत. ते ईश्वराचे शब्द आहेत व अत्यंत पवित्र आहेत. त्यांचे वेद आणि उपनिषदे, असे भाग केलेले आहेत. वेद हा शब्द मूळ संस्कृत विद्या म्हणजे ज्ञान ह्यापासून निर्माण झाला आहे. वेद म्हणजे अत्यंत उच्च कोटीचे ज्ञान.

एकूण वेद चार आहेत.

१) ऋग्वेद - ज्याचा ईश्वराच्या प्रार्थनेशी संबंध आहे.
(Deals with songs of Praise)

२) यजुर्वेद - हा त्यागाच्या सूत्रांशी संबंधित आहे.
(Deals with sacrificial formulae)

३) सामवेद - हा ध्वनिमाधुर्य वा गोडवा दर्शविणारा आहे.
(Deals with Melody)

४) अथर्ववेद - ह्याचा संबंध मंत्र-तंत्र सूत्रांशी आहे.
(Deals with magical formulae)

हे चारही वेद अत्यंत विश्वसनीय व पवित्र पुस्तके असून अंदाजे ४००० वर्षापूर्वीचे आहेत.

- सुमारे २०० पेक्षा जास्त उपनिषदे आहेत.
- स्मृति म्हणजे आठवण म्हणजे जे लक्षात ठेवलेले असते ते. त्या वेद आणि उपनिषदे ह्यांच्यापेक्षा कमी धार्मिक आहेत व त्यांचा उगम हा स्वर्गीय नाही. त्यांचे लिखाण मानवांनी केलेले असून त्यात आयुष्य कसे घालविले पाहिजे ह्याचे मार्गदर्शन केलेले आहे. त्यांचा उल्लेख 'धर्मशास्त्र' असाही केला जातो. स्मृतिमध्ये आपल्याला इतिहास किंवा महाकाव्य मिळते. अशी दोन महान महाकाव्ये आहेत.

**१) रामायण २) महाभारत**

रामायण ह्याचा संबंध श्रीरामचंद्राच्या कथेशी आहे. तर महाभारतात दोन चुलत घराण्यांमधील म्हणजे कौरव आणि पांडव ह्यांच्या संघर्षाची कथा आहे. महाभारतामध्ये भगवान श्रीकृष्णाच्याही कथा आहेत.

- भगवद्गीता म्हणजे श्रीकृष्णाने अर्जुनाला युद्धभूमीवर दिलेला उपदेश आहे. तो ही महाभारताचाच एक भाग आहे त्यामध्ये २५ पासून ४२ पर्यंत एकुण १८ प्रकरणे आहेत.

• हिंदू पवित्र ग्रंथामध्ये दुसरी स्मृति म्हणजे पुराण. ज्यामध्ये देवदेवता ह्यांच्या कथा ह्या विश्वाची निर्मिती ह्यांचा समावेश आहे. महर्षि व्यासांनी त्यांची रचना केली असून ते १८ भागांमध्ये आहे. सर्व पुराणात अत्यंत प्रसिद्ध भविष्य पुराण हे आहे. ह्याचा संबंध भविष्याशी आहे.

वेद हे जास्त खरे असून जेव्हा पुस्तकांमध्ये कधीही विसंगति निर्माण होते तेव्हा वेदांचे अनुकरण केले जाते.

• तिसऱ्या प्रकारची स्मृति म्हणजे मनुस्मृति. जी जीवनासंबंधीचे नियम ह्यांच्याशी संबंधित आहे व तिची रचना मनूने केली आहे.

• जसे कुराण, बायबल आणि तोहरा हे जीवनाच्या नियमांचे वर्णन करतात व त्यांचा संबंध अनुक्रमे प्रेषित मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) येशुख्रिस्त व मॉसेस ह्यांच्याशी आहे. त्याचप्रमाणे मनुस्मृति ही आयुष्याच्या नियमांचे वर्णन करते व तिचे नाते मनूशी आहे. म्हणून हिंदू लोक हे मनूचे अनुयायी असे मानले जाते (किंवा महानोह वा नोह हजरत नूह (अलैहि सलाम)

• इतर धर्मांशी तुलना करताना हिंदू धर्माची पुस्तके ही जास्त प्रसिद्ध नाहीत व लोकांकडून ती वाचली जात नाहीत. त्यामुळे वेदांमध्ये वर्णन केलेली खरी श्रद्धा व ईश्वराची संकल्पना आणि धर्माबाबत लोकांच्या मनात असलेली श्रद्धा व ईश्वराची संकल्पना ह्या दोन्हीमध्ये खूप मोठी दरी आहे.

• हिंदू धर्माचे दोन अत्यंत प्रसिद्ध उत्सव म्हणजे दसरा आणि दिवाळी. दसरा हा श्रीरामचंद्राचा रावणावरील विजय म्हणून साजरा केला जातो आणि चौदा वर्षे वनवासात राहून ज्यादिवशी श्रीराम आपली राजधानी अयोध्या येथे परत आले त्या दिवसाची आठवण म्हणून दिवाळी ही साजरी केली जाते.

**ख्रिश्चन धर्म**

• मेरी ही प्रेषित जकरिया यांची पुतणी होती. ती अत्यंत धार्मिक होती व जास्तीत जास्त वेळ प्रार्थना म्हणण्यांमध्ये गर्क असे.

ती अविवाहित होती. देवदुत गॅब्रियल हे तिच्याकडे आले आणि तिला अशी बातमी दिली की तिच्या पोटी येशू ख्रिस्त जन्माला येईल. ४ बी.सी. मध्ये जुडिआचे बेथीलेनने जेरूसलेमपासून ९-७ किलोमीटर अंतरावर आहे. तेथे येशुचा जन्म झाला.

- प्रेषित जॉन दी बाप्टिस्ट हे जॉर्डन नदीवर लोकांना ख्रिस्ती धर्माची दीक्षा देत होते. वयाच्या ३० व्या वर्षी येशू प्रेषित जॉन यांच्याकडे दीक्षा (Baptized) घेण्यासाठी गेले. ज्यावेळी प्रेषित जॉन हे येशूला धर्माची शिकवण देत होते, त्यावेळी त्यांनी येशूला मसिहा म्हणून ताबडतोब ओळखले. ज्याची भविष्यवाणी त्यांनी खूप पूर्वी केली होती. ह्या प्रसंगी पवित्र चैतन्य (Holy Spirit) स्वर्गातून खाली आले व त्यांनी येशूला साथ दिली. चाळीस दिवसाच्या उपवास व प्रार्थना ह्यानंतर येशु हे लोकांना परमेश्वराच्या संदेशाचा उपदेश करू लागले.

- आपला संदेश पसरविण्यासाठी येशूने १२ शिष्य निवडले. शिष्य जुडास इस्कॉरिऑट ह्याने येशूला धोका दिला. त्यामुळे रोमन्सनी येशूला कैद केले.

- रोमन गव्हर्नर पॉंटियस पिलेट ह्याने येशु निर्दोष असतानाही खोट्या आरोपाखाली त्यांना सूळावर (क्रॉसवर) चढविण्याची आज्ञा दिली. ख्रिश्चन लोक असे मानतात की येशूला गोलगोथा या ठिकाणी क्रुसावर खिळे ठोकून ठार मारण्यात आले. त्यानंतर तीन दिवसानंतर येशू पुन्हा जिवंत झाले, पृथ्वीवर चाळीस दिवस राहिले व शेवटी स्वर्गलोकात गेले.

- ख्रिश्चन लोक असे मानतात की, येशु ख्रिस्त हा परमेश्वराचा मुलगा आहे. येशु ख्रिस्त पवित्र चैतन्य आणि ईश्वर असे मिळून एक महान शक्ति तयार होते. ज्याला आपण ईश्वर म्हणतो, जो ह्या विश्वाचा नियंत्रक आहे.

- ख्रिश्चनांच्या श्रद्धेनुसार सर्व मानवप्राणी हे पापी आहेत. आणि ख्रिस्ताने स्वतःला क्रुसावर फाशी चढवून घेतले आणि सर्व मानवप्राण्यांच्या वतीने शिक्षा करून घेतली.

- ख्रिश्चनांचा अन्य धर्मीयांप्रमाणे स्वर्ग, नरक आणि न्यायनिवाडा दिवस ह्यांवर पूर्ण विश्वास आहे. नाताळ (ख्रिसमस) हा येशु ख्रिस्ताचा वाढदिवस म्हणून साजरा केला जातो. गुडफ्रायडे हा येशुंना सुळावर चढवण्याचा दिन म्हणुन स्मरण केला जातो. तर इस्टर हा ज्या दिवशी येशु हे पुन्हा जिवंत झाले त्या दिवसाला साजरा केला जातो. तो दिवस म्हणजे गुड फ्रायडेचा तिसरा दिवस होय.

- येशु ख्रिस्ताने आपल्या आयुष्यात काही लिहिले नाही वा आपल्या पश्चात काही लेखी कागदपत्र वा पुस्तक ठेवले नाही. पृथ्वीवरून त्यांचे गमन झाल्यानंतर सुमारे ६० ते १०० वर्षांनी त्याच्या अनुयायांनी त्यांच्या शिकवणीची नोंद केली.

- पवित्र बायबल हे सामान्यपणे दोन प्रकारात विभागले जाते.

**न्यू टेस्टामेंट व ओल्ड टेस्टामेंट.**

- न्यू टेस्टामेंटमध्ये प्रामुख्याने चार पुस्तके समाविष्ट असून त्यांची नावे मॅथ्यू, मार्क, लूक व जॉन अशी आहेत त्यांना गॉसपेल्स असेही म्हणतात. ह्या चार पुस्तकांशिवाय येशु ख्रिस्ताचे ह्या जगामधून गमन झाल्यानंतर काही दशकानंतर त्याच्या शिष्यांनी लिहिलेल्या आणखी २३ पुस्तकांचा न्यू टेस्टामेंटमध्ये समावेश आहे.

- गॉसपेल्स हे मुख्यतः येशु ख्रिस्त, त्याचे जीवन आणि त्याची शिकवण ह्याचे वर्णन करतात.

- ओल्ड टेस्टामेंटमध्ये मुसांच्या ५ पुस्तकांचा समावेश आहे (फक्त अपोक्रायफा सोडून) पण त्यातील अनुक्रमाणिका (वा मजकूर) हा अशा निराळ्या रितीने मांडणी केलेला आहे की त्यामुळे ३९ पुस्तकाचे संकलन निर्माण झाले आहे. सुरुवातीला ओल्ड टेस्टामेंट हे हेब्र्यु आणि आरमाईक भाषांमध्ये होते.

## अन्य धर्मांच्या पुस्तकांमधील येशुखिस्ताचे वर्णन

येशु खिस्त हे एक महान व्यक्ति होते. अन्य धर्माचे लोक पण त्याच्यावर श्रद्धा ठेवतात व त्यांना प्रेषित म्हणून मान देतात. हिंदू धर्माच्या भविष्य पुराणामध्ये आपल्याला येशु खिस्ताचे वर्णन सापडते. तसेच पवित्र कुराणात ईश्वर येशू खिस्ताचे पंचवीस वेळा वर्णन करतो. त्यापैकी एक पुढीलप्रमाणे आहे.

- "जेव्हा मरयम आपल्या लोकांपासून अलिप्त होऊन पुर्व दिशेस एकांतवासिनी झाली होती. या स्थितीत आम्ही तिच्याजवळ आमच्या देव दुतांस पाठविले आणि तो तिच्यासमोर एका पूर्ण मानवाच्या रुपात प्रकट झाला.

- मरयम अकस्मात उद्‌गारली, "जर तु एखादा ईशपरायण मनुष्य आहेस तर मी परमदयाळू ईश्वराचे आश्रय मागते तुझ्यापासुन."

- देवदुताने सांगितले, "मी तर तुझ्या पालनकर्त्याचा प्रेषित आहे आणि यासाठी पाठवला गेलेलो आहे की तुला एक निर्मळ मुलगा द्यावा."

- मरयमने सांगितले "माझ्याठायी कसा मुलगा होईल मला तर कोणत्याही पुरुषाने स्पर्शदेखील केलेला नाही आणि मी काही व्यभिचारिणी नाही."

- दुताने सांगितले, "असेच घडेल." तुझ्या पालनकर्त्याने असे सांगितले की असे करणे माझ्यासाठी फार सोपे आहे आणि आम्ही असे यासाठी करु त्या मुलाला लोकांसाठी एक संकेत (चिन्ह) बनवावे, आणि आपल्याकडुन एक कृपा. आणि हे काम होणारच आहे.

- मरयमने त्या मुलाचा गर्भधारण केला. आणि ती तो गर्भ घेऊन एका दूरवरच्या ठिकाणी गेली.

- मग प्रसुती वेदनेने तिला खजुरीच्या झाडाखाली पोहचविले. ती म्हणु लागली, "मी यापुर्वीच मेले असते आणि माझा मागमुसही उरला नसता."

- दुताने चरणाकडून हाक मारुन तिला सांगीतले,"दु:ख करु नकोस,

तुझ्या पालनकर्त्याने तुझ्याखाली एक झरा प्रवाहीत केला आहे. आणि तू थोडे या झाडाच्या खोडाला हलव, तुझ्यावर ताज्या रसाळ खजुरी पडतील. तर तू खा आणि पी आणि आपले डोळे थंड कर,

- मग जर तुला एखादा मणुष्य दृष्टीस पडला तर त्याला सांग की मी परमद्याळूसाठी उपवासाचे व्रत केले आहे, म्हणुन मी आज कोणाशीही बोलणार नाही."

- मग ती त्या मुलाला घेऊन आपल्या लोकांत आली. लोक म्हणु लागले, "हे मरयम, हे तर तू मोठे पाप केलेस.

- हे हारुनच्या भगिनी तुझा बापही काही वाईट मणुष्य नव्हता आणि तुझी आईदेखील काही व्याभिचारिणी नव्हती."

- मरयमने मुलाकडे इशारा केला. लोकांनी सांगीतले,"आम्ही याच्याशी काय बोलावे जे पाळण्यात असलेले मूल आहे?"

- मुल उद्गारले, "मी ईश्वराचा दास आहे. त्याने मला ग्रंथ दिला आणि प्रेषित बनविले, जेथे कोठे मी असेन, आणि आपल्या आईसंबधी करणारा बनवले. आणि मला दुर्वर्तनी आणि कठोर बनवले नाही.

- सलाम आहे माझ्यावर जेव्हा मी जन्मलो आणि जेव्हा मी मरेन आणि जेव्हा जिवंत करुन मला उठविले जाईल".

- हा आहे मरयमपुत्र ईसा आणि ही आहे त्याच्यासंबधी ती सत्य गोष्ट ज्यात लोक संशय घेत आहेत. ईश्वराचे हे काम नव्हे की त्याने एखाद्याला पुत्र बनवावे. तो पवित्र अस्तित्व आहे. तो जेव्हा एखाद्या गोष्टीचा निर्णय घेतो तेव्हा म्हणतो की अस्तित्वात ये, आणि ती अस्तित्वात येते.

- (आणि ईसाने म्हटले होते की) "ईश्वर माझाही पालनकर्ता आहे आणि तुमचा पालनकर्तासुद्धा, म्हणुन तुम्ही त्याचीच भक्ति करा, हाच सरळमार्ग आहे." (पवित्र कुराण १९ : १६ - ३६)

## यहुदी लोकांचा धर्म (Faith of Judaism)

सन १७०० बी.सी. मध्ये पॅलेस्टाईन व त्याच्या आजूबाजूच्या परिसरातील लोकांनी भयंकर दुष्काळामुळे इजिप्तकडे स्थलांतर केले. सुरुवातीला इजिप्तच्या लोकांनी त्यांचे स्वागत केले. पण हेब्र्यु जमात स्वत:चे वर्चस्व प्रस्थापित करण्याआधीच इजिप्तच्या लोकांनी त्यांना गुलाम बनवून टाकले व त्यांना त्यांच्या देशातील प्रचंड बांधकाम प्रकल्पांसाठी मजूर म्हणून फुकटात काम करण्यास भाग पाडले.

जवळजवळ चारशे वर्षे ते इजिप्तच्या लोकांचे गुलाम म्हणून राहिले. नंतर ईश्वराने त्यांची बंधनातून सुटका करण्यासाठी व त्यांना योग्य मार्गावर आणण्यासाठी मुसा (अलैहि सलाम) ह्यांना पाठविले. ईश्वराने मुसा यांना त्याचे पवित्र तोहरा हे ह्या लोकांना मार्गदर्शन करण्यासाठी स्पष्टीकरण करणारे पुस्तक दिले. तोहरामध्ये पाच पुस्तकांचा मुख्यत्वे Genesis, Exodus, Leviticus, Numbers and Deuteronomy ह्यांचा समावेश आहे. गुलामगिरीतून सुटका झाल्यानंतर हर्ब्यू जमातीचे लोक हे त्या वाळवंटात सुमारे चाळीस वर्षे भटकंती करीत राहिले व शेवटी पुन्हा एकदा पॅलेस्टाईनमध्ये स्थायिक झाले.

१) ईश्वर हा एकच आणि आकाररहित आहे अशी यहुदी लोकांची श्रद्धा आहे. त्यांचा असा विश्वास आहे की, उझेयर हा ईश्वराचा पुत्र आहे.

२) आधी वर्णन केल्याप्रमाणे यहुदी लोकांचा न्यायनिवाडा दिवस, स्वर्ग आणि नरक ह्या गोष्टींवर विश्वास आहे.

३) प्रेषित मूसा यांच्या प्रगटीकरणानंतर ईश्वराने पाठविलेला "तोहरा" हा यहुदी लोकांचा धर्मग्रंथ आहे.

४) बायबल आणि कुराण जसे सांगतात त्याचप्रमाणे तोहरा हे पण सर्व प्रेषित व ईश्वरी पुस्तकांचे वर्णन करते.

यहुदींच्या पूजास्थानाला सायनेगॉग असे म्हणतात. जे तोहराचा अभ्यास करतात त्यांना पदवीचा सन्मान मिळतो व त्यांना रब्बी असे

म्हटले जाते. यहुदी लोकांचे पॅसोव्हर, शावयूत, सुकोथ, सिमचाट, रॉश हशानाह आणि योम किप्पूर हे सण आहेत.

### इस्लाम धर्म

- इस्लाम धर्मात प्रत्येकाला सहा तत्वावर विश्वास ठेवावा लागतो.

  १) ईश्वराचे अस्तित्व

  २) देवदूतांचे (Angels) अस्तित्व

  ३) सर्व ईश्वरी पुस्तके खरी आहेत ही श्रद्धा बाळगणे. ईश्वराने प्रगट केलेली ईश्वरी पूस्तके ही कुराण, बायबल, तोहरा ही आहेत.

  ४) सर्व प्रेषित आणि प्रेषित मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम)हे खरे आहेत अशी श्रद्धा ठेवणे.

  ५) न्यायनिवाड्याच्या दिवशी प्रत्येकजण पुन्हा जिवंत होईल आणि तिचा वा त्याचा पृथ्वीवरील आयुष्याचा हिशेब हा ईश्वराला देईल ह्यावर श्रद्धा असणे.

  ६) ईश्वराने नशीब बनवलेले आहे ह्यावर विश्वास ठेवणे.

- इस्लाम धर्मामध्ये सहा तत्वावर विश्वास ठेवल्यानंतर चार कामे करावी लागतात.

  १) नमाज (रोजची प्रार्थना)

  २) उपवास

  ३) दानधर्म (जकात)

  ४) हज (ही फक्त श्रीमंतासाठी.गरिबांसाठी ती बंधनकारक नाही.)

- जर प्रत्येकाने त्याच्या अंतःकरणापासून प्रामाणिकपणे इस्लाम धर्माच्या ६ तत्वांवर श्रद्धा ठेवली आणि चार शारीरिक कामे ही

ईश्वरानेची दिलेली आज्ञा व सक्तिची आहेत असा विश्वास ठेवला, पण जरी चार शारीरिक कार्ये केली नाहीत तरीही ती व्यक्ति मुसलमान आहे असे मानले जाते.

- इस्लामधर्मानुसार एका ईश्वराचे अस्तित्व नाकारणे हा एक गुन्हा आहे, त्याला ईश्वर न्यायनिवाडा दिवशी कधीही क्षमा करणार नाही. तो अशा पापकृत्याला कधीही माफ करणार नाही. ह्या प्रमुख गुन्ह्यांखेरीज ईश्वर एखादेवेळी इतर चुका आणि पाप ह्यांबद्दल क्षमा करू शकतो.

- वर उल्लेख केलेल्या चार शारिरीक काम न करण्याच्या प्रत्येक क्रियेला शिक्षा आहे. जेव्हा एखादी व्यक्ति त्यांची अंमलबजावणी करीत नाही, तेव्हा त्याने जितक्या वेळा त्या गोष्टी करावयाच्या गाळल्या असतील तितकेवेळा त्याला नरकलोकांत कैदेची शिक्षा होईल. पण शिक्षा पुरी झाल्यावर त्याला सोडले जाईल व तो स्वर्गलोकांत जाईल. जी व्यक्ति एका ईश्वराच्या अस्तित्वाचा विरोध करते आणि सहा तत्वांचे अस्तित्व मानीत नाही, त्यांनी पृथ्वीवर केलेल्या नकारघंटेमुळे स्वर्गलोकी जाण्याचा त्यांना अधिकार नसतो.

- या पृथ्वीवरील सर्व सजीव प्राणी हे ईश्वराची प्रार्थना करतात. प्रत्येकाची शरीराची रचना ही वेगवेगळी असते आणि ते त्यांच्या नैसर्गिक स्थितीत म्हणजे उभे राहून, गुढगे टेकून इत्यादि ह्या अवस्थेत प्रार्थना करतात. प्रत्येक अवस्थेला तिचे स्वतःचे असे महत्व आहे. नमाज ही एक संतुलित प्रार्थना आहे. मनुष्य हा सर्व शारीरिक स्थितीमध्ये ईश्वराची प्रार्थना करतो. उदा.(उभे राहून, वाकून, मान जमिनीवर टेकून) इ.नमाज (ईश्वराची प्रार्थना) दिवसांतून पाच वेळा अदा केली पाहिजे. म्हणजेच सूर्योदयापूर्वी (फझर), दुपारच्या जेवणाच्यावेळी (झूहर), संध्याकाळी चहापानाच्या वेळी (असर), सूर्यास्तानंतर (मगरिब) आणि रात्रीच्या जेवणाच्यावेळी (इशा)

- उपवास म्हणजे सूर्योदयाच्या आधी ते सूर्यास्तापर्यंत काहीही न खाणे वा पिणे. उपवासात सर्व पापे ही कटाक्षपूर्वक वर्ज्य आहेत. उपवासामुळे कठिण परिस्थितीतसुद्धा योग्य काम करण्याची इच्छाशक्ति

निर्माण होते हाच उपवासाचा मुख्य हेतू आहे.

- जकात म्हणजे आपल्या जास्त नफ्याच्या २.५% टक्के रक्कम ही गरिबांना दानधर्म करणे.

- खतना करणे हे इस्लाम धर्मात सक्तिचे नाही. पण वैज्ञानीक दृष्ट्या स्वच्छ राहण्यासाठी ते केले जाते. याच कारणामुळे बहुतेक अमेरिकन लोकसुद्धा याच पद्धतीने खतना करतात.

- हज ही मूलतः मृत्यूनंतरच्या न्यायनिवाडा दिवसाची मृत्यूपूर्वीची तालिमच (rehearsal) असते. जेव्हा एखादी व्यक्ति ही मरण पावते, तेव्हा त्याचे नातेवाईक मृत व्यक्तिला प्रेतवस्त्रांत (कफनमध्ये) गुंडाळतात आणि त्याला निर्जन प्रदेशात (कबरस्थानात) घेऊन जातात व तेथे पुरतात. ती व्यक्ति त्याठिकाणी न्यायनिवाडा दिवसापर्यंत राहाते. मग न्यायनिवाड्याच्या दिवशी ती व्यक्ति पुन्हा एकवार जिवंत होईल व पृथ्वीवरील तिच्या कार्याचा हिशेब ईश्वराला देईल. ह्याच गोष्टीची हजयात्रेमध्ये तालीम(Rehearsal) पुढीलप्रमाणे केली जाते.

हज़ यात्रेकरू व्यक्ति ही दोन साधी न शिवलेले कपडे घालते जे साधारणपणे प्रेतवस्त्राप्रमाणे साम्य दर्शविणारी असतात. ती व्यक्ति मक्केच्या बाहेर ५ किलोमीटर ओसाड ठिकाणी जाते त्या जागेला मिना असे म्हणतात व तेथे कबरस्थानाशी साम्य दाखविणाऱ्या तंबूत राहाते.

त्यानंतर दुसऱ्या दिवशी तो यात्रेकरू हा मिनापासून दूर लांब ७ किलोमीटर अंतरावर असलेल्या खुल्या मैदानाच्या जागेकडे जातो जिला अराफत असे म्हणतात. ईश्वर ज्या मैदानात न्यायनिवाडा करतांना लोकांना न्याय देतो त्या जागेशी या जागेचे साम्य असते व तेथे ती व्यक्ति संबंध दिवस ईश्वराची प्रार्थना करते. अराफतमध्ये आपण ईश्वराला क्षमा करावी म्हणून ती व्यक्ति विनवणी करते. हल्लीच्या काळी हिशेब न देता आम्ही ईश्वराची नम्र भावाने प्रार्थना करून स्वत:चे संपुर्ण पाप माफ करण्याचा प्रयत्न करतो.

व तिसऱ्या दिवशी ईश्वराने त्याच्या पवित्र शहरास भेट देण्यास आपल्याला परवानगी दिली, म्हणुन त्या ईश्वराचे आभार मानण्यासाठी आम्ही पवित्र काबाहच्या भोवती ७ वेळा फेऱ्या मारतो आणि नमाज पढतो.

अशाप्रकारे हजयात्रा पुरी होते. (अन्य धार्मिक विधि हे हजयात्रेचे आवश्यक भाग आहेत पण मूलभूत हज़ ही वर दिलेल्या तीन कृत्यांनी पूर्ण होते.)

**पवित्र काबाह म्हणजे काय?**

ईश्वर पवित्र कुराणांत असे सांगतो "**निःसंशय सर्वप्रथम उपासनास्थळ जे मानवाकरिता बांधण्यात आले ते तेच आहे जे मक्का शहरी विद्यमान आहे. त्याला मांगल्य व समृद्धी दिली गेली होती आणि सर्व जगवासियांकरीता मार्गदर्शनाचे केंद्र बनविले गेले होते. त्यात स्पष्ट संकेतचिह्ने आहेत. इब्राहीम** (अलैहि सलाम) **चे प्रार्थनास्थळ आहे, आणि त्याची अवस्था अशी आहे की जो त्यात दाखल होईल सुरक्षित झाला. लोकांवर ईश्वराचा हा हक्क आहे की या गृहापर्यंत पोहचण्याची ऐपत आहे त्याने त्याची हजयात्रा करावी आणि जो कोणी या आदेशाचे पालन करण्यास नकार देईल त्याने समजुन असावे की ईश्वर सकल जगवासीयांवर अवलंबुन नाही**".

(पवित्र कुराण ३ :९६)

ही अशी जागा आहे जेथे सर्व जगातून माणसे ही ईश्वराची शिकवण समजून घेण्यासाठी येतात, एकमेकांबरोबर मिसळून ज्ञानाचे आदानप्रदान करतात आणि स्वतःच्या श्रद्धांत सुधारणा करतात. ही जागा म्हणजे न्यायनिवाडा दिवसाची तालीमच (Rehearsal) आहे.

पवित्र काबाह हा १२.५ मीटर लांब, ११.५ मीटर रुंद आणि १४ मीटर उंच आहे. प्रथम त्याला देवदुतांनी बनवले होते. त्यानंतर हजरत. अब्राहम (अलैहि सलाम) ह्यांनी त्याची पुनर्रचना केली. त्यानंतर १२ वेळा त्याची दुरुस्ती झाली. सन्मानाचे एक प्रतिक म्हणून ते काळ्या पडद्याने आच्छादन केलेले असते. काबाह ही एक रिकामी

खोली आहे. १९५० पर्यंत पवित्र काबाहचे विश्वस्त हे लोकांना आत जाण्यास व प्रार्थना करण्यास परवानगी देत होते.

आता हल्ली ती खोली सामान्य लोकांसाठी बंद आहे. वर्षातून एकवेळा मुस्लिम राष्ट्रांचे प्रमुख त्या खोलीत प्रवेश करतात, साफसफाई करतात व नमाज पढतात.

काबाहची रचना ही देवदूतांनी ईश्वराच्या हुकूमानुसार केली व सर्व धर्माची ईश्वरी पुस्तके ही त्याच एका ईश्वराने अवतरीत केली आहेत. त्यामुळे ह्या घराचे प्रतिष्ठा आणि महत्त्व हे जवळजवळ सर्व धार्मिक पुस्तकांत वर्णन केलेले आहे. पण ते निरनिराळ्या भाषांत वर्णन केलेले असून त्याची नावे निरनिराळी आहेत म्हणून ते समजण्यास अतिशय कठिण आहे.

उदा. ४००० वर्षाचे जुने असे वेद ह्यामध्ये काबाहचे वर्णन खालील नावानी केले आहे. इल्लास पाद, नाभा पृथिव्या, नाभीकमल, आदि पुष्करतीर्थ, दारूका बन, मकतेश्वर, जंबूद्वीप इत्यादि.

आपण जेव्हा खोलवर संशोधन करतो तेव्हा आपल्याला सत्य गोष्ट मिळते व निरनिराळ्या धर्मातील आश्चर्यकारक सारखेपणा असल्याचा आपणास दिसून येते उदा. सर मोनियर (Sir M. monier) ह्यांची इंग्लीश संस्कृत डिक्शनरी सांगते,"मक म्हणजे मक्का, मकतेश्वर म्हणजे ईश्वराची मक्का. त्याचप्रमाणे बायबलमध्ये संत जॉन यांच्या प्रकरण क्र. १२ मध्ये मक्केचे वर्णन माता असे केलेले आहे. कारण मक्का ही पृथ्वीवरील प्रथम शहर होती. म्हणून तिला सर्व शहरांची जननी (माता) असे मानतात.

पवित्र ऋग्वेदामध्ये मक्केच्या यात्रेचे महत्त्व हे पुढीलप्रमाणे वर्णन करण्यात आलेले आहे.

"हे ईश्वराची प्रार्थना करणाऱ्यांनो दुरच्या देशात समुद्रकिनाऱ्यावर दारूका बन आहे, ज्याची रचना ही मानवप्राण्याने केलेली नाही. (ज्याची रचना देवदुतांनी केलेली आहे) या जागेत प्रार्थना करून ईश्वराचा कृपाप्रसाद मिळवुन स्वर्गलोकात प्रवेश मिळवा" (ऋग्वेद १०:१५५:३)

पुर्वी लोकांचा पुष्कळ ईश्वरांवर विश्वास होता. त्यांनी खूप मूर्ति बनवून काबाहमध्ये व त्याच्याभोवती ठेवल्या होत्या. म्हणून ईश्वराने पवित्र कुराणात अशी आज्ञा दिली,

"ह्यापुढे ज्यांची एकापेक्षा जास्त ईश्वरांवर श्रद्धा आहे त्या कोणालाही मक्केमध्ये प्रवेश करु देऊ नका". (पवित्र कुराण ९ : २८ सारांश)

श्री. ए. एच. विद्यार्थी हे त्यांच्या Mohammad in World Scriptures या पुस्तकात असे सांगतात. पवित्र बायबलमध्ये असे सांगितले आहे कि प्रेषित डेवीडने पेलेन्स्टाईनवर विजय मिळवण्यासाठी मक्केला जाऊन प्रार्थना केली होती.

पवित्र बायबलमध्ये मक्केसंबधी श्लोक असे आहेत,

"ईश्वराच्या घराजवळ (काबा) असणाऱ्या लोकांवर ईश्वराची कृपा आहे. ते सतत ईश्वराची प्रार्थना करत असतात".

अशा लोकांवर ईश्वराची कृपा आहे जे ईश्वरावर श्रद्धा ठेवतात आणि जे लोक ईश्वराच्या घराला (काबा) प्रार्थना करण्यासाठी तीर्थयात्रा करतात.

ते लोक बक्का येथे जातात. तेथे झरा (जमजम) आहे. पावसाच्या पाण्याचाही त्यात साठा होतो.

विद्वान असे मानतात की बायबलमध्ये लिहिलेल्या श्लोकात Your home म्हणजे (काबा). Pilgrimage म्हणजे (हज). Becca म्हणजे (मक्का). Spring म्हणजे जमजम नावाचा झरा.

वर दिलेले भाषांतर हे New King James Version, New Testament या पवित्र बायबलमधील श्लोकाचे आहे.

## इस्लाम धर्माचा पवित्र ग्रंथ कुराण

हे पुस्तक म्हणजे ईश्वराने केलेल्या आदेशांचा संग्रह आहे. जे प्रेषित मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) यांना तेवीस वर्षाच्या कालावधीत थोडे-थोडे मिळाले. ह्या पुस्तकात ईश्वराच्या आज्ञा, आधीच्या धर्माचा संदर्भ आणि प्रेषितांविषयी माहिती आहे. तसेच त्याकाळातील लोकांनी ईश्वराला विचारलेले प्रश्न व ईश्वराने त्यावर प्रेषीतांद्वारे दिलेली उत्तरे यांचेही स्पष्टीकरण आहे.

## हादिस शरीफ

ह्या पुस्तकामध्ये प्रेषित मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) यांनी पवित्र कुराणाचे दिलेले स्पष्टीकरण आहे. जे त्यांनी स्वतःच्या जीवनात जगुनही दाखवले होते. या पुस्तकात त्यांची भाषणे व जीवनातील कार्यांचा उल्लेख आहे. त्यातील सर्व नोंदी त्यांच्या मित्रांनी किंवा अनुयायांनी केल्या होत्या. हादीस शरीफ हे त्या सर्व नोंदीचे संग्रह आहे.

पवित्र कुराण हा एकच ग्रंथ आहे, पण हादीस शरीफचे सातपेक्षा जास्त ग्रंथ आहेत. या ग्रंथातील नोंदी वेगवेगळ्या ज्ञानी लोकांनी संग्रहीत केली आहे. उदा. बुखारी, त्रिमिजी, अबु-दाऊद.इ.

## शिवलिंग आणि हजरे-अस्वद

सुप्रसिद्ध कितने दुर कितने पास या पुस्तकाचे लेखक अब्दुल्ला तारीक असे म्हणतात, शिव म्हणजे ईश्वर. लिंग म्हणजे चिन्ह (Simbol)

हजरे-अस्वद एक काळ्या रंगाचा दगड आहे. जो काबाहच्या उत्तर कोपऱ्यावर बसवलेला आहे. परिक्रमेच्या सुरूवातीची जागा दर्शवण्यासाठी देवदुत जिब्राईल यांनी या दगडाची स्थापना स्वर्गातुन आणून केली होती.

हा दगड स्वर्गातुन आणलेला होता म्हणुन यालाही ईश्वराचे चिन्ह मानले जाते. अब्दुल्ला तारीक यांचे असेही मत आहे कि

हजरे-अस्वद हेच शिवलिंग आहे.

**अजान म्हणजे काय?**

तुम्हा सर्वांना मुसलमानांच्या मशिदींमधून दिवसाच्या ५ वेळा येणाऱ्या कर्णकर्कश्य किंचाळ्यांमुळे अत्यंत क्रोध येत असेल पण तुम्हाला ते काय सांगतात ह्याची माहिती आहे का? ते पुढील संदेशांची घोषणा करतात.

| | |
|---|---|
| अल्लाऽहू अकबर | ईश्वर हा महान आहे |
| अशहदु - अल्ला-इलाहा इल-ल्लाह | ईश्वर हा एकच आहे ह्याचा मी साक्षीदार आहे. |
| अशहदु - अन्ना मुहम्मदुर्र सूलुल्लाह | मुहम्मद (स.) हे ईश्वराचे प्रेषित आहेत. याचा मी साक्षी आहे. |
| हैय्या-लस्सलाह | प्रार्थनेकडे या. |
| हैय्या लल्फलाह | सफलतेकडे या |
| अल्ला- हु अकबर | ईश्वर हा महान आहे |
| लाईल्लाहा इल्लल्लाह | ईश्वराच्याशिवाय उपासनीय अन्य कोणीही नाही |

## पवित्र काबाच्या आतील दृश्य




## मुसलमान धर्मात स्त्रियांचा मालमत्तेवरील हक्क (वा अधिकार)

जर एखादी व्यक्ति ही मृत्यू पावून त्याच्यामागे मुलगा, मुलगी, पत्नी व आईवडील दोन्ही असतील तर त्या मृत व्यक्तिच्या मालमत्तेचे वाटप त्याच्या कुटुंबियांमध्ये पुढीलप्रमाणे केले जाते.

- प्रत्येक पालकाला म्हणजे आई व वडिल ह्या प्रत्येकाला १/८ म्हणजे १२.५ टक्के हा मालमत्तेचा हिस्सा मिळेल.
- पत्नीला मालमत्तेच्या १/६ म्हणजेच १६.७ टक्के हिस्सा मिळेल.
- मुलाला शिल्लक राहिलेल्या मालमत्तेच्या २/३ म्हणजेच ३८.९ टक्के वाटा मिळेल.
- मुलाला जे काही मिळेल त्याचा अर्धा भाग म्हणजे १९.४४ टक्के वाटा हा मुलीला मिळेल.

म्हणजेच सर्वसामान्य घटनांमध्ये स्त्रियांना तीन ठिकाणाहून मालमत्तेचा वाटा मिळेल, वडिल, नवरा आणि मुलगे.

## निरनिराळ्या धर्मांतील सर्वसाधारण प्रेषितांची नावे

| काळ (अंदाजे) | प्रेषिताचे सर्वसाधारण नाव | हिंदू धर्म | यहुदी धर्म | ख्रिश्चन धर्म | इस्लाम धर्म |
|---|---|---|---|---|---|
| माहित नाही ७०००ई.स.पु ते ५००० ई.स.पुर्व | आदम आणि ईव्ह | आदम आणि हव्वावती(१) | आदम आणि ईव्ह | आदम आणि ईव्ह | आदम आणि हव्वा |
| ३०००ई.स.पुर्व | नोहा | मनू(१) महानूहू | नोहा | नोहा | नूह |
| २०००ई.स.पुर्व | अब्राहम | अबिराम(१) ब्रम्हाजी(१) | अब्राहम | अब्राहम | इब्राहिम |
| २०००ई.स.पुर्व | इसमाईल | अथर्वा | इसमाईल | इसमाईल | इसमाईल |
| २०००ई.स.पुव | इसाक | अनजीरा | इसाक | इसाक | इसाक |
| १३००ई.स.पुर्व | मॉसेस | ---- | मॉसेस | मॉसेस | मूसा |
| ४ ई.स.पुर्व | जिझस | इसा मसिह | ---- | येशुख्रिस्त | ईसा |
| ६०० ई.स. | मुहम्मद (पिबुह) | कलकी अवतार(३) नरहशंग्सा मोहम्मद (४) अहमद (४) | मॉसेसचा भाऊ | कम्फरर्टर पॅरालेट/ महाम्मदीन(५) | मुहम्मद (पीबुह) अहमद |

**संदर्भ**

१) भविष्य पुराण क्रिएशन, भाग १, प्रकरण क्र. ४

२) भविष्य पुराण क्रिएशन, भाग ३, प्रकरण क्र. २

३) कालकी-पुराण २:४ आणि २:१ भागवत पुराण (१ :३:२४)

४) ऋग्वेद ८:६:१०, अथर्ववेद २:११५:१, सामवेद श्लोक १५२ व १५००

५) ओल्ड टेस्टामेंट (हेब्रु भाषेमधील) प्रकरण क्र.५, श्लोक क्र.१६

६) मोहम्मद इन पारसी, हिंन्दु.आणि बुद्ध धर्मशास्त्रानुसार. पान नं.१०९

७) मोहम्मद इन पारसी, हिंन्दु.आणि बुद्ध धर्मशास्त्रानुसार. पान नं.१०९

८) मोहम्मद इन पारसी, हिंन्दु.आणि बुद्ध धर्मशास्त्रानुसार. पान नं.१०९

तसे आणखी पुष्कळ प्रेषित आहेत. परंतु विषय हा सहजसोपा आणि थोडक्यात सांगण्यासाठी आपण त्यांच्यापैकी फक्त काहींचा येथे उल्लेख केला आहे.

ब्राह्मणांशिवाय अन्य कोणालाही वेद वाचणे व समजावून घेणे ह्याची परवानगी नव्हती. म्हणून हिंदू धर्म हा गुप्त आणि अन्य धर्मापासून एकाकी पडला आहे. मुस्लिम, यहुदी व ख्रिश्चन धर्माचे लोक एकमेकांच्या स्वर्गीय पुस्तकांचे ज्ञान, तसेच प्रेषित आणि ऐतिहासिक प्रसंग ह्यामध्ये वाटा घेतात, म्हणून निराळ्या मार्गाने वर्णन केले असले तरी ते प्रेषितांचा संबंध जुळवू शकतात. जेव्हा बायबल हे प्रेषितांना जोसेफ, डेव्हिड, सालोमन, नोहा अशी नावे देतात, तेव्हा मुस्लिमांना ते युसुफ, दावूद, सुलेमान आणि नुह इत्यादि आहेत हे समजून घेता येते. परंतु अशातऱ्हेची परस्पर देवाणघेवाण ही हिंदुधर्मात होत नाही. म्हणून ऋग्वेदाने जर संस्कृतमध्ये एखाद्या प्रेषिताचे विशिष्ट नावाने वर्णन केले, तर अरेबिक वा हर्ब्यू वा इंग्लीश भाषेमध्ये त्याच प्रेषितांच्या नावाचा संबध जोडता येत नाही.

आता काही बुद्धिमान व्यक्ति असा संबंध दाखविण्याचा प्रयत्न करीत आहेत. अशातऱ्हेचे एक उदाहरण पुढे दिले आहे.

बायबल, तोहरा आणि कुराण हे सर्व ग्रंथ असे वर्णन करतात की, नोहाच्या काळात एक मोठा पूर आला होता ज्यामध्ये सर्व जग हे बुडून गेले. फक्त नोहा व त्याचे सच्चे अनुयायी ज्यांची ईश्वरावर दृढ श्रद्धा होती, ते एका लाकडी जहाजामध्ये जिवंत राहिले व त्या स्वर्गीय पुस्तकांच्यानुसार असा पूर हा मानवजातीच्या इतिहासात फक्त एकदाच येऊन गेला. मार्कंडेयपुराण, भविष्यपुराण, मत्स्यपुराण व भागवत सुद्धा ह्या मानवजातीच्या इतिहासात एकदाच येऊन गेलेल्या पुराचे वर्णन करतात. ते असे पण सांगतात की, फक्त काहीजणच ईश्वरावर गाढ श्रद्धा असणारे हे मनुबरोबर वाचले.

ते सर्व सांगतात की, महापुर हा फक्त एकदाच घडला व काही थोडेचजण लाकडी जहाजावर जिवंत राहिले, म्हणून ह्या

बोटीचा कप्तान हा हिंदूसंस्कृतिमध्ये तसेच कुराण, बायबल, तोहरा ह्याच्या बोटीच्या कप्तानाप्रमाणेच एकच असला पाहिजे. म्हणून मनू हेच नोहा किंवा हज़रत नूह (अलैहि सलाम) असले पाहिजेत. यहुदी समाजाचे प्रेषित हे हज़रत मुसा आहेत. ख्रिश्चन समाजाचे प्रेषित येशु ख्रिस्त आहेत. मुस्लिम समाजाचे प्रेषित मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) आहेत. तसेच हिंदु समाजाचे प्रेषित कदाचीत मनु असु शकेल.

अरेबिकमध्ये आम्ही हज़रत ही उपाधि एखाद्या थोर व्यक्तिच्या नावापुढे जोडतो. संस्कृतमध्ये आपण उपसर्ग, महा किंवा श्री हे महान व्यक्तिच्या नावाला लावतो. आपण नुह (अलैहि सलाम) यांच्या नावापुढे संस्कृतमधील महा लावतो. त्यामुळे त्यांचे नाव महानुह झाले. हिंदू धर्माचे लोक हे मनूने वर्णन केलेले मनुस्मृतिमधील धर्माचे सर्वमान्य कायदे व नियम ह्याचे अनुकरण करतात. (भविष्य पुराणात, निर्मिती भाग एक, प्रकरण क्र.४, महर्षी व्यासांनी बऱ्याच प्रेषितांच्या नावाचा उल्लेख केलेला आहे.)

## विभिन्न धर्मांच्या लोकांमध्ये तिरस्काराची भावना असण्याची कारणे

सर्व धर्मांची मूळ रचना, त्यामधील समान प्रेषित आणि त्यांची शिकवण ह्यांचा अभ्यास केल्यानंतर तुम्हाला निरनिराळ्या धर्मात काय फरक आढळून येतो?

ते इतके वेगळे आहेत की, एका धर्माच्या लोकांनी दुसऱ्या धर्माच्या लोकांना जिवंतपणीच जाळून टाकावे? किंवा पद्धतशीरपणे त्यांच्यावर दडपशाही करावी? अशा गोष्टी ह्या जगात का घडून येतात?

माझ्या व्यक्तिगत दृष्टीकोनातून निरनिराळ्या धर्माच्या लोकांमध्ये आपापसात तिरस्कार वा द्वेषाची भावना असण्याची तीन कारणे संभवतात.

१) सर्वसामान्य लोकांचे धर्माबाबतचे अज्ञान

(Ignorance of common people)

२) धार्मिक नेत्यांनी केलेली समाजाची दिशाभूल

(Misguidance by priest community)

३) राज्यकर्त्यांनी अवलंबलेले फोडा आणि राज्य करा हे धोरण

(Divide and rule policy by politicians)

### १) **दुर्लक्ष (किंवा उपेक्षा)**

आपण फक्त आपला तात्काळ फायदा असेल तशाच गोष्टींना फक्त महत्त्व देतो. धार्मिक शिक्षण घेतल्याने किंवा ध्यानसाधना आणि प्रार्थना ह्या गोष्टींनी तात्काळ आर्थिक लाभ काही होत नाही. म्हणून आपण धार्मिक ज्ञान ह्याला काही प्राधान्य व महत्त्व देत नाही. त्यामुळे सर्व धर्मांतील ९९ टक्के लोक हे त्यांचे धार्मिक ग्रंथ संपूर्णपणे समजून घेऊन कधीच वाचत नाहीत.

### २) **धार्मिक नेत्यांकडुन होणारी दिशाभुल**

• सर्व धर्मांचे धर्मोपदेशक हे अफाट प्रसिद्धि, मान, आर्थिक लाभ व राजकीय शक्ति ह्यांचा उपभोग घेत असतात. युरोपियन राजांनी कधीही चर्चच्या विरोधात जाण्याचे धाडस केले नाही. अयातुल्ला खोमेनी यांनी इराणाचे राज्य पाडून टाकले. चाणक्य हे एक महान

ज्ञानी पुरूष होते व त्यांनी योग्य राज्यकर्ते निर्माण केले. ह्या अतिशयोक्तिच्या गोष्टी आहेत पण सर्वसाधारणपणे धार्मिक व्यक्ति ह्या अमर्याद सत्ता उपभोगतात व सामान्य लोकांवर राज्य करतात.

सामान्यपणे जे लोक गरिबीत राहातात वा शाळा किंवा कॉलेज ह्यामध्ये जाऊ शकत नाहीत, तेच लोक बालपणापासूनच धार्मिक शिक्षण घेतात व मोठे होऊन धर्मोपदेशक बनतात. धर्मोपदेशक बनल्यावर त्यांना आयुष्यात कधीही स्वप्नातदेखील न मिळालेला अचानक सन्मान, पैसा व अधिकार मिळतो व त्यांना त्या गोष्टी हातातून कधीही जाऊ द्यावयाच्या नसतात. धार्मिक शिकवण हा त्यांचा पहिला पर्याय नव्हता. पण तडजोडीचा एक मार्ग होता म्हणून त्यांच्या अंतःकरणाच्या तळापासून ते खऱ्या अर्थी धार्मिक किंवा संत नसतात पण धार्मिक विधि संस्कार करणे हा त्यांचा एक उद्योगधंदा बनतो व ज्याचा वापर हा पैसा मिळविणे व प्रभाव पाडणे ह्यासाठी केला जातो. पण ईश्वराची भक्ति हा त्यांचा मुळ उद्देश नसतो. म्हणून जेव्हा त्यांची आर्थिक स्थिती वा दर्जा यांस धोका वाटला तर त्यांची इभ्रत कायम टिकविण्यासाठी ते धर्माच्या शिकवणुकीच्या विरूद्ध पण काही गोष्टी करण्याचे धारिष्ट्य करतात. समाजातील सर्वसामान्य लोक हे अज्ञानी असतात. म्हणुन ते सर्वसाधारणपणे त्यांना सहन करतात वा चुकीच्या मार्गावर देखील त्यांचे आंधळेपणाने अनुकरण करतात.

- आपणांकडे लक्ष दिले जावे व सतत बातमीच्या झोतात राहावे ह्यासाठी सिनेमा नट/नटी हे आपले एखाद्याशी लफडे आहे अशा अफवा पसरवितात. त्यामागे सिनेमासिकांत प्रसिद्धी मिळावी हा हेतू असतो. आपल्या पालकांनी आपणाकडे नीट लक्ष द्यावे ह्यासाठी लहान मूल हे रडते किंवा वस्तूंची नासाडी करते.

त्याचप्रमाणे धार्मिक नेते हे प्रसिद्धि मिळविण्यासाठी पुष्कळ गोष्टी करतात. काहीच फक्त चांगल्या गोष्टी करतात. पण योग्य मार्गाने प्रसिद्धी मिळणे ही वेळकाढू व काहीशी कठिण प्रक्रिया आहे.

आणखी एक मार्ग जो झटपट व अत्यंत परिणामकारक आहे. तो म्हणजे मूलतत्वगामी (Fundamentalism), असहिष्णुता (intolerance) व धर्मामध्ये नवीन गोष्टींची ओळख करून देणे. आजतागायत निरनिराळ्या धर्माच्या लोकांमध्ये जो तिरस्कार वा द्वेषभावना अस्तित्वात आहे ह्याचे मूळ कारण म्हणजे प्रसिद्धिसाठी तीव्र लालसा असलेली धर्मोपदेशक समाजाची प्रवृत्ति. ही प्रसिद्धीची तीव्र लालसा जी चुकीच्या मार्गाने पूर्ण केली जाते, जो अत्यंत जलद व परिणामकारक मार्ग आहे.

धर्मोपदेशक समाज हा निरनिराळ्या धर्मांच्या लोकांमध्ये तिरस्कार भावनाच पसरवित नाहीत तर त्यांच्या स्वतःच्या धर्मामध्ये पण द्वेष पसरविण्याचे काम करतात. ह्याचे स्पष्टीकरण करण्यासाठी मी तुम्हाला काही उदाहरणे देईन.

ख्रिश्चन धर्म हा प्रॉटेस्टंट व कॅथॉलिक ह्या दोन पंथात विभागला गेला आहे. युरोपमधील कॅथॉलिकांनी प्रॉटेस्टंट पंथीयांचा इतका छळ केला की, त्यापैकी बहुतांशी लोकांनी अमेरिकेत स्थलांतर केले. मुस्लिम धर्मात शिया व सुन्नी असे दोन भाग आहेत व त्या दोघांमध्ये आपसात प्रचंड वैर आहे. सुन्नी पंथ ह्याचे आणखी काही उपपंथामध्ये विभाजन झालेले आहे. जसे बरेलव्ही, देवबंदी व अहले-हदिस. हे सर्वजण एकमेकांना गैर मुस्लिम किंवा मुशरिक म्हणतात.

हिंदूधर्मामध्ये जातीच्या आधारे चार भाग केले गेले आहेत. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र. धार्मिक ज्ञानसंपदेवर ब्राह्मणांनी आपला हक्क राखून ठेवलेला आहे व त्यामध्ये ते कोणालाही प्रवेश करण्यास परवानगी देत नाहीत. हिंदू लोकसंख्येपैकी ५० टक्के लोकसंख्या ही भारतातील काही राज्यांमध्ये शूद्र आहे (खालची जात). त्यांना अस्पृश्य मानले जाते. हिंदूंच्या उच्चवर्णीय व नीचवर्णीय ह्यांच्यामध्ये आपापसात अत्यंत द्वेष (वैर) आहे.

सर्वसामान्य लोकांमध्ये ही फैलावलेली तिरस्काराची भावना हे मुख्यतः धर्मोपदेशक, समाजाचे कठिण परिश्रम ह्यांचे फलित आहे.

- सर्व धर्माचे ज्ञान मिळाल्यानंतर धर्मोपदेशकाला काय योग्य आहे व अयोग्य आहे हे समजते. अन्य धर्मांचे प्रेषित व त्यांची शिकवण ही चुकीची नाही हेही त्यांना कळून येते. तरीसुद्धा ते त्यांना स्विकारत नाही. कारण उद्दाम वृत्ति व त्यांचा दर्जा कसा टिकून राहिल ह्याची काळजी. अगदी शेवटच्या प्रेषितांचा स्विकार केला की त्या प्रेषिताची शिकवण पण स्वीकार करावी लागते. म्हणून ते त्यांचा स्विकार करत नाहीत. हिंदू धर्माचे धर्मोपदेशक हे मुसा (अलैहि सलाम) येशु (अलैहि सलाम) व मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) ह्यांना मान्यता देत नाहीत. ह्यामागील हे एक प्रमुख कारण आहे. यहुदी धर्मोपदेशक जिझस (अलैहि सलाम) व मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) ह्यांचा स्विकार करीत नाहीत. तसेच ख्रिश्चन लोक हे मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) यांना स्विकारत नाहीत पण त्याच्या आधी जे प्रेषित होऊन गेले त्यांना मानतात. कारण त्यामुळे त्यांच्या स्वतःच्या धर्मामध्ये काहीही फरक पडत नाही व त्यांना त्या प्रेषिताची शिकवणही स्विकारावी लागतच नाही.

पवित्र कुराणात ईश्वर हा अशा प्रकारच्या धर्मोपदेशकांचे पुढील शब्दात वर्णन करतो.

*"ज्यांना आम्ही ग्रंथ दिला, ते मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) यांना असे (स्पष्टपणे) ओळखतात, जसे आपल्या पुत्रांना ओळखतात. तरी ही त्यांचा एक समूह घमेंडीमुळे सत्य लपवितो. "* (पवित्र कुराण २ : १४६)

- दुसऱ्या एका ठिकाणी ईश्वर सांगतो,

*"परस्परातील वैरामुळे त्यांनी सत्य लपविले".*

(पवित्र कुराण ४२ : १४ सारांश)

## ३) राजकारणी व्यक्ति

अलेक्झांडरने सर्व जग जिंकले. त्याने हे कशासाठी केले?

ग्रीक लोक हे इतके गरीब होते की, त्यांच्या गरजा भागविण्यासाठी त्याला साऱ्या जगाची लूटमार करावी लागली?

नाही !

माणसांमधील सत्तेची वासना ही इतकी प्रबळ आहे की, संबंध विश्वाची लूटमार करून सुद्धा त्याची तहान भागणार नाही.

सत्ता व किर्ती मिळविण्यासाठी लोक हे निरनिराळे व्यवसाय निवडतात. राजकारण हा त्यापैकी एक व्यवसाय आहे. फोडा, तोडा व राज्य करा हा राजकारणाचा नियम मूलभूत वा पायाभूत नियमांपैकी एक आहे आणि काही अपवाद वगळता, सर्वसामान्यपणे सर्व राजकारणी व्यक्ति ह्या त्यांच्या कारकिर्दीमध्ये लोकांच्या जीवाच्या किंमतीवर आणि मानवप्राण्याच्या उत्कर्षाच्या किंमतीवर स्वतःची प्रगति करून घेतात.

*प्रकरण क्र. ४३*

# अध्यापनाची अखंड प्रक्रिया

## (The Continuous Process of Teaching)

• परमेश्वराने आदम आणि इव्ह (हवायती) ह्यांना निर्माण केले. आदमला ईश्वराच्या सर्व आज्ञा माहित होत्या, ज्या त्याने त्याच्या मुलाबाळांकडे पुढे पाठवून दिल्या. जसा जसा काळ पुढे जाऊ लागला तशी लोकांमधील परस्परांतील संदेशवहनाची दरी वाढत गेली व लोकांनी नवीन धार्मिक संस्कार व श्रद्धा ह्यांचे खऱ्या विश्वासाशी मिश्रण केले व ते ईश्वराची भक्ति करण्यापासून दूर गेले.

त्यांना सुधारण्यासाठी ईश्वराने ५००० वर्षांपूर्वी नुह (मनु) (अलैहि सलाम) यांना पाठविले. जेव्हा वेळ जाऊ लागला, तेव्हा पुन्हा वरील गोष्टीची पुनरावृत्ति झाली. मानवजातीने त्याचा मार्ग पुन्हा बदलला. तेव्हा ईश्वराने ती चूक सुधारण्यासाठी हजरत मुसा (अलैहि सलाम) यांना ३००० वर्षांपूर्वी पाठविले व त्यांनी ही सुधारणा केली.

तथापि ह्या कपटी माणसांच्या स्वभावात काहीही बदल झाला नाही. तो ज्याला बघतो त्याचीच भक्ति करण्यात त्याला प्रेम वाटते. तो जे योग्य आहे त्याच्यापेक्षा स्वतःच्याच इच्छेप्रमाणे अनुकरण करण्यात आनंद मानतो. त्या मानवप्राण्यांना पुन्हा मार्गदर्शन करण्यासाठी

ईश्वराने २००० वर्षांपूर्वी हज़रत इसा (अलैहि सलाम) (येशुला) पाठविले. पण पुन्हा एकदा लोक त्यांच्याच मार्गावर वळले. तेव्हा ईश्वराने पुन्हा हज़रत महंमद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) ह्यांना सुमारे १४०० वर्षांपूर्वी मानवजातीच्या मार्गदर्शनासाठी पाठविले.

हे वरील सर्व सुप्रसिद्ध असे प्रेषित आहेत. तथापि प्रत्यक्षात जगाच्या निरनिराळ्या भागात, निरनिराळ्या वेळी सुमारे १,२४००० पेक्षा जास्त प्रेषितांचे आगमन झाले होते.

पवित्र कुराणामध्ये सांगितले आहे,

*"आणि असा कोणताही लोकसमुदाय होऊन गेला नाही ज्यात कोणी सावध करणारा (प्रेषित) आला नाही".* (पवित्र कुराण ३५ : २४)

मानवजातीला शिकवण देण्यासाठी ह्या जगात प्रेषितांचे आगमन ही अविरत (वा सतत) प्रक्रिया आहे. आदमपासून ते मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) पर्यंत प्रत्येक प्रेषितांची शिकवण ही एकसारखीच होती, ती म्हणजे मानवता आणि ईश्वराची भक्ति.

म्हणून प्रत्यक्षात फक्त एकच धर्म आहे व तो म्हणजे मानवता व एक ईश्वराची भक्ति करणे. पण निरनिराळ्या जातींच्या उद्धट आणि हट्टी धर्मोपदेशकांमुळे मानव हे विभागलेलेच राहिले.

ह्या जगात फक्त एकच धर्म आहे व एकाच परमेश्वराने ह्या जगात मानवजातीला शिकवण देण्यासाठी प्रेषितांचे आगमन व गमन ही अखंड प्रक्रिया चालू ठेवली आहे. ह्या आपल्या श्रद्धेला खालील कारणीमांसामुळे आधार मिळतो.

1) [illegible] (Conscept) म्हणजे तो फक्त एकच सर्वव्यापक आहे व त्याला आकार वगैरे नाही ह्या गोष्टी सर्व धर्मात समान आहेत.

२) सर्व प्रेषितांची नावे ही समान आहेत व त्यांचे सर्व पवित्र धर्मग्रंथात एकसारखेच वर्णन केलेले आहे. प्रेषितांनी सुद्धा असे दाखवून दिले आहे की, त्यांनी नवीन काहीही न आणता फक्त

पूर्वीच्याच प्रेषितांची शिकवण पुढे आणली. तसेच नुहाचा (मनुचा) महाभयंकर पूर, इजिप्तमधून ज्यू लोकांचे निर्गमन हा धार्मिक इतिहास पण सर्व धर्मांमध्ये एकसारखा आहे.

३) स्वर्ग, नरक, न्यायनिवाडा दिवस आणि वागणूकीचे नियम ह्या सर्व संकल्पना जवळजवळ सर्व धर्मांमध्ये एक सारख्याच आहेत.

४) प्रत्येक धार्मिक पुस्तकाने शेवटच्या संदेशवाहकाची भविष्यवाणी केली आहे.

• पवित्र ग्रंथामधून आपल्या कल्पनांना आधार देणारे काही श्लोक आहेत ते खालीलप्रमाणे.

१) *असा विचार करु नका कि मी या आधीच्या प्रेषितांचे नियम तोडायला आलो आहे तर मी त्यांचे नियम आणखी चांगल्या पद्धतीने लागु करण्यासाठी आलेलो आहे.* (सेंट मॅथ्यू ५:१७) (येशू ख्रिस्त हे त्यांच्यापूर्वी आलेल्या मुसांच्या नियमांचा संदर्भ देत होते.)

२) *हे मुहम्मद!(सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) असे म्हणा की, "आम्ही श्रद्धा ठेवली ईश्वरावर आणि त्या मार्गदर्शनावर जे आमच्याकडे अवतरले आणि जे इब्राहीम, इस्माईल, इसहाक, याकुब आणि याकुबच्या संततीकडे अवतरले आणि जे मूसा, ईसा, आणि दुसऱ्या सर्व प्रेषितांना त्यांच्या पालनकर्त्याकडून दिले गेले. आम्ही त्यांच्यात कोणातही भेदभाव करीत नाही. आणि आम्ही ईश्वरालाच समर्पित झालो आहोत.* (पवित्र कुराण २ : १३६)

३) *निसंशय जे श्रद्धावंत (मुहम्मद स. यांच्यावर श्रद्धा ठेवणारे मुसलमान) आहेत. तसेच यहुदी, ईसाई, साबिईन किंवा (हिंदु, पारशी किंवा अन्य धर्माचे लोक ) आहेत. जे जे कोणी ईश्वर व मरणोत्तर जीवनावर श्रद्धा ठेवतील आणि सत्कर्मे करतील, त्यांचा मोबदला त्यांच्या पालनकर्त्यापाशी आहे. त्यांना (प्रलयाच्या दिवशी) न कोणते भय असेल न ते कधी शोक करतील.* (पवित्र कुराण २:६२)

*४) हे मुहम्मद!(सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) त्याने तुमच्यासाठी धर्माची तीच पद्धत निश्चित केली आहे जिची आज्ञा त्याने मनुला (अलैहि सलाम)*

*दिली होती आणि जिला (हे मुहम्मद) आता तुमच्याकडे आम्ही कुराणाव्दारे पाठविले आहे, आणि जिचा आदेश आम्ही इब्राहीम (अ.) आणि मुसा (अ.) व ईसा (अ.) यांना दिला आहे, या ताकीदसह की प्रस्थापित करा या धर्माला आणि यात फाटाफुट होऊ देऊ नका. हीच गोष्ट या अनेकेश्वर वाादयांना अत्यंत अप्रिय आहे, जिचे (हे मुहम्मद) तुम्ही यांना आंमत्रण देत आहोत. ईश्वर ज्याला इच्छितो आपला बनवितो आणि तो आपल्याकडे येण्याचा मार्ग त्यालाच दाखवितो जो त्याच्याकडे रूजू होत असतो.* (पवित्र कुराण ४२:१३)

५) *आणि हे मुहम्मद! (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) आम्ही तुमच्याकडे हा ग्रंथ पाठविला आहे जो सत्य घेऊन आला आहे. यामध्ये पुर्वीच्या सर्व ईश्वरी ग्रंथाचा समावेश आहे आणि हे पुस्तक (पवित्र कुराण) पुर्वीचे सर्व ईश्वरी ग्रंथ सत्य असण्याची साक्ष देते. म्हणुन तुम्ही ईश्वराने अवतरीत केलेल्या संरक्षक कायद्यानुसारच लोकांच्या मामल्यांचा न्यायनिवाडा करा. आणि जे सत्य तुमच्यापाशी आले आहे, त्यापासून पराडमुख होऊन त्यांच्या (अनेकश्वरवादी लोकांच्या) ईच्छेचे अनुकरण करू नका- आम्ही तुम्हा (मानवा) पैकी प्रत्येकासाठी एक शरीअत (जीवनाचा कायदा) व एक कार्यप्रणाली निश्चित केली. जर तुमच्या ईश्वराने ईच्छिले असते तर तुम्हा सर्वांना एकच लोकसमुह (उम्मत) बनवू शकत होता परंतु त्याने तुम्हाला एकच समुह बनविले नाही. कारण जे काही (हुकूम) त्याने तुम्हा लोकांना दिले आहे त्यात तुमची परीक्षा घ्यावी हाच एकमेव उद्देश होता. म्हणुन चांगुलपणात एक दुसऱ्यापेक्षा सरस ठरण्याचा प्रयत्न करा. सरतेशेवटी तुम्हा सर्वांना ईश्वराकडेच परत जायचे आहे ज्यामध्ये तुम्ही मतभेद करीत आहात त्यातील सत्य परिस्थिती तो तुम्हाला दाखवुन देईल.* (पवित्र कुराण ५ : ४८)

• सर्व धर्म सुरुवातीला एकच होते व प्रत्येक धर्म हा मानवजातीला शिकवण देण्याच्या अखंड प्रक्रियेचा एक भाग आहे ह्या कारणमीमांसेवर भक्कम विश्वास ठेवण्याचे कारण म्हणजे प्रत्येक धर्माच्या दिव्य पुस्तकांत आलेला शेवटच्या संदेशवाहकाचा संदर्भ हे आहे. प्रत्येक प्रेषित व प्रत्येक पवित्र पुस्तकाने आगाऊ भविष्य केलेले व सर्व समान गुणधर्म असणाऱ्या शेवटच्या संदेशवाहकाचे वर्णन करणे हा काही योगायोग म्हणता येणार नाही. ज्या स्त्रोताकडून

आहेत अशी श्रद्धा ठेवली जर आपण एकच ईश्वराची भक्ति केली व मानवता धर्माचे आचरण केले, तर लोकांच्यामध्ये जातीय द्वेष कधीच उत्पन्न होणार नाही. तसेच वंशहत्या दंगली, युद्ध व मानवजातीची पिळवणूक ह्या गोष्टी कधीही घडणार नाहीत. हे जग एक प्रेमाने भरलेले, सहनशील व शांततामय स्थळ बनेल. ज्यामुळे जगाचा उत्कर्ष होण्यास सुरुवात होईल. हा संदेश प्रत्येकाकडे पोहोचविण्याचा आपण यथाशक्ति प्रयत्न करूया. ईश्वर म्हणाला,

*तुमच्यामध्ये अशा लोकांचा एक समुदाय असावा जो भलेपणाचे आमंत्रण देईल व योग्य वर्तवणूक ह्याचा आनंद घेईल व असभ्यतेला मनाई करील. हेच खरे यशस्वी होतील.* (पवित्र कुराण ३:१०४)

म्हणुन लोकांमध्ये शांतता, भरभराट आणि निष्ठावंत होण्याचा संदेश प्रसारित केल्याने फक्त लोकांचाच फायदा होणार नाही तर त्यामुळे ह्या भौतिक व परमार्थिक ह्या दोन्ही जगातील स्वतःच्या यशाची खात्रीही देता येईल.

## *प्रकरण क्र. ४४*

# अंतिम संदेशवाहक

## (The Last Messenger)

आपण मागील प्रकरणात असा निष्कर्ष काढला आहे की, ह्या वरील अनुमान करण्यामागील कारणांपैकी एक कारण म्हणजे सर्व धार्मिक पुस्तकांत अंतिम प्रेषितांबाबत केलेल्या भविष्यवाणीत व्यक्तिमत्व आणि त्यांची स्वभाववैशिष्ट्ये यात असलेला सारखेपणा होय. ह्या प्रकरणामध्ये सर्व धार्मिक पुस्तकांतील अंतिम प्रेषितांबाबत केलेले वर्णन ह्याचा अभ्यास करू.

### अखेरच्या संदेशवाहकाबद्दलची हिंदू धर्मातील भविष्यवाणी

### वेदांची भविष्यवाणी (Prediction in Vedas)

१) स्वामी विवेकानंद, गुरुनानकजी व हिंदू धर्माचे अन्य बुद्धिवान उदा. पंडित सुंदरलाल, श्री. बलरामसिंग परिहार, डॉ. वेदप्रकाश उपाध्याय, डॉ. पी.एच. चौबे, डॉ. रमेशप्रसाद गर्ग, पंडित दुर्गाशंकर सत्यर्थि, श्री काशिरीलाल भगत हे सर्व असे मान्य करतात की, अवतार म्हणजे ईश्वर पृथ्वीवर परत जन्म घेतो असा नाही, तर अवतार म्हणजे जो ईश्वराचा प्रतिनिधि असून त्याचा संदेश सर्वत्र पसरवित असतो किंवा अवतार म्हणजेच संदेशवाहक.

(लेखक डॉ. एम.ए.श्रीवास्तव यांच्या हजरत मुहम्मदला और भारतीय धर्मग्रंथ, या पुस्तकातील मजकुर)

२) हिंदूंच्या पवित्र ग्रंथांमध्ये शेवटच्या संदेशवाहकाची मुख्यतः नरहसंग्सा, ममाह ऋषि, कलकी अवतार, मुहम्मद आणि अहंमद ह्या पाच नावांनी भविष्यवाणी वर्तविली आहे.

३) अथर्ववेदात अखेरच्या संदेशवाहकाचे वर्णन नरहसंग्सा ह्या नावाने आलेले आहे. कुतंप-सूक्तामधील प्रकरण २० मध्ये पहिल्या मंत्रामध्ये त्याचे वर्णन आहे.

४) अथर्ववेद अखेरच्या संदेशवाहकाचे ममाहऋषि या नावाने वर्णन करतो. तसेच असे पण सांगतो की, ममाहऋषि हा वाळवंटातून आलेला उंटस्वार असेल. (कुतंप-सूक्त २ रा मंत्र)

५) सामवेदांत अखेरचा संदेशवाहक अहंमद या नावाने वर्णन केला गेला आहे. सामवेद सांगतो की, अहमदला त्याच्या अधिपतीकडून धर्माचा कायदा (शरीअत) प्राप्त झाला. धर्माचा कायदा हा संपूर्णपणे शहाणपणाने भरलेला आहे. जसा सूर्याकडून प्रकाश मिळतो त्याचप्रमाणे मला त्याच्याकडून ज्ञान मिळते. (Mohammed in Word Scriptures ; By A.H. Vidyarthi,Pg.13)

"अहमिधि पितु परिमेघामृतस्य जग्रह। अहं सूर्य इवाजनि।"
(सामदेव २ : ७ : ८)

६) भविष्यपुराण असे सांगते,"दुसऱ्या एखाद्या देशात प्रेषित हा त्याच्या अनुयायांबरोबर येईल. त्याचे नाव मुहम्मद असेल व तो वाळवंटी प्रदेशात प्रगट होईल.

एतास्मिन्नन्तिरे म्लेच्छ आचाटर्यंण समान्वितः।

(भविष्यपुराण पर्व ३, खंड-३, अध्याय ३, श्लोक-५)

७) वरती काही थोडेच श्लोक दिलेले आहेत. पवित्र वेद, उपनिषदे आणि पुराण ह्यात अखेरच्या संदेशवाहकाचे वर्णन हे १००

पेक्षा जास्त वेळा पुन्हा उच्चारले गेले आहे. तथापि हा आपला विषय नसल्यामुळे आपण शेवटच्या संदेशवाहकाचे हिंदू ग्रंथांमधील अगदी थोडक्यात वर्णन करून सांगू.

८) पवित्र वेदांच्यानुसार नरहसंग्सा ह्याची खालील वैशिष्ट्ये असतील.

- मृदूभाषी
- भविष्यकाळाचे ज्ञान असलेला
- उत्कृष्ट व्यक्तिमत्त्व असणारा
- मनुष्यजातीला वाईट मार्गापासून वाचविल व संरक्षण करील.
- त्याला १२ बायका असतील. (अथर्ववेद २० : १२७ : २)
- नरहसंग्सा हा उंटावर स्वारी करणारा असेल.
- परमेश्वर नरहसंग्साचे ६००९० शत्रूंपासून रक्षण करेल.

• ईश्वर हा नरहसंग्साला १०००० गायी देईल. (मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) पैंगबरांच्या १०००० अनुयायांनी रक्तपात न करता मक्केला जिंकले होते. येथे गायी म्हणजे अहिंसक मनुष्य)

९) कलकीपुराण आणि भविष्यपुराण ह्यात कलकी अवताराची भविष्यवाणी पुढीलप्रमाणे केलेली आहे.

- कलकी अवताराचा जन्म ह्या चंद्रमासाच्या १२ व्या तारखेला होईल.
- त्याचा जन्म अतिशय मान्यवर घराण्यात होईल.
- तो सिलसिल-दीप ह्या अरबी प्रदेशात जन्माला येईल.
- त्याच्या वडिलांचे नाव विष्णुभगत असेल (विष्णु म्हणजे देव, भगत म्हणजे पुजारी/आज्ञाधारक/सेवक)

- त्याच्या मातेचे नाव सुमति असेल (म्हणजे त्याचा अर्थ शांति, स्तब्ध असा आहे.)
- तो उत्कृष्ट तलवार चालविणारा आणि घोडेस्वार असेल.
- परशुराम हे त्याला गुहेमध्ये शिक्षण देतील.

(वरील सर्व वर्णन हे हजरत मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) आणि भारतीय धर्मग्रंथ लेखक डॉ. एम. ए. श्रीवास्तव ह्यांनी लिहिलेल्या पुस्तकावरून घेतले आहे.)

१०) डॉ. वेदप्रकाश उपाध्याय, डॉ. एम.ए. श्रीवास्तव आणि ए.एच. विद्यार्थी त्यांनी त्यांच्या पुस्तकांत अनुक्रमे सखोल चर्चा केली आहे की, भविष्यवाणी वर्तविलेला नरहसंग्सा, ममाह ऋषि आणि कलकी अवतार हे सर्व एकच आहेत व समान व्यक्ति आहे ती म्हणजे मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम). कारण भविष्यवाणी वर्तविलेली सर्व वैशिष्ट्ये ही प्रेषित मुहम्मद यांच्याशी १०० टक्के तंतोतंत जुळतात आणि बऱ्याच ठिकाणी त्याच्या खऱ्या नावाने अहमद म्हणजे मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) असे निदान केलेले आहे.

११) **संग्रामपुराणांतील भविष्यवाणी (Prediction in Sangram Puran)**

पंडित धर्मवीर उपाध्याय ह्यांनी "अंतिम ईश्वर दूत" नावाचे प्रसिद्ध पुस्तक लिहिले, जे १९२३ मध्ये नॅशनल प्रिंटिंग प्रेस, दर्यागंज नवी दिल्ली ह्यांनी प्रकाशित केले. ह्या पुस्तकामध्ये ते असे लिहितात की, काग-बुसंडी आणि गरूड हे श्रीरामाच्या सहवासात बराच काळ राहिले आणि त्यांनी श्री रामाचे उपदेश स्वत:ही मानले व ते सर्वसाधारण लोकांपर्यंतही पाहोचवले. तुलसीदासजींनी त्यांच्या उपदेशाचे भाषांतर संग्रामपुराण या पुस्तकात केले आहे. त्यांनी असे लिहिले की, भगवान शंकरजीनी त्याच्या मुलाला भावी काळातील धर्माची भविष्यवाणी पुढील शब्दात सांगितली होती.

**मराठीत भाषांतर**

*यूहा न पक्षपात कछु राखहुं।*
*वेद, पुराण, संत मत बाख हुं।*
कोणताही पक्षपात न करता मी संत.
वेद आणि पुराणे ह्यांची शिकवण स्पष्ट करून सांगतो.

*संवत विक्रम दोऊ अनझ।*
*महाकोक नस चतुर्पतझ।*
तो सातव्या विक्रम संवत्सरांत चार ताऱ्याच्या
(सूर्य) उदयाबरोबर जन्माला येईल.

*राजनीति भव प्रिति दिखावै।*
*आपन मत सबका समझावै।*
तो राज्य करण्यास लायक असेल. तर्क, प्रेम व
शहाणपणा या बळाच्या जोरावर तो त्याची शिकवण
पटवून देईल.

*सुश्न चतुसुदर सतचारी।*
*तिनको वंश भयो अति भारी।*
त्यांचे चार मुख्य अनुयायी असतील,
त्यामुळे त्यांच्या अनुयायात वाढ होईल

*तब तक सुंदर मद्दिकोया।*
*बिना महामद पार न होया।*
जोपर्यंत स्वर्गीय ग्रंथ हा पृथ्वीवर
असेल मुहम्मद शिवाय मुक्ति मिळणार नाही.

*तबसे मानहु जन्तु भिखारी।*
*समस्य नाम एहि व्रतधारी।*
लोक, कीटक आणि प्राणी हे
त्याचे (मुहम्मदचे) नाव घेतल्यानंतर
ईश्वराचे आज्ञापालक बनतील.

*रसूल महंमदकबरस्य अल्लो।।१०।।*
*अल्लाम इल्लतलेति इल्ललला।।१०।।*
त्यानंतर,त्याच्यासारखा कोणीही जन्माला
येणार नाही. तुलसीदास जे सांगतो ते खरे होईल.

**(संग्राम पुराण, स्कन्द-१२, कांड-६: पद्यानुवाद, गोस्वामी तुलसीदास हजरत मुहम्मद (स.) आणि भारतीय धर्मग्रंथ लेखक डॉ. एम.ए. श्रीवास्तव, पान क्र.१८)**

## मुस्लिम धर्मातील अखेरच्या संदेशवाहकाबद्दलची भविष्यवाणी

१) पवित्र कुराण प्रकरण क्र. ६१ श्लोक नं. ६ मध्ये सांगते, मरीयम पुत्र येशु असे म्हणाले,

*"हे बनी ईस्त्राईल, मी तुमच्याकडे पाठवलेला ईश्वराचा प्रेषीत आहे. सत्यता प्रमाणित करणारा आहे त्या तौरातची जी माझ्यापुर्वी आलेली हजर आहे आणि खुशखबर देणारा आहे एका प्रेषिताची जो माझ्यानंतर येईल, ज्याचे नाव अहमद असेल".*

२) कुराण हे प्रकरण क्र. ३३ श्लोक क्र. ४० मध्ये असे सांगते,

*"लोकहो ! मुहम्मद तुमच्या पुरूषांपैकी कोणाचे पिता नाहीत परंतु ते ईश्वराचे अंतिम प्रेषित आहेत, आणि ईश्वर प्रत्येक वस्तुचे ज्ञान राखणारा आहे."*

३) अखेरच्या संदेशवाहकाला पुष्कळ नावे होती.

मुहम्मद (स.), अहमद (स.), मुदस्सिर (स.) व मुझ्झाम्मिल (स.) हे काही त्यापैकी आहेत.

प्रेषित मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) ह्याच्याबाबत काही माहीती अशी आहे.

- त्यांचा जन्म हा ५७० ए.डी. मध्ये चंद्रमासातील १२ व्या दिवशी मक्केतील एका प्रतिष्ठित कुरेश (Kuresh) कुटुंबात झाला.
- ऑलिव्ह (जैथुन) व खजूर हे प्रेषित मुहम्मद (स.) ह्यांच्या आहारातील मुख्य पदार्थ होते. (तसेच सर्व अरबांच्या आहारातील खास पदार्थ होते.)
- त्यांच्या वडिलांचे नाव अब्दुलाह असे होते. अब्दुलाह म्हणजे ईश्वराचा आज्ञाधारक सेवक.

- त्यांच्या मातेचे नाव आमिना होते. आमिना म्हणजे शांति व संयम होय.
- ते उत्कृष्ट घोडेस्वार व तलवारबाज होते.
- सर्वप्रथम त्यांना ईश्वराचा संदेश हा हजरत जिब्राईल नावाच्या देवदूताकडून एका गुहेमध्ये मिळाला.
- एकदा त्यांना ईश्वराकडून बुराक नावाचा अत्यंत तीव्र गतिचा घोडा मिळाला होता त्यावर बसून प्रेषित मुहम्मदने (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) स्वर्ग आणि सात आकाश ह्यांना भेट दिली होती. (ह्या प्रसंगाला मेराज म्हणतात.)
- त्यांचे व्यक्तिमत्व खुपच आकर्षक होते आणि त्यांचे बोलनेही खुप मृदु होते.
- त्यांच्या बारा पत्नी होत्या.
- ईश्वराचे प्रेषित असल्यामुळे ते अचूक भविष्य वर्तवीत असे.
- जेव्हा त्याने मक्का येथून मदिनेकडे स्थलांतर केले त्यावेळी मक्केची लोकसंख्या ही अंदाजे ६०००० होती आणि त्या लोकांनी प्रेषित मुहम्मद यांना ठार मारण्याचा निश्चय केला होता.

**ख्रिश्चन धर्मातील अंतिम प्रेषितांबाबतची भविष्यवाणी (Prediction in Christian religion)**

ग्रीक बायबलमध्ये अखेरच्या संदेशवाहकाला पॅराक्लेट (Paraclet) असे संबोधिले जाते. आधुनिक इंग्रजी भाषेतील बायबलमध्ये पॅराक्लेट ह्या शब्दाचे भाषांतर 'दुःख कमी करून सुख देणारा' (Comforter) असे केले गेले आहे.

**येशु खिस्ताने बायबलमध्ये असे म्हटले होते,**

१) *"जर तुम्ही माझ्यावर प्रेम करीत असाल, तर माझ्या ईश्वरी आज्ञा पाळा व मी आपला पिता परमेश्वराला प्रार्थना करीन आणि तो तुम्हाला आणखी एक विघ्नहर्ता (Comforter) (प्रे.) देईल जो नेहमी तुमच्या संगतीत राहिल.* (सेंट जॉन १४.१५:१६)

२) *परंतु ईश्वर ज्या दुःखहर्त्याला(Comforter) (प्रे.) माझ्या विनंतीने तुमच्याकडे पाठवील, तो तुम्हाला सर्व गोष्टी शिकवेल व त्याला मी जे काही तुम्हाला सांगितले आहे त्या सर्व गोष्टी तुमच्या आठवणीत आणून देईल.* (सेंट जॉन १४ : २६)

३) *तरीसुद्धा मी तुम्हाला सत्य हे सांगेनच व मी दूर निघून जाईन. हे तुमच्याच फायद्याचे ठरेल. कारण जर मी दूर गेलो नाही तर(Comforter) (प्रे.) तुमच्याकडे येणार नाही. पण जर मी दूर गेलो तर मी त्याला तुमच्याकडे अवश्य पाठवून देईन.* (सेंट जॉन १६ : ७)

४) *मी तुम्हाला पाण्याने ख्रिस्ती धर्माची दीक्षा (Baptize) दिली. पण माझ्यानंतर जो येणार आहे तो माझ्यापेक्षा अत्यंत सामर्थ्यवान असेल व त्याचे जोडे (Shoe) धारण करण्याचीही माझी लायकी असणार नाही. तो तुम्हाला पवित्र आत्मा (Gabrial Angel) आणि अग्नि ह्यांनी धर्माची दीक्षा देईल.* (सेंट मॅथ्यू ३ : ११)

## जैन धर्मातील अंतिम प्रेषितांबाबतची भविष्यवाणी (Prediction in Jain Religion)

जैन धर्मातील कलकी अवताराची भविष्यवाणी:, महावीर स्वामी हे ५७१ बी.सी. मध्ये निधन पावले. जैन धर्माच्या हरीवंशपुराण ह्या पुस्तकात असा उल्लेख केला गेला आहे की, महावीर जैनच्या मृत्यूनंतर ६०५ वर्षे आणि ५ महिने राजा शाकने जन्म घेतला आणि गुप समबालच्या राज्याच्या २३१ वर्षानंतर, कलकी अवताराचा जन्म झाला.

ही भविष्यवाणी पुढील शब्दांत दिली आहे.

गुप्तानां चशत द्वयम्।
एक विंवश्च वर्षाणि काळविद् भिरुदा ह्तम।।४९०।।
चित्वा रिश देवातः काल्किराजस्य राजता।
ततोड जिंटजयो राजा स्यादिन्द्रपुर संस्थितः।।४९१।।
जिनसेन कृत हरिवंश पुराण अ. ६०

त्रिलोक सागर नावाच्या अन्य दुसऱ्या पुस्तकात असे वर्णन केले आहे की, महावीर स्वामी निर्वाणानंतर ६०५ वर्षे व ७ महिन्यांनी शाक राजा आला आणि त्याच्या कारकीर्दीनंतर ३९४ वर्षे व ७ महिन्यांनी कलकी अवताराचा जन्म झाला.

पणछस्सयं वस्संपण मासजंद गमिय वीर णिवुइ दो।
सगराजो सो काल्कि चतुणवतिय महिप सगमांस।
- त्रिलोकसागर प. ३२

कलकी अवताराचा भविष्यवाणी वर्तविलेला जन्मकाळ हा प्रेषित मुहम्मदाच्या (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) जन्मकाळाप्रमाणे समान आहे.

## यहुदी धर्मातील अंतिम प्रेषितांबाबतची भविष्यवाणी (Prediction in Jewish Religion)

प्रेषित मुसांच्या डिओटीरोनॉमी (Deuteronomy) ह्या पाचव्या पुस्तकांत अंतीम प्रेषीतांची भविष्यवाणी अशी वर्तविलेली आहे. ईश्वराने मुसांला असे स्पष्ट करून सांगितले,"मी तुझ्याचसारखा (मुसांसारखाच) दुसरा प्रेषित तुमच्या भाईबंदामधून पाठविन व माझे शब्द त्यांच्या मुखामध्ये घालीन व मी जसा हुकूम दिला आहे त्यानुसार तो त्यांच्या बांधवांशी बोलेल."

(Old Testament, Deuteronomy 18:18)

## बौद्ध धर्मातील अंतिम प्रेषितांबाबतची भविष्यवाणी

गौतमबुद्धाने शेवटच्या प्रेषिताची अंतिमबुद्ध म्हणून केलेली भविष्यवाणी पुढीलप्रमाणे आहे.

"हे नंदा ! मी ह्या जगातील पहिला बुद्ध नाही वा अखेरचा बुद्ध नाही. योग्य वेळी ह्या जगात एक बुद्ध अवतरेल जो सत्य आणि दानधर्म ह्याची शिकवण देईल. त्याची मनोवृत्ति ही शुद्ध आणि पवित्र असेल. त्याचे अंतःकरण स्वच्छ असेल. तो ज्ञानी व शहाणा असेल तो सर्व मानवांचा मार्गदर्शक व नेता असेल. मी ज्याप्रमाणे सत्याची शिकवण दिली त्याचप्रमाणे तो सत्याची शिकवण देईल. तो जगाला असा जीवनाचा मार्ग दाखवेल जो शुद्ध आणि सर्व दृष्टींनी पूर्ण असेल. हे नंदा ! त्याचे नाव मैत्रेय असेल." (Gospel of Buddha by Carus, page 217)

- श्री. एच विद्यार्थी ह्यांनी त्यांच्या 'Mohammed in Parsi, Hindu and Buddha Scriptures' ह्या पुस्तकांत असे म्हटले आहे की, मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि व सल्लम) हे संदेश वाहक आहेत, ज्यांच्याबद्दल सर्व धार्मिक पुस्तकांनी हेच अंतिम भविष्य वर्तवलेले आहे.

- प्रयाग युनिव्हर्सिटीचे संस्कृत संशोधन विचारवंत डॉ. वेद प्रकाश उपाध्याय हे सुद्धा त्यांचे पुस्तक 'Mohammed in the Hindu Scriptures' ह्यामध्ये असे सखोल वर्णन करतात की, ख्रिश्चन, बुद्ध आणि हिंदू धार्मिक ग्रंथांमध्ये केलेली भविष्यवाणी ही हजरत मुहम्मदकरिताच असून तेच अंतिम संदेशवाहक आहेत.

- संस्कृतचे ज्ञानी गजेंद्र पांडा (संस्कृत विभाग, अहमदाबाद विद्यापीठ) आणि विश्व हिंदू परिषदेचे सचिव हे असे सांगतात, वेद हे प्रथम वाणी म्हणजेच ईश्वराचे पहिले प्रगटीकरण आहेत आणि कुराण हे अंतिम वाणी म्हणजे ईश्वराचे अंतिम प्रगटीकरण आहे. त्यापैकी कोणाचेही तुम्ही प्रामाणिकपणे अनुसरण केले, तरी तुम्ही त्याच आज्ञा पालन करणार आहात. म्हणजेच एका ईश्वराची मनःपूर्वक प्रार्थना आणि मानवता आणि चांगली कार्ये ह्यांचे आचरण.

# एक नम्र निवेदन

जर आपण एखाद्या परकीय देशांत गेलो जेथे प्रत्येकजण हा आपल्याला नवीन व परका आहे, व आपणाला असे कळून आले की त्यांच्यामध्ये आपल्या देशांतून आलेला एकजण आहे, तर त्या व्यक्तिशी परिचय नसून देखील तिच्याविषयी आपणास मित्रत्व, सहानुभूति वाटते व आपण तिच्याकडे आकर्षिले जातो. कारण ती व्यक्ति व आपणामध्ये सर्वसाधारण जोडणारा एक दुवा असतो आणि तो म्हणजे आमची मातृभूमी.

ही काहीतरी साधर्म्य असणारी भावनाच दोन परक्या माणसांतील अंतर कमी करते. त्याचप्रमाणे जर आपण आपला धर्म न अन्य धर्म ह्यांमधील काही समान गोष्टी शिकलो तर आपापसातील परकेपणाची भावनाही कमी होईल.

आता आपणास हे माहित झाले आहे की, बऱ्याचशा गोष्टी ह्या सर्व धर्मांमध्ये समान आहेत. उदा.

१) एकाच ईश्वराची प्रार्थना

२) एकसारखेच आदर्श नियम

३) स्वर्ग, नरक आणि न्यायनिवाडा दिवस ही संकल्पना

४) प्रेषित आणि अंतिम संदेशवाहक

आपण ह्या ज्ञानाचा प्रसार हा सर्वसामान्य माणसांमध्ये आपापसातील तिरस्काराची भावना कमी करण्यासाठी करु या आणि त्यायोगे मानवाच्या आयुष्यात तसेच ह्या जगात शांति आणि भरभराट आणू या.

परमेश्वराने आम्हाला सत्य समजून घेण्यासाठी शहाणपण व त्याचे अनुकरण करण्याची शक्ति ह्यांचा कृपाप्रसाद द्यावा. आता आपण ह्या पुस्तकाचा शेवट अथर्ववेदातील एका श्लोकाचे पठण आणि ईश्वराची प्रार्थना म्हणून करू या.

'इंद्र क्रतुं न आ भर पिता पुत्रेभ्यो यथा।'

शिक्षा णो अस्मिन् पुरुहूत यामानि जीवा ज्योतिर शीमहि।।

*'हे ईश्वर! आमच्यावर अशी कृपा कर. ज्यामुळे आम्हाला आमच्या* आयुष्याच्या कालावधीत खरे ज्ञान मिळू शकेल.'(अथर्ववेद १८:३:६७)

# अंतिम वाक्य (Last Word)

- हे पुस्तक म्हणजे माझा अनुभव आणि ज्ञान ह्यात तुम्हाला भागीदार करण्याचा एक प्रयत्न होता. माझे ज्ञान व अनुभव ह्यांच्या मदतीने मी थोडक्यात यश कसे मिळवावे व कसे चालू ठेवावे याविषयी चर्चा केली आहे.

मी एक साधा विद्यार्थी आहे व ह्या विषयावरील विचारवंत नाही. मी ह्या पुस्तकांत चुका केल्या असण्याची शक्यता आहे. आपण आपले मत व सूचना मला जरूर पाठवाव्यात अशी मी सर्वांना नम्र विनंति करतो. त्यामुळे पुढे मागे मला ह्या पुस्तकांत सुधारणा करण्यास खूपच मदत होईल.

**सर्वांना हार्दिक शुभेच्छा।**

**क्यू.एस खान**
Email :hydelect@vsnl.com

### *प्रकरण क्र. ४५*

# बुद्धिमान व्यक्तिंकडून काहीतरी शिका

ह्या जगात अतिशय प्रभावी व्यक्ति आणि विचारवंत ह्यांनी शेकडो उत्कृष्ट पुस्तके लिहिली आहेत. ती सर्व पुस्तके म्हणजे ज्ञान आणि शहाणपणा ह्यांचा अत्युत्तम खजिना आहे. तेव्हा अशी पुस्तके वाचण्याची सवय लावून घ्या. मी खाली काही अशा प्रकारची पुस्तके वाचनासाठी सुचवित आहे. तरुण उद्योजकांनी ती जरूर वाचावी आणि त्या पुस्तकांचा आपल्या वैयक्तिक ग्रंथालयात संग्रह करावा.

सर्व पुस्तकांची नावे, प्रकाशन वगैरे मुद्दाम इंग्रजीत दिलेले आहेत. त्यांचे मराठीत स्वतंत्र भाषांतर न करता ती जशी आहेत तशीच दिली आहेत. त्यामुळे कोणाचाही गोंधळ उडू नये ही ह्यामागची भूमिका आहे.

# Learn from the Learned ones

There are hundreds of masterpiece books in the world, written by geniuses and scholars. They are the real treasure of knowledge and wisdom. Make a habit of reading good books.

I am suggesting you few books, which a young entrepreneur must read and keep in his personal library.

1. Name of book : Think and Grow Rich

Author : Napoleon Hill | Published by : Mastermind Books (India)

Contents of book : Mr. Napoleon Hill has spent 20 years in research to find how people become successful. Then he wrote "Law of Success" which is quite bulky book but very successful and famous. Then he summarized it in a small book "Think & Grow Rich". In this book he has explained how you can program your brain to think in the right direction, so that it can lead you to the path of success and prosperity.

You should read this book at least seven times at interval of few months to get the right benefit. Mr. Ron Holland read it more than 40 times. I read it more than 25 times.

2. Name of book: How to Win Friends and Influence People

Author : Dale Carnegie | Published by : Pocket Books (ISBN: 0-671-72365-0)

Contents of book : Human being is a social animal. He prefers to deal with people he likes. In business, I found that many senior officers in business organizations blindly keeps on dealing with vendors or persons whom they like and believe, than those who are good suppliers or capable persons.

You must read this book to learn how to influence people so that they like you, or at least learn what you should not do to lose their friendship.

3. Name of book : You can Negotiate Anything

Author : Kohn Herb | ISBN: 0-553-28109-7

Contents of book : When you start a business, you always have to purchase the raw material or sell your service or product. In selling and purchasing process if you know that one supplier desperately wants to dispose off his goods and other supplier is well settled, then you can bargain with first supplier and get good discount rather than second one.

Similarly if you know a purchaser desperately wants your product or service than other well settled purchaser. Then for first purchaser you may not reduce your price and sell him at a good profit.

This knowledge of other person's need is very important in making good business deal. This book "You can negotiate anything" will teach you how to judge the other person, and how to make a profitable deal.

4) Name of book : How to Stop Worrying and Start Living

Author : Dale Carnegie | Published by : World's Work (ISBN: 0-671-53267-7)

Contents of book: Worry is part of human life. The more a person takes risk, the more he will be worried. But worry and tension is a habit for which there is no medicine.

Dale Carnagie has explained and taught in a wonderful and simple language how to handle and cope-up with worries and remain successful in business.
There is one more book with title "Executive Stress" which also explains various methods to handle stress positively.

5) Name of book : Public Speaking
Author : Dale Carnegie
Contents of book: Orator is a king, learn to speak effectively to become successful in your field of life. This book will help you develop your speaking and negotiating ability.

6) Name of book : Success through Positive Thinking
Author : Napoleon Hill
Contents of book: This book will help you in how to think positively in difficult times and avoid losing a battle, and again become successful.

7) Name of book : The One Minute Sale Person
Author : Spencer Johnson M.D. | Published by: Candle Communications Corporation
Contents of book: This book will explain you why some people are successful in selling a product or service than others.

8) Name of book: Leadership and the One-minute Manager
Author : Kenneth Blanchard and others | ISBN: 0-688-03969-3
Contents of book: This book will explain you why some people become successful administrator than others.

9) Name of book : Tao of Leadership
Author: John Heider | Published by: Mastermind Books (ISBN: 0-553-27820-7)
Contents of book: Chinese philosopher Lao Tzu in 500 B.C. wrote book of Tao teachings for politician and king. Mr. John Heider has compiled this masterpiece as Tao of management. This book will help you to develop broad-based leadership ability in you, and to look at the world and its events in right perspective.

10) Name of book : Relief Without Drugs
Author : Ainslie Meares | Published by: Souvenir Press Ltd. (ISBN: 0-00-634156-X)
Contents of book: As compared to other people, businessmen get more affected by many diseases such as heart problem, insomnia, digestion problem and asthma etc. All these problems are purely physical but also related to mental condition. This book explains how you can cure or avoid such sickness by relaxation technique.

11) Name of book : Talk and Grow Rich
Author : Ron Holland | Published by: Mastermind Books (India)
Contents of book: This is also a good book for new entrepreneur. Mr. Ron Holland has presented some new philosophies which Mr. Napoleon Hill has not mentioned in *Think & Grow Rich.*

Contents of book: Worry is part of human life. The more a person takes risk, the more he will be worried. But worry and tension is a habit for which there is no medicine.

Dale Carnagie has explained and taught in a wonderful and simple language how to handle and cope-up with worries and remain successful in business.
There is one more book with title "Executive Stress" which also explains various methods to handle stress positively.

5) Name of book : Public Speaking
Author : Dale Carnegie
Contents of book: Orator is a king, learn to speak effectively to become successful in your field of life. This book will help you develop your speaking and negotiating ability.

6) Name of book : Success through Positive Thinking
Author : Napoleon Hill
Contents of book: This book will help you in how to think positively in difficult times and avoid losing a battle, and again become successful.

7) Name of book : The One Minute Sale Person
Author : Spencer Johnson M.D. | Published by : Candle Communications Corporation
Contents of book: This book will explain you why some people are successful in selling a product or service than others.

8) Name of book: Leadership and the One-minute Manager
Author : Kenneth Blanchard and others | ISBN: 0-688-03969-3
Contents of book: This book will explain you why some people become successful administrator than others.

9) Name of book : Tao of Leadership
Author: John Heider | Published by: Mastermind Books (ISBN: 0-553-27820-7)
Contents of book: Chinese philosopher Lao Tzu in 500 B.C. wrote book of Tao teachings for politician and king. Mr. John Heider has compiled this masterpiece as Tao of management. This book will help you to develop broad-based leadership ability in you, and to look at the world and its events in right perspective.

10) Name of book : Relief Without Drugs
Author : Ainslie Meares | Published by: Souvenir Press Ltd. (ISBN: 0-00-634156-X)
Contents of book: As compared to other people, businessmen get more affected by many diseases such as heart problem, insomnia, digestion problem and asthma etc. All these problems are purely physical but also related to mental condition. This book explains how you can cure or avoid such sickness by relaxation technique.

11) Name of book : Talk and Grow Rich
Author : Ron Holland | Published by: Mastermind Books (India)
Contents of book: This is also a good book for new entrepreneur. Mr. Ron Holland has presented some new philosophies which Mr. Napoleon Hill has not mentioned in *Think & Grow Rich.*

